# Prefatory Note

This volume is an affectionate tribute paid to the memory of the late Dr Balkrishna by his friends and admirers Part I comprises a short biography, Part II articles on the work of the Doctor and Part III reminiscences Excepting for a few articles in English and Hindi (which we found it fit to keep in their original form) the book is in the Marathi language

The publication of the book has been made possible by the compliance of the late Doctor s friends and admirers with our request for their appreciations and reminiscences and by the readiness of the printing and publication department of Arya Samaj, Kolhapur, to undertake its production On behalf of the ' Dr Bal krishna Memorial Volume Committee ' I thank the writers and the publishers as well as all others who have assisted us by supplying information and placing before us useful material

The function of the Committee has been to organise the whole work and that of its Editorial sub committee, including the Editor, to do the strictly editorial work Not a little labour has gone to the task of editing, and I congratulate the Editorial sub committee and the Editor on their successful efforts Mr Walambe s initiative and energy have been at the bottom of the whole project

Every writer has had full freedom in expressing his views, the Editorial scissors, if they were used at all, were chiefly directed at eliminating repetition and errors of fact

We hope that this book will not only keep alive in a fitting form the memory of a remarkable man, but also create in the younger generation of the nation an enthusiasm for the ideals for which he lived and died

I also record with gratitude that the ceremony of the publication of the book is being performed to day by Sir R V Sabnis, Kt, C I E, the retired Dewan of Kolhapur and the *doyen* of Kolhapur intelligentsia who, at his eighty sixth year, finds himself strong enough to be in our midst and encourage our efforts

Shraddhanand Hall,<br>Laxmipuri,<br>Kolhapur<br>February 12, 1942

**A. C. BOSE**<br>President, Dr Balkrishna<br>Memorial Volume Committee.

# हद्गत

आज हा कै. डॉ. बाळकृष्ण स्मारक-ग्रंथ रसिकांना सादर करताना मला अत्यानंद होत आहे. डॉक्टरसाहेबांच्या आयुष्यातील शेवटचीं दोन वर्षे त्यांच्या सान्निध्यांत असतांना त्यांचें जीवन-चरित्र मला पुष्कळसें जवळून न्याहाळतां आल्यामुळें त्यांच्या व्यक्तित्वाचा ठसा माझ्या अंतःकरणावर कायमचा उमटला गेला; व प्रस्तुतचा प्रयत्न म्हणजे त्याला दिलेलें मूर्त स्वरूप !

हा ग्रंथ तयार करण्याचा कामीं लागणारी सामुग्री — निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेलीं डॉक्टरसाहेबांचीं व्याख्यानें व लेख, तसेंच त्यांच्या ह्यातींत व नंतर खुद्द त्यांच्याविषयीं प्रसिद्ध झालेल्या लेखांचीं कात्रणें — त्यांच्या कुटुंबांतील एक नोकर श्री. द. बा. देसाई यांनीं केवळ एक छंद म्हणून जमवून ठेविली होती. हा समग्र पाहून एकट्या सामुग्रीवर डॉक्टरसाहेबांचें चरित्र व त्यांच्या वाङ्मयविषयक एखादा ग्रंथ लिहावा अशी कल्पना सुचली, व या कार्यासाठीं आपण जमविलेली सर्व सामुग्री श्री. देसाई यांनीं मला आनंदानें देण्याचें कबूल केलें. याबद्दल प्रथम त्यांचे आभार मानणें माझें कर्तव्य होय. पण डॉक्टरसाहेबांच्या असंख्य विद्वान मित्रांना देखील यांत भाग घेता यावा म्हणून त्यांच्या मित्रांनीं त्यांच्या वाङ्मय व कार्य यावर अधिकारवाणीनें लिहिलेले लेख व आठवणी मिळवून त्यांचा एक प्रातिनिधिक समग्र ग्रंथ काढणें श्रेयस्कर वाटल्यावरून 'डॉ. बाळकृष्ण — चरित्र, कार्य व आठवणी' असें या ग्रंथाचें त्रिविध स्वरूप ठेवलें.

पुढें या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्यासाठीं कोल्हापूर आर्यसमाजानें डॉ. बाळकृष्ण स्मारक ग्रंथप्रकाशन समिति नेमून महायुद्धामुळें कागदाचे भाव कडाडलेल्या परिस्थितींत देखील या ग्रंथाच्या प्रकाशनाची सर्व

जबाबदारी घेतांडीनें आपल्या अंगावर घेतली व सदर समितीतर्फे मला संपादक नेमून या हातीं घेतलेल्या कार्यास उत्तेजन दिलें यावद्दल व समितींतील इतर सभासदांनीं केलेल्या हार्दिक सहकार्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहीन

या ग्रंथातील सर्वच लेखक कांहीं माझ्या ओळखीचे नाहींत. कांहींना समक्ष भेटून व कांहींना पत्रद्वारें विनंती करतांच आश्वासनें देऊन लेखन सहाय्य पुरविल्याबद्दल प्रस्तावना लेखक साहित्याचार्य श्री तात्यासाहेब केळकरापासून तों या ग्रंथातून प्रथमच वाङ्मयात पदार्पण करणाऱ्या हरिजन विद्यार्थ्यापर्यंत व तसेंच डॉक्टरसाहेबांच्या श्रीमंत सत्यनिष्ठ व जहागिरदार मित्रांपासून तों तहत त्यांना पत्रें पाठविण्याच्या कामीं मदत करणाऱ्या टाइपिस्टपर्यंत ज्यांची ज्यांची म्हणून मदत झाली त्या सर्वांचे व्यक्तिशः आभार मानणें अशक्य असल्यामुळें सामुदायिकरीत्या आभार मानणें हें मीं माझें कर्तव्य समजतों त्यातल्या त्यांत प्रत्येक लेख वाचून अत्यंत महत्त्वाच्या सूचना व दुरुस्त्या करण्यापासून मुद्रितें फिरून तपासण्यापर्यंत एवढेंच नव्हे तर ग्रंथाच्या सजावटीच्या हरएक बाबतींत अत्यंत आपुलकीनें मदत करून मला मार्गदर्शन केल्याबद्दल कै डॉ बाळकृष्ण स्मारक ग्रंथ प्रकाशन समितीचे अध्यक्ष डॉ बोस व उपाध्यक्ष प्रो देशपांडे यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत

प्रारंभीं मी डॉक्टरसाहेबांचें चरित्र मुद्दाम थोडक्यात दिलें आहे याला पुष्कळशीं कारणें असलीं तरी मुख्य कारण हें कीं 'थोर माणसांचीं चरित्रें त्यांच्या ग्रंथांतून व कार्यांतूनच व्यक्त झालेलीं असतात' या न्यायानें त्यांच्या ग्रंथावर व कार्यावर अधिकारी व्यक्तींनीं प्रकाश पाडून त्यांचें अव्यक्त चरित्र जनतेसमोर या ग्रंथाद्वारें मांडलें असतांना माझ्या सारख्यानें त्या या आयुष्यातील इतर घटामोडींतच पानेंच्या पानें खर्ची

घालावीत हें इष्ट नव्हे. त्यांच्या चरित्राकडे वाचकांना विहंगम दृष्टी टाकतां यावी म्हणून अवघ्या ६१ पानांत त्यांचें चरित्र थोडक्यांत रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे.

या ग्रंथांतील प्रत्येक लेखांतील विधानाबद्दल लेखक व्यक्तिशः जबाबदार आहेत. 'आठवणी' सदरांतील कित्येक लेखांतून पुनरावृत्ति होत असल्यानें कित्येक ठिकाणीं संपादकीय कात्री लावणें भाग पडलें; व समितीनें ठरविल्यापेक्षां ग्रंथाचा आकार वाढून तो बोजड होऊं नये म्हणून कांहीं लेख स्थलाभावीं छापतां आले नाहींत याबद्दल त्यांचे लेखक उदार अंतःकरणानें क्षमा करतील अशी आशा आहे.

ग्रंथांत अशुद्धें राहूं नयेत म्हणून शक्य तों दक्षता बाळगून देखील कांहीं लेखनदोष व मुद्रणदोष आढळले तर त्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

तसेंच आर्यभानु प्रेसचे मॅनेजर श्री. मोहिते यांनीं आपुलकीच्या भावनेनें ग्रंथाच्या छपाईचें व ब्लॉकचें काम सुबक करून दिल्याबद्दल त्यांचेही आभार मानणें माझें कर्तव्य होय.

अशासारखा ग्रंथ संपादित करतांना ग्रंथाचें स्वरूप कोणतें असावें याची चर्चा करण्यापासून ग्रंथ तयार होईपर्यंत पुष्कळांचा बहुमोल सल्ला मला घ्यावा लागला. त्या सर्वांचे पुन्हां एकवार आभार मानून या आमच्या प्रयत्नाकडे रसिक वाचक कौतुकानें पाहातील अशी दृढ आशा करून हें इतत पुरें करतो.

९ फेब्रुवारी, १९४२
फत्तेपूर

मो. रा. वाळंबे

# प्रस्तावना

कै. डॉ बाळकृष्ण याजविषयी स्मृतिसुमनांजलिरूप असा हा ग्रंथ त्यांच्या प्रथम श्राद्धतिथीच्या वर्षात प्रसिद्ध होत आहे ही गोष्ट सर्वथा योग्य आहे व तिचें मुख्य श्रेय स्मारक कमिटीच्या चिटणीसाना दिलें पाहिजे त्यांनी सुचविल्या वरूनच या ग्रंथाला प्रस्तावनारूप दोन शब्द लिहीत आहे.

डॉ. साहेबाचे मित्र रियासतकार सरदेसाई यांनी अगदी थोडक्या पण अर्थपूर्ण शब्दात लिहिल्याप्रमाणें डॉक्तर बाळकृष्ण याचा जन्म पंजाबात व्हावा पण त्यांचें सर्व किंवा निदान मुख्य जीवित कार्य महाराष्ट्रात घडून यावें हा एक अपूर्व योगायोग खरा त्यांनी गुरुकुलात दहा बारा वर्षे घालवून शिक्षणविषयक अनुभव घेतला त्याचें सर्व फळ कोल्हापुराला मिळालें. कारण डॉ० बाळकृष्ण याच्यामुळेंच कोल्हापूर हें एक नामांकित शिक्षण केंद्र झालें

रा. बारवे यानी डॉक्तर साहेबाचें चरित्र या ग्रंथाच्या प्रारंभीं लिहिलें आहे त्यात चरित्र विषयीभूत डॉक्तरांच्या विविध कामगिरीची भरपूर माहिती दिली आहे ती वाचून असें वाटतें की अशी कर्तृत्वसंपन्न माणसें क्वचितच निर्माण होतात कारण जो मनुष्य दैवाचा फासा उलटा पडला तर एखादा पटेरणार किंवा शिंपी म्हणून जन्म घालवायचा, त्यानेंच, शिक्षणक्षेत्रातील एक विभूती, उत्कृष्ट इतिहास संशोधक, तत्त्वचिकित्सक, ग्रंथकार, धर्मपुरस्कर्ता, व अनेक संस्थाचा जनक अशी विविध कीर्ति अखेर मिळवावी, हें प्रत्यक्ष पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटल्याशिवाय कसें राहील?

डॉ० बाळकृष्ण याचा माझा परिचय सुमारें तेरा वर्षांपूर्वी एकदा अकल्पित रीतीनें आगगाडीच्या प्रवासात झाला आणि तेव्हांच्या प्रथम संभाषणातच त्याचा माझा स्नेह जडला तो अखेरपर्यंत कायम होता

ते पुण्यास येत तेव्हा त्यांची गांठ पडेच, पण एकदा कोकणच्या वाटेवर कोल्हापुरास, त्यांच्या घरीं उतरून त्यांचा पाहुणचार घेण्याचा, आणि ते अध्यक्ष व मी व्याख्याता अशी योजना होऊन आर्यसमाजाच्या कार्यावर भाषण करण्याचा सुप्रसंग मला लाभला होता. तसेंच १९३३ सालीं ते अमेरिकेच्या दौऱ्यावर गेले तेव्हा हस्तेपरहस्ते त्यांच्या प्रवास खर्चाला सहाय मिळविण्याकरिता, कांहीं धनिक लोकांकडे पत्रें लिहून मी थोडीबहुत खटपट केली होती. ता १२ आगष्ट, १९३३ रोजच्या पत्रांत ते मला लिहितात "तुमच्या पांचशे रुपयांच्या देणगीबद्दल कोणत्या शब्दानीं आभार मानूं" (ही पांचशे रुपयांची रक्कम डॉ० बाळकृष्ण यांना मी माझ्या हातीं असलेल्या एका ट्रस्ट फंडांतून देवविली होती.) फॉरेन प्रॉपोगांड्या करितां ही रक्कम मिळविण्यांत तुम्ही मदत केलीत यांत शंका नाही. आर्यसमाज कांहीं तरी देईल. संस्थानिकानांहि पत्रें पाठवीत आहे नाहींतर बायकोचे स्तनच खर्च करावे लागतील. मी २५ निदान निदानीं ३० सप्टंबरला तरी निघणारच. नक्की तारीख पुढील आठवड्यांत मुक्रर्र होईल."

फिरून ता. २४ आगष्ट १९३३ रोजी ते लिहितात 'तुम्ही पाठविलेला चारशे रुपयांचा चेक पोंचला फार आभारी आहे आतां मी डॉ० पटवर्धनांकडून अवश्य ती माहिती व परिचयपत्रें घेतों. तूर्त ता ३० सप्टंबर ही प्रस्थानाची तारीख नक्की केली आहे. लोकांकडून आर्थिक मदत मिळण्याची फारशी आशा नाही. तथापि मी जाण्याचें ठरविलें आहे. मग स्तन ला काय दर्भ पडेल तो पडो' (त्यांना पंधरा हजार रुप चे खर्चाचे लागले म्हणतात.)

अमेरिकेचा प्रवास व दौरा हीं मोठ्या खर्चाचीं कामें होत व हा सर्व खर्च स्वत करण्याइतकी धनसंपन्नता त्यांची नाहीं हें मला माहीत होतें. मला हेंहि माहीत होतें कीं अमेरिकेला पूर्वी स्वामी विवेकानंद गेले

त्यानंतर हिंदुधर्म व संस्कृति यांच्याविषयीं मतप्रचार करण्याला दुसरा कोणीहि वक्ता किंवा पंडित तिकडे गेलेला नव्हता. अमेरिकेंत हिंदुस्थान-विषयक थोडीशी चळवळ एखादा ना एखादा हिंदी देशभक्त करीत असतो. पण ती चळवळ सर्वस्वी राजकीय स्वरूपाची असते तिला इंग्रज साम्राज्य सरकार निरोध करीत असतें. आणि अमेरिकन लोकांना हिंदुस्थानच्या राजकीय स्वातंत्र्यापेक्षा हिंदी संस्कृतीचें अगत्य व आस्था अधिक वाटते. म्हणून डॉ० बाळकृष्ण यांच्यासारखा अभ्यासू विद्वान व वक्ता अमेरिकेंत गेला व त्यानें धर्मविषयक व्याख्यानें दिलीं तर त्याचा थोडाबहुत यथाप्रमाण उपयोग होईल असें मला वाटतें

आर्यसमाजी लोकांना वक्तृत्वाचें वरदानच असावें असें दिसतें त्या प्रमाणें बाळकृष्ण यानाहि तें होतें याचा अनुभव मी घेतलेला आहे. पण त्यांच्या वक्तृत्वाप्रमाणें त्यांची विद्वत्ताहि बहुविध होती. अर्थशास्त्र, इतिहास व धर्मविषयक तत्त्वज्ञान हे त्यांचे आवडते विषय होते 'शिवाजी महाराजासंबधानें एकदी निःसीम भक्ति फारच थोड्या अभ्यासकाचे ठिकाणीं दिसून येते' असें रियासतकार सरदेसाई यानी या ग्रथातीच आपल्या लेखात लिहिलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. पण शिवाजी विषयक भक्तीपेक्षाहि, त्यानीं आपल्या तद्विषयक ग्रथात जी खरी चिकित्सक बुद्धि व सशोधन पद्धति स्वीकारली आहे तिच्याबद्दल मला अधिक आदर वाटतो. कोणाहि परप्रातीय मनुष्यालाहि आदर व प्रेम वाटावें अशीच शिवाजी ही महाराष्ट्रीय विभूति होऊन गेली हें खरें तथापि या विभूति-पूजनाकरिता डॉ० बाळकृष्ण यानीं जो प्रचड उद्योग इतिहास साधनाच्या दृष्टीनें केला तसा करणारे खुद्द महाराष्ट्रीय अभ्यासक किती निघाले ?

कोल्हापूर हें महाराष्ट्रांतील एक महत्त्वाचें केंद्र आहे. तथापि त्याला आज जे अनेकागी शैक्षणिक महत्त्व प्राप्त झालें त्याला बाळकृष्ण याचे

परिश्रम पुष्कळसे कारणीभूत झाले ही गोष्ट अगदीं सत्य आहे. आणि त्याला मूळ कारण या संस्थानाच्या अधिपती व अधिकारी यांजकडून मिळालेलें अकल्पित पण उदार सहाय हें होय.

डॉ. बाळकृष्ण हे आर्यसमाजी असल्यामुळें ते सामाजिक बाबतींत उदार मतवादी होतेच. पण हे उदारमतवादित्व त्यांनी आपल्या व्यक्तिगत आचरणांत उतरविलें होतें.

असो. प्रस्तुत ग्रंथांतील लेखकांनीं स्वतःच्या परिचयानें व जिव्हाळ्यानें जें गुणवर्णन केलें आहे त्यापेक्षा मी अधिक काय लिहिणार? परंतु या ग्रंथरूपानें डॉ. बाळकृष्ण यांना त्यांच्या प्रथम श्राद्धवर्षी जी स्मृतिसुमनें अर्पण करण्यांत येणार आहेत त्यांत माझीहि एक सुमनांजलि पडावी या हेतूनें रा. वाळवे यांनी ही प्रस्तावना लिहिण्याची जी संधि दिली त्याबद्दल त्यांचे आभार मानून हा लेख संपवितों.

न. चिं. केळकर

# अनुक्रमणिका



## चरित्र



## कार्य

## गुणग्रहण व आठवणी

# FOREWORD

*I much appreciate your idea of publishing a volume in memory of the late Dr. Balkrishna who was a man of erudition especially in the sphere of Economics and History. I know how zealous and keen he was in writing the life of Shivaji, the Great, the last volume of which he finished only a couple of days before his demise.*

*I hope, the Memorial Volume will serve as a noble example to the student-world in general and history students in particular.*

D A SURVE,

# स्मृतिपूजा

[ जातिः प्रणयप्रभा ]

तुजवरी वाहतों भावफुलें,
वर्षुनी स्मृतींचीं मत्रजलें. ॥ धृ० ॥

प्रेरक होता वैदिक वाणी,
आर्यत्वाचीं गाउनि गाणीं,
कृतिची रचिली थोर कहाणी,
भाव जियेंतुन नव उमले. १

मानवतेला अवाञ्चित मुकली—
जनता असली हृदयीं धरिली,
शुद्धी, समता तियेस दिधली,
माणुसकीतें जागविलें. २

दूर सोडुनी देश आपुला—
मराठेशाशीं जिव समरसला,
नरसंशोधनकार्यीं रमला,
तेज तुझें त्यातून खुले. ३

सम्यक् दर्शन शिवरायांचें–
तुवां घडवुनी स्वातंत्र्याचें,
पोषण केलें तरुण मनांचें,
भविष्य त्या मधुनीच फुले ! ४

१६–१०–४१
सांगली

गिरीश

# डॉ० बाळकृष्ण

## जीवन-वृत्तान्त

[लेखक — मो. रा. वाळंबे, बी. ए., बी. टी., कोल्हापूर]

### पूर्वार्ध

'पुरुषाचें भाग्य केव्हां उदयास येईल हें कांहीं सांगता येत नाहीं' असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. कारण वयाच्या आठव्या वर्षापर्यंत स्थलांतरामुळें अनेक भाषांचा ओनामा गिरवून एकही इयत्ता पुरी न करणाऱ्या विद्यार्थ्याला पटवेगार, शिंपी वगैरे धंद्यात शिरून उपरति होते, व त्यानंतर शिकून तोच मुलगा आंतरराष्ट्रीय योग्यतेचा विद्वान् होतो, हें कुणाला सांगून देखील खरें वाटलें नसतें! तसेंच आपल्या आयुष्यातील एन उमेदीचीं प्रारंभीचीं चाळीस वर्षें पंजाबातील वातावरणात घालवून पुढें कांहीं निमित्तानें तोच विद्वान् गृहस्थ महाराष्ट्रांत येतो व येथील वातावरणाशीं समरस होऊन मराठाराज्यसंस्थापक श्री शिवाजी महाराज यांच्या चरित्र-कार्यासाठीं त्यांच्याच वंशजाच्या राजधानींत सतत पंधरा वर्षें खपून व पदरचे हजारों रुपये खर्चून १६३० पानांचा प्रचंड ग्रंथ लिहून पुरा केल्यानंतर एका आठवड्यातच इहलोकची यात्रा पुरी करतो हा योगायोग नव्हे तर काय? जन्मताच आईबापांच्या मृत्यूनंतर आलेलें पोरकें म्हणून त्याचें तोंडदेखील न पाहतां एका मुसलमान शेतकरी कुटुंबात संगोपना-करितां धाडलेलें व तिथेंच वाढलेलें हें पोर पुढें आर्यसमाजाचा सूत्रधार होऊन मुसलमानांना शुद्ध करून घेणाऱ्या वैदिक धर्माचा प्रचारक होईल हें तरी कोणी भाकित केलें होतें? 'सत्य हें रहस्यमय कादंबरीपेक्षां

मनोरम असून' असें म्हणतात, त्याचें मूर्तिमंत उदाहरण पाहावयाचें झाल्यास कै. डॉ. बाळकृष्णांच्या जीवन-चरित्राकडे वळावें लागेल.

डॉ. बाळकृष्ण यांचा जन्म २२ डिसेंबर, १८८२ साली मुलतान या गावीं झाला. जन्मल्यानंतरच 'हा मुलगा तुमच्या मुळावर आला आहे' असें भविष्य त्याच्या कुलोपाध्यायाकडून वर्तविण्यात आल्यामुळें त्याचें तोंड-देखील न पहातां त्याला मुलतानजवळील एका शेतकरी मुसलमान कुटुंबाकडे संगोपनासाठीं पाठविण्यात आलें. जन्मतःच आईबापाच्या प्रेमाला मुकलेल्या भगवान् श्रीकृष्णासारखाच या 'बाळकृष्णा'वरही प्रसंग आला. बालपणात ग्रामीण वातावरणातील नैसर्गिक, साध्या व निरामय जीवनाचा त्याच्या शरीरावर फार चांगला परिणाम झाला; मात्र, मुसलमान घराण्यातील रीतिरिवाजांचें बाळकडू मिळून देखील त्याच्या मनावर त्याचा काहींएक परिणाम झालेला दिसून आला नाहीं. सुमारें तीन वर्षें त्या मुसल-मान कुटुंबात वाढल्यानंतर त्याना आजोळीं आणण्यात आलें. हें आजोळचें घराणें मात्र कट्टर क्षत्रिय होतें! पूजाअर्चा व सूर्यनमस्काराचा व्यायाम हे तेथील दोन महत्त्वाचे कार्यक्रम! संस्कृतीच्या बाबतींत दोन ध्रुवांचें अंतर होतें या दोन घराण्यात! या आजोळीं दोन वर्षें काढल्यानंतर वयाच्या सहाव्या वर्षी रावळपिंडीस चुलत्याकडे त्याची रवानगी झाली. तेथील प्रचलित भाषा उर्दू असल्यामुळें मुलतानी ऐवजीं उर्दू शाळेंत त्याना जावें लागलें. तेथून वर्षभरात त्याना परत मुलतानला यावें लागलें. पुढें त्याचे मामा टोडरराम यानीं त्याना सक्करास आपल्याकडे बोलावून नेलें. तेथील भाषा पडली सिंधी! म्हणून त्या भाषेचाही ओनामा गिरवावा लागला. वयाच्या आठव्या वर्षापर्यंत अनिश्चिततेच्या वादळात हेलकावे खाणारें त्याचें शैक्षणिक तारू एकही बंदर गाठू शकलें नाहीं. असेंच एकादें वर्ष जातें न जातें तोंच त्याना सक्करहून पुन्हां आजोळीं यावें लागलें; व शिक्षणाला

रामराम ठोकून एका पटवेगाराच्या हाताखालीं शिकाउमास राहूं लागले. ह्या धंद्याबरोबरच हिशेबादिकांचे शिक्षणही घ्यावें लागले. मात्र त्याच्या आजोबांनीं विरोध केला नसता तर जन्मभर पटवेगिरींतच आयुष्य कंठण्याची पाळी त्यांच्यावर आली असती. ज्योतिषावर विश्वास असल्यामुळें त्यांच्या आजोबांना त्यांच्या पत्रिकेवरून असें वाटलें कीं, हा मुलगा म्लेंच्छ-विद्येमुळें पुढें आपलें नांव काढणार! तसाच त्याच्या शिक्षकाकडूनही दुजोरा मिळताच सरकारी शाळेंत पुन्हां त्यांचें नाव दाखल करण्यांत आलें; व या मुलानें तें भविष्य मुळींच फोल ठरूं दिलें नाहीं. तिसऱ्या व चौथ्या या दोन्ही इयत्तांतच त्यानें पहिला नंबर पटकावला.

पुढें पांचव्या इयत्तेंतील शिक्षकांचे व त्याचे पटत नसे. वर्गांत येण्यास शिक्षकांना एकदां उशीर झाल्यामुळें या छोट्या बाळरूपानें त्याचा तास घ्यायला सुरवात केली. हा आपला अपमान झाला असें वाटून त्यांनीं त्याला वर्गांत बसायला बंदी केली. याचें पर्यवसान कुसंगति व उनाडकीत झालें. शाळा चुकवून खुशाल उनाडणें, गोट्या खेळण्या, पतंग उडवणें असा कार्यक्रम सुरूं झाला. त्यामुळेच या 'धावा'नें पाहीं फर्दत नाव मिळविलें.

कुसंगतीमुळें बिघडलेल्या आपल्या भाचाला कुठल्या तरी धंद्यात अडकवून मार्गावर आणण्यासाठीं त्याचे वधु लाला गोवर्धनदास यांनीं त्याला आपल्याकडे नेलें. अमृतसर जिल्ह्यांतील मजोटा गांवीं ते एका शाळेचे मुख्याध्यापक होते. हिंदूंचें पुढारीपणही त्यांच्याचकडे होतें. तेथील हिंदुमुसलमानांच्या जातीय वैरामुळें मुसलमानांचा नक्षा उतरविण्यासाठीं त्या समाजानें बळकावलेल्या शिंप्याच्या धंद्यांत आपल्या भाच्यास घालून एक हिंदु शिंपी तयार करण्याचें त्यांनीं ठरविलें. पुढें डॉक्टरसाहेबांनीं एका मुसलमान शिंप्याकडे उमेदवारी करून व इतर दोन तीन ठिकाणीं राहून ती कला आत्मसात् केली. पण शिंपी होण्याच्या या योजनेला पडिलाचा

निरोप हिमून आला नसता तर डॉक्टरसाहेब फार तर लाहोरांतील एका टेलरिंग फर्मचे मालक झाले असते. पण योगायोग काहीं वेगळाच होता. त्यावेळीं त्यांचे वडील भावलपूर संस्थानांत दिवाण होते. ते सारखे फिरतीवर असल्यामुळें मुलाच्या अभ्यासाकडे त्यांचें फारच दुर्लक्ष झालें. पण आपला मुलगा शिंपी व्हावा ही कल्पना त्यांना मुळींच पसंत नव्हती. वयाच्या पंधरा वर्षांपर्यंत अवघ्या चारच इयत्ता पुऱ्या झाल्यामुळें त्यांची शैक्षणिक प्रगति जवळजवळ खुंटल्यासारखीच झाली असली तरी वेळोवेळच्या प्रामान्तरामुळें व निरनिराळ्या धंद्याच्या उमेदवारीमुळें पुष्कळांच्या ओळखी, अनुभव व मनुष्यस्वभावाचें ज्ञान ह्याची मात्र पुष्कळच भर पडली; व याचा फायदा त्यांना पुढील आयुष्यांत बराच मिळाला.

वडिलांना वाटे आपल्या मुलानें खूप शिकून नांव मिळवावें; म्हणून त्यांनीं शिंप्याच्या धंद्यांतून काढून परत शाळेंत त्याचें नांव दाखल केलें. पुन्हा संधि मिळताच त्याच्या बुद्धिमत्तेला बराच वाव मिळाला व लवकरच त्यांनीं हुशार विद्यार्थी म्हणून नांव मिळवून शिष्यवृत्ति व बक्षिसें मिळविलीं. संध्याकाळीं फावल्या वेळेंत शिंप्याचें काम करून जे पैसे मिळत त्यांतून पुस्तकें व कपडे याचा खर्च परस्पर भागूं लागला. अभ्यास व व्यवसाय यमुळें व्यायामाकडे थोडें दुर्लक्षच झालें. पुढें आमच्याकडील इंग्रजी पाचव्या इयत्तेच्या बरोबरीच्या पंजाब विश्वविद्यालयाच्या 'मिडल् स्कूल इक्झॅमिनेशन' नांवाच्या परिक्षेस १९०२ सालीं बसून त्या परिक्षेस बसलेल्या आठ हजार उमेदवारांत त्यांनीं पहिला नंबर पटकावला व त्याबरोबरच बरींच बक्षिसें व दोन वर्षे टिकणारी एक शिष्यवृत्ति मिळविली. यामुळें पुढील शिक्षण घेणें थोडें सुलभ झालें. प्रतिकूल परिस्थितींत देखील त्यांनीं चालू ठेवलेलें शिक्षणक्रम लक्ष्यांत घेता बालपणापासूनच त्यांची चिकाटी व तीव्र बुद्धिमत्ता याची साक्ष पटते.

शाळेंत असतांना केवळ पुस्तकांतला किडा न राहतां आर्यकुमारसभा, सेल्फ इम्प्रूव्हमेंट क्लब इत्यादि सभांच्या चिटणिसाचें तें काम करीत असत; व जाहीर व्याख्यानांत देखील भाग घेऊन आपलें वक्तृत्व गाजवीत. अभ्यास, वाचन, सभा-संमेलनें यांतच वेळ जाऊं लागल्यामुळें व्यायामाकडे जें एकदां दुर्लक्ष्य झालें तें कायमचेंच! सार्वजनिक कार्यांत बराच वेळ घालवीत असूनही केवळ हुशारी व बुद्धिमत्तेच्या जोरावर मॅट्रिकच्या परीक्षेंत उत्कृष्टपणें पास होऊन दरमहा १२ रुपयांची शिष्यवृत्ति त्यांनीं मिळविली व उच्च शिक्षणासाठीं लाहोरच्या सुप्रसिद्ध 'दयानंद ॲंग्लो वेदिक कॉलेजा'त नांव दाखल केलें.

तरुणांचा पुढारी व हुषार विद्यार्थी असा बराच गाजावाजा झाल्यामुळें पुष्कळ मुली 'सांगून' येऊं लागल्या. त्यांतील उच्च क्षत्रिय दिवाण रणजितराय यांच्या ज्येष्ठ मुलीस पसंत करून वाङ्‌निश्चयही झाला; पण बी. ए. ची परीक्षा होईपर्यंत लग्नाच्या वाटाघाटीच चालू होत्या. ह्याच सुमारास विलायतेस जाण्याची संधि प्राप्त झाली असतांना भावी श्वशुराच्या सनातनी मतामुळें मोडता घातला गेला व ही आयती चालून आलेली संधि मात्र गमवावी लागली.

कॉलेजांत असतांना प्रि. हंसराज, प्रो. गोकुळचंद, प्रो. भाई परमानंद वगैरे थोर व्यक्तींच्या सहवासाचा परिणाम डॉ. साहेबांच्या जीवनावर बराच झाला. कॉलेजांत देखील त्यांनीं अभ्यासांत नांव मिळविलेंच, शिवाय, 'यंग मेन्स आर्यसमाज', गुरुकुल विभागाच्या आर्यकुमार सभा, कॉलेजांतील वादविवाद मंडळें, पाठ्यतरें वगैरे कार्यक्षेत्रांत व तसेंच 'मुलतान विद्यार्थी संघा'चे संचालक, कॉलेज वसतिगृहाच्या ह्याचे व्यवस्थापक म्हणून बऱ्याच गोष्टींत ते पुढाकार घेत असल्यामुळें विद्यार्थ्यांचा पुढारी, कट्टर आर्यसमाजिस्ट व फर्डा वक्ता म्हणून त्यांची ख्याति झाली. कॉलेजांत असतांना फरीगदगा, अश्वरोहण, नौकाविहार, फुटबॉल वगैरे खेळ त्यांना अत्यंत आवडत

असल्यामुळें त्यात त्यांनीं बरेंच प्राविण्य मिळविलें होतें. मात्र टेनिस हा 'शामळूभटांचा खेळ' आहे अशी त्यांची समजूत असल्यामुळें त्यात त्यांची प्रगति झाली नाहीं.

त्यावेळीं बी. ए. च्या सर्तीच्या इंग्रजी विषयाखेरीज आणखी दोन ऐच्छिक विषय घ्यावे लागत त्यासाठीं त्यांनीं (१) इतिहास-अर्थशास्त्र व (२) रसायनशास्त्र या विषयांची निवड केली. हे विषय निवडताना देशाच्या उन्नति अवनतीची कारणपरंपरा नीट अभ्यासता येऊन आर्थिक परिस्थितीचें सांगोपांग ज्ञान व्हावें आणि ही आर्थिक स्थिति सुधारण्याला तात्त्विक ज्ञानाबरोबरच प्रायोगिक ज्ञानाची जोड मिळवावी हा हेतु होता. इतिहास-अर्थशास्त्राचा त्यांच्या पुढील आयुष्यात किती उपयोग झाला हें त्यांच्या चरित्रावरून कळून येईलच. शिवाय रसायनशास्त्राची त्यांनीं इतकी सुंदर तयारी केली होती कीं, अभ्यासाबरोबरच बी. ए. च्या विद्यार्थ्यांसाठीं रसायन शास्त्रावरील एक टिप्पणि-पुस्तक त्यांनीं तयार केलें. पण योग्यसा प्रकाशक त्यावेळीं न लाभल्यामुळें तें पुस्तक तसेंच अप्रकाशित राहिलें. अर्थशास्त्राचा प्राध्यापक म्हणून पुढें नाव मिळविताच रसायनशास्त्रावरील तो ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें मागें पडलें त्याची हस्तलिखित प्रत अद्याप त्यांच्या संग्रहीं आहे. विद्यार्थिदशेंतच आपले विषय निवडताना त्यांनीं आपलें ध्येय निश्चित केलें होतें. तसेंच परिक्षेची तयारी करतानाच लिहिलेलीं हीं टिपणें त्यांच्या सशोधक व चिकित्सक बुद्धिमत्तेची साक्ष पटवितात डॉक्टरसाहेबांनीं पुढील आयुष्यात जाडा विद्वान्, सामाजिक कार्यकर्ता, पहिल्या नंबरचा वक्ता म्हणून जें नाव मिळविलें त्याचीं बीजे त्यांनीं शाळाकॉलेजात असताना केवळ पुस्तकी किडा म्हणून न राहता निरनिराळ्या क्षेत्रात भाग घेऊन आपल्या अंगच्या गुणाची जी सर्वांगीण उन्नति करून घेतली त्यातच पहावयास मिळतात.

मनुष्याच्या अंगातील सुप्तशक्तींचा विकास होण्यास त्याच्या आयुष्यातील चित्रविचित्र घटनेमुळे तशी संधि मिळावी लागते व अशा प्रसंगींच त्याच्या गुणाची खरी पारख होते. डॉक्टरसाहेबांना त्याच्या तारुण्यदशेंत प्राप्त झालेल्या अशाच एका गमतीदार प्रसंगाचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं.

हिंदुसमाजाची अत्यंत हलाखीची स्थिति पाहून त्यांचे वडिल लाला गोवर्धनदास यांना वीट आला व संन्यासी होऊन समाजसेवेचें काहीतरी कार्य करावें या हेतूनें ध्येयसाधनासाठीं त्यांनीं 'पीपल्स बँक ऑफ् इंडिया' मधील आपली नोकरी सोडली, कुटुंबाचा त्याग केला, व भगवीं वस्त्रें धारण करून योगाभ्यासासाठीं दूर कोठें तरी ते निघून गेले. वडील भावाच्या ह्या कृत्यानें हवालदील झालेल्या त्यांच्या भावजयीची व तिच्या छोट्या दोन मुलींची झालेली अवस्था पाहून सर्वांच्याच मनाला धक्का बसला. अशा विचित्र परिस्थितींत त्यांना संन्यस्तवृत्तीपासून परावृत्त करून आणण्याची जबाबदारी सर्व वडील मंडळींनीं डॉक्टरसाहेबांच्यावर टाकली. उन्हाळ्याची सुटी सुरू झाली असल्यामुळें अधिक वेळ न दवडतां त्यांच्या तपासासाठीं डॉक्टरसाहेबांची स्वारी निघाली. त्यांच्या वडिलांनीं जाता जाता वाटेंत बऱ्याच ठिकाणीं व्याख्यानें दिलीं असल्यामुळें त्यावरून त्यांचा माग काढीत काढीत लाहोरहून बरेली, लखनौ, अलाहाबाद, काशीपर्यंत त्यांनीं प्रवास केला. तेथें त्यांच्या भावाच्या एका मित्राकडून कळलें कीं, 'योगानंद' हें नाव धारण करून त्यांच्या वडिलांनीं अल्मोऱ्यास मुक्काम केला आहे. पुन्हा परत बरेली करून काठगोदामला ते आले. तेथें जाऊन समनगमनासाठीं एक नोकर गाठून अल्मोऱ्यापर्यंतचा प्रवास त्यांना पायीं करावयाचा होता. वाटेंत एका डोंगरशिखरावर वसलेल्या अशा नितांत रमणीय नैनितालच्या एक दिवस मुक्काम करून ते अल्मोऱ्यास पोंचले; व तेथें त्यांनीं आपल्या भावाचा शोध केला. तेव्हां त्याचे वडिल तेथून ६५ मैलांवर असलेल्या रामकृष्ण मिशनच्या

मायावती आश्रमास गेल्याचें कळलें पुन्हा त्यानीं मायावतीस जाण्याची तयारी केली हिमालयाच्या उंचउंच पर्वतश्रेणीच्या उदरात वसलेलें वेदान्त सोसायटीचें हें मायावतीचें ठिकाण एकान्त, अभ्यास, योग, समाधि, इत्यादींचा अनुपमेय आनंद अनुभविण्यासाठीं कलाशोधक मानवी दृष्टीनें निसर्गातून निवडून काढलेला एक अजब नमुनाच! अशा ठिकाणीं आपला पोशाख पाहून तेथील तपस्वी व योगाभ्यासी लोक आपणावर बहिष्कार घालतील म्हणून तें टाळण्यासाठीं त्यानीं आपला शर्ट, धोतर, व रुमाल टाकून घेतला टोंगर पठारातून तीन दिवस प्रवास करून साधूच्या वेषात ते मायावतीस पोंचले तेथें गेल्यानंतर त्या दिवशीं एका वृद्ध इंग्रज बाईचा पाहुणचार घेतला साऱ्या मायावतींत ती 'मदर' या नावानें ओळखली जात असे कांहीं वेळ आश्रम पाहिल्यानंतर आपल्या वधूचा तपास काढून त्यानीं विचारविनिमयासाठीं त्याना एकान्तस्थळीं नेलें, नंतर घराकडील हकिकत सांगून युक्तिप्रयुक्तीनं 'आईबापाना संतुष्ट करणें व वृद्धाचें रक्षण करणें' हेंच आपलें आद्य कर्तव्य आहे हें त्याच्या मनावर बिंबविलें आणि 'मदर' व त्याना पूज्य असलेल्या स्वामीजींना खरीखुरी हकिकत समजावून दिली मग त्यानी देखील त्याच्या मातांचें मन वळविलें अशारीतीनें हातीं घेतलेल्या कामात यश मिळवून साधुवेषास रजा देऊन डॉ बाळकृष्ण लाहोरास परत आले त्या कार्यानें आपल्याला शेंकडो मैल प्रवास पायीं सहज करता येईल व अंगावर घेतलेलें कार्य चतुराईनें तडीस नेता येईल असा आत्मविश्वास उत्पन्न झाला वरील कार्य जर त्याच्यावर सोंपविलें नसतें तर आपल्यात सुप्तावस्थेंत असलेली हा शक्ति अजमाविण्याची संधि त्याना मिळाली नसती हेंस!

### समाजकार्य

१९०७ सालीं बंगालच्या फाळणीमुळें व कर्झनशाहीमुळें साऱ्या हिंदुस्थानांत जी एक असंतोषाची लाट पसरली व या जुलमाचा

प्रतिकार करण्यासाठीं व लोकांत जागृति उत्पन्न करण्यासाठीं निरनिराळे राजकीय संघ स्थापन करण्यांत आले, त्यांतील 'भारतमाता' संघ स्थापण्यांत डॉ. बाळकृष्णांनीं पुढाकार घेतला होता. या सुमारास ना. गोखले यांनीं दे. भ. लाला लजपतराय यांच्या समवेत दौरा काढून आपलें ओजस्वी भाषण, अपूर्व देशभक्ति, स्वार्थत्याग, व उज्ज्वल चारित्र्य यामुळें शेंकडों विद्यार्थ्यांमध्यें देशसेवेची जी स्फूर्ति उत्पन्न केली त्याचा डॉक्टरसाहेबांच्या मनावर अत्यंत परिणाम होऊन ब्यू. बी. ए. च्या परिक्षेनंतर लगेच मुलतान येथें राजकीय सभा ते स्वतःच्या जबाबदारीवर पार पाडूं लागले. पुढें पुढें सरकारच्या दडपशाहीमुळें जालच खवळलेल्या लोकांच्या सभा शिस्तीनें चालविणारा कोणीतरी पुढारी हवा होता; त्यावेळीं देखील डॉक्टरसाहेबांनीं पुढाकार घेऊन सभा बोलाविण्याचें व लोकजागृतीचें कार्य चालू केलें. पण मध्यंतरीं हिंदुमुसलमानांची तेढ वाढूं लागली व हिंदुमुसलमानांचे दंगे होण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच हा दुहीचा फायदा घेऊन सरकारनें वृद्ध पुढाऱ्यांना दंगा टाळण्यासाठीं तरुण हिंदूंना आवरण्याचा सल्ला दिला व त्यांनीही ही चळवळ आवरून डॉक्टरसाहेबांना मुलतान सोडून बाहेर जाण्याचा कळकळीनें उपदेश केला.

या चळवळीमुळें डॉ. बाळकृष्ण हे मुलतानचे एक पुढारीच गणले जाऊं लागले. 'याचें सारें श्रेय कै. नामदार गोखल्यांच्या वक्तृत्वाला व त्यांच्या अल्प सहवासांत मिळालेल्या स्फूर्तीला आहे' असे कृतज्ञतेचे उद्गार ते वेळोवेळीं काढत; व त्यांना ते आपला राजकीय गुरु मानीत. ज्या कॉलेजांतून ना. गोखले तयार झाले त्याच कॉलेजचा आटरा वर्षें प्रिन्सिपॉल होण्याचें भाग्य त्यांना पुढें लाभावें हीही एक योगायोगाचीच गोष्ट नव्हे काय! त्यांचे वडील बंधुदेखील राजकीय क्षेत्रांत काम करीत असल्यामुळें आपण दोघांनीं निरनिराळ्या क्षेत्रांत कामें करावीं या इच्छेनें

त्यांनी राजकारणातून अंग काढून घेऊन धार्मिक व समाजकार्याला स्वतःला वाहून घेतलें १९०७ मध्यें राजकारणातून जें एकदा अंग काढून घेतलें तें कायमचेंच! त्यानंतर त्यांनी राजकीय चळवळींत एकही व्याख्यान दिलें नाहीं कीं भागही घेतला नाहीं.

१९०८ सालीं संयुक्त प्रांतात जो भयंकर दुष्काळ पडला त्यावेळीं आपल्या देशबांधवांना संकटात मदत करण्यासाठीं लाला लजपतरायांनीं स्वयंसेवकांच्या निरनिराळ्या सेना उभारल्या. त्यातील लखनौ व लखिमपूर या जिल्ह्यातील तुकडीचे प्रमुख म्हणून डॉक्टरसाहेबांची नेमणूक झाली यावेळीं पंडित मदनमोहन मालवीय यांच्याशीं परिचय घडून आल्यामुळें स्वार्थत्यागपूर्वक देशसेवा करण्याचें त्यांचें ध्येय जास्तच दृढ झालें अशावेळीं पाला व कुजकें मासकें काहींही खाऊन जीव जगविणाऱ्या दुष्काळ पीडितांची दुःस्थिति व हिंदुस्थानातील दारिद्र्य यांच्या मूर्तिमंत भेसूर चित्राचें सूक्ष्म निरीक्षण करण्याची त्यांना संधि मिळाल्यामुळें भारतीय अर्थशास्त्राचा खोल अभ्यास करण्याची त्यांना ज्यास्तच तळमळ लागली.

## गुरुकुल

बी ए नंतर एम्. ए च्या अभ्यासासाठीं त्यांनीं 'लाहोर गव्हर्मेंट कॉलेजां'त नाव घातलें व तेथेंही नाव गाजवून वक्तृत्वाचीं बरींच पहिलीं बक्षिसें पटकाविलीं इतर कार्यक्रमातच सारा वेळ जात असल्या-मुळें शेवटच्या अवघ्या तीन महिन्यातच अभ्यास करून इतिहास व अर्थशास्त्रात पहिला व युनिव्हर्सिटींत दुसरा नंबर मिळविला. यावेळीं त्यांनीं लाहोर येथें हिस्टॉरिकल सोसायटी नावाची संस्था स्थापिली. सरकारी नोकरी न पत्करण्याच्या त्या वेळच्या त्यांच्या ठाम निश्चयानीमुळें एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनरच्या परिक्षेस बसण्याची व क्रिमिनगडच्या

राजेसाहेबांची खासगी चिटणिसाची जागा मिळण्याची संधि त्यांनी त्यागिली. पाश्चात्य पद्धतीवर युनिव्हर्सिटीनें आखलेला अभ्यासक्रम पसंत नसल्यामुळे यावेळीं टी. ए. व्ही. कॉलेजांतील चालून आलेली नोकरी लाथाडून आचार्य मुन्शीराम (स्वामी श्रद्धानंद) यांना त्यांच्या कांगडी येथील गुरुकुलास जाऊन मिळण्याचा आपला मनोदय कळवून मार्च, १९०९ पासून इतिहास व अर्थशास्त्राचा प्राध्यापक या नात्यानें ते तेथें काम करूं लागले. त्यानंतर अवघ्या सात महिन्याच्या अवधींतच श्री स्वामी श्रद्धानंदांच्या गैरहजरींत त्यांना आचार्य व मुख्य अधिष्ठाता (Governor) नेमण्यांत आलें. या जागेवर वर्षभर काम केल्यावर पुढें दहा वर्षे उपाचार्य (Vice-Principal) या नात्यानें शिक्षण खातें त्यांच्याकडे सोंपविण्यांत आलें. मध्यंतरीं कांहीं दिवस त्यांनी शेतकीचे प्राध्यापक (Professor of Agriculture) या नात्यानें देखील काम केलें होतें.

पाश्चात्य शिक्षणपद्धतीवर उभारलेल्या शिक्षणपद्धतीपेक्षा गुरुकुलांतील शिक्षणपद्धतीच त्यांना विशेष श्रेयस्कर व उपयुक्त वाटली. याचीं कारणें म्हणजे तेथील मातृभाषा हेंच माध्यम; अध्यापक व विद्यार्थी यांचा निकट सहवास; प्राचीन ग्रंथ, प्राचीन भाषा, व हिंदु संस्कृतीच्या अभ्यासाला प्राधान्य; विद्यार्थ्यांच्या शारीरिक व अध्यात्मिक वाढीकडे, व ब्रह्मचर्याकडे विशेष लक्ष्य; आणि निरनिराळ्या शास्त्रांच्या व उद्योगधंद्यांच्या अभ्यासाला विशेष उत्तेजन, हीं होत.

लॉर्ड मेस्टन, सॅडलर कमिशनचे सभासद, म० गांधी, प० मालवीय, लाला लजपतराय, रॅम्से मॅक्डोनल्ड, लॉर्ड चेम्सफर्ड, लॉर्ड पॅसफील्ड वगैरे वडया वडया गृहस्थांनीं डॉक्टरसाहेब तेथें असतांना गुरुकुलाला भेटी दिल्या. या लोकांना इतिहास व अर्थशास्त्र या विषयांत विशेष गम्य

त्यांच्या फोटोवरून तो डॉक्टरसाहेबांचाच असेल अशी कुणाला कल्पना देखील येत नाही. त्यावेळीं त्यांना संस्कृत वाङ्मयाचा, इतिहास व समाजशास्त्रच्या सखोल अभ्यास करण्याची संधि मिळाली. त्याचा त्यांनीं वेळोवेळीं दिलेल्या हिंदुसंस्कृतिविषयक व्याख्यानांत पुरेपूर फायदा करून घेतला. याची जिवंत साक्ष त्यांचीं, 'क्या वेद ईश्वरीय ज्ञान है?', 'आर्यो की वैज्ञानिक उन्नति', 'अग्निहोत्र व्याख्या', 'प्राचीन भारत की राज्यप्रणाली', 'Hindu Philosophers on Evolution' वगैरे प्रकाशित; व 'शुक्रनीति', 'Vedic Psalms' ही अप्रकाशित पण पूर्णावस्थेतील पुस्तकें पूर्णपणें पटवून देतात.

ठिकठिकाणच्या व्याख्यानांव्यतिरिक्त दरसाल हरिद्वार येथें यात्रेच्या व उत्सवाच्या प्रसंगीं प्रचंड जनसमुदायापुढें आर्यसमाजाच्या प्रचारार्थ त्यांना व्याख्यानें द्यावी लागत, तीं निराळींच! तेथील प्रसंगविशेषीं असह्य असलेल्या गारठ्यामुळें व व्याख्यानांमुळें त्यांच्या फुफुसावर व शरिरावर परिणाम होऊन १९१४ च्या हिंवाळ्यांत पुढें जन्मभर सोबत करणारा व त्यांच्या सुदृढ प्रकृतीचें शरीर सारखा पोखरत राहाणारा दम्याचा विकार त्यांना जडला.

गुरुकुलांतील काम संभाळून त्यांनी वर उल्लेखिलेली पहिली चार पुस्तकें, 'अर्थशास्त्र', 'भारतवर्षका संक्षिप्त इतिहास', 'स्वराज्य', 'भारत के सौ राजराजेश्वर', 'आर्यसन्ध्या' वगैरे हिंदी; व 'Industrial Decline in India' हा इंग्रजी, असे ग्रंथ लिहिले.

कोगाळादी हेवा वाटावा अशी डॉक्टरसाहेबांची कौटुंबिक परिस्थिति होती. त्यांची पत्नी अलंत साउस व साध्वी होती. पण कोगाळादी सुखी संसार चालूं न देण्याचा निश्चय उचललेल्या दैवाला हें पाहवलें नसावें. १९१८ च्या सप्टेंबरमध्यें सिमल्यांत प्रेक्षणीय स्थळें पाहाण्याकरितां

गेल्यावेळी त्यांच्या पत्नींना मलेरियानें पछाडल्यामुळें त्यांना एका मित्रा-बरोबर मुद्दामास पाठवून डॉक्टरसाहेब केप येथें आर्यसमाजाच्या वार्षिक उत्सवासाठीं गेले. एकदोन दिवसांत पत्नी अत्यवस्थ असल्याची तार आली. अशा स्थितींत देशीळ आर्यसमाजाचें कार्य आटोपून ते परत आले, तों जिवाभावाची सोबतीण आतां घटकेचीच राहिली होती. समाजसेवेपुढें पत्नीच्या शुश्रूषेकडे त्यांना फारसें लक्ष देतां आलें नाहीं. मात्र त्यांना तिला कायमचें मुकावें लागले. कौटुंबिक आपत्तीचा हा वसलेला पहिला घाव डॉक्टरसाहेबाना फारच जाणवला. घरीं चार पोरकी पोरें! तीन मुली व एक मुलगा! 'गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते' ह्याचा त्याना अनुभव येऊं लागला. दुःखातच सुख म्हणजे ह्या मुलांचा संभाळ करायला त्यांची आई जिवंत होती. अशा वेळीं रिकाम्या वाटाला म्हणून मयाण वाटणारें घर सोडून कोठेंतरी दूर जावें असे विचार त्याच्या मनात येऊं लागले; व यांतच विलायतेला जाण्याची त्यांची कल्पना जास्तच दृढ होत गेली.

विलायतेस जाऊन केवळ पदवी संपादन करावी हा त्यांचा हेतु नव्हता. त्यावेळीं नुकतेंच महायुद्ध संपलें असल्यामुळें युद्धोत्तर युरोपची पहाणी करावी; तेथील राष्ट्रांनीं आपली घडी पूर्ववत् बसण्यासाठीं चालविलेल्या योजनांचा अभ्यास करावा; शिक्षणसंस्थांची पहाणी करावी; तेथील आर्थिक व सामाजिक परिस्थितीचें निरीक्षण करावें; अशा विविध हेतूंनी त्यांनीं ही सफर करण्याचें ठरविलें. अशांतच त्यांना जडलेला दम्याचा विकार बळावल्यामुळें स्वतःचें व कर्जाऊ म्हणून जमविलेले सोळा हजार रुपये त्यांना या सफरींत खर्चावे लागले.

डॉक्टरसाहेबांच्या उत्तर व दक्षिण हिंदुस्थान येथील वास्तव्यांतील कार्याचे स्थूल मानानें भाग पाडायचे झाल्यास गुरुकुल सोडून विलायतेस

जाईपर्यंतचें उत्तर हिंदुस्थानातील कार्य हा पूर्वार्ध, इग्लंडांतील अडीच वर्षांचें वास्तव्य व कार्य हा मध्यंतर, व दक्षिण हिंदुस्थानातील, विशेषतः कोल्हापुरातील कार्य, हा उत्तरार्ध मानावयास हरकत नाहीं.

*　　*　　*　　*

## मध्यन्तर

पन्नाच्या सदतीस वर्षांपर्यंत सुटाबुटाचा संपर्कही नसलेल्या ह्या गुरुकुलांतील दाढीदीक्षिताला प्रथमच मुंबईंत तयार करवून घेतलेला सूट कसाबसा चढवून बोटीवर वावरावें लागे. बोटीवर असतांना एक कारुण्यपूर्ण गमत घडून आली. डॉक्टरसाहेबांच्या बरोबर एक लाहोरचे दाढीविरहित मुसल्मान प्रोफेसर होते. दर्यावरील हवा न मानवल्यामुळें दोघेही केबिन सोडून बाहेर फारसे पडत नसत. त्यातच ते प्रोफेसरसाहेब हृदयक्रिया बंद पडून वारले. जोडीदाराच्या आकस्मिक मृत्युमुळें केबिन मयाण वाटू लागली म्हणून त्यांनी ती बदलली. थोडे बरे वाटू लागताच दाढीला फाटा देऊन ते नव्या पोषाखांत वावरू लागले. दाढीवाले प्रोफेसर न दिसल्यामुळें तेच वारले असावेत अशा समजुतीनें बोटीवरील लोक डॉक्टरसाहेबांच्याकडे मृताची पृच्छा व सांत्वन करण्यास येत. डॉक्टरसाहेबांना हसू आवरत नसे होई. शेवटीं दाढीवाले प्रोफेसरच निजत होऊन नव्या स्वरूपांत आपल्यापुढें अवतरले आहेत असें सांगून त्यांनी आपली सुटका करून घेतली.

बोटीवर असतांना दम्यानें उचल खाल्ली व लंडनच्या गारठ्यानें त्यांत जास्तच बिघडून त्यांत न्यूमोनियाची भर पडली. 'प्रथम ग्रासे मक्षिका' या न्यायानें प्रारंभीच महिना दीड महिना त्यांना अंथरुणाला खिळून राहावें लागलें. पण तेथील नामांकित डॉक्टरांनी—'यमराज

सहोदरांनी'—आपल्या भाराची चांगलीच पाठ पुरविल्यामुळें डॉक्टर-साहेबांची त्यातून सुटका झाली.

पुढें विलायतेंतील जीवनक्रमाचा परिचय करून घेण्यात व पदवी परिक्षेच्या अभ्यासाची पूर्व तयारी करण्यात कांहीं महिने घालविल्यावर उन्हाळ्याच्या सुटीचा फायदा घेऊन त्यांनीं युद्धोत्तर फ्रान्समधील परिस्थितीची पहाणी करण्यासाठीं फ्रान्सचा एक दौरा काढला युद्ध-भूमीवरील भयंकर व उद्वेगजनक वातावरण आणि पॅरिस शहरातील चैनी व विलासी वातावरण यातील विरोध त्यांना फारच जाणवला. कारण त्यावेळीं युद्धामुळें युरोपियन राष्ट्रांतील नैतिक बंधनें जास्तच शिथिल झालेलीं आणि मिळालेल्या अपूर्व विजयामुळें रंगेलपणानें तर परिसीमाच गांठलेली दिसून आली

इंग्लंडमध्यें असतांना डॉक्टरसाहेबांना वेगवेगळ्या ठिकाणाहून व्याख्यानासाठीं आमत्रणें येत सोबत, वाटखर्च वगैरे मिळत असल्यामुळें त्या निमित्तानें त्यांचा दुहेरी फायदा होई. हीं वेगवेगळीं ठिकाणें व तेथील आर्थिक व सामाजिक परिस्थिती याची पहाणी करायला मिळून इंग्लंडला जाण्याचा त्याचा एक हेतु अनायासें सफल होई दुसरें असें कीं, या व्याख्यानातून आर्यसंस्कृतीचा प्रसार करण्याचें कार्य सुकर होई. अशा रीतीनें त्यांनीं लंडन, ऑक्सफोर्ड, केंब्रिज, लिव्हरपूल, मँचेस्टर, एडिंबरो, ब्लॅकबर्न, पॅडिंग्हॅम इत्यादि ठिकाणीं आर्थिक व धार्मिक विषयावर व्याख्यानें दिलीं पीएच् डी च्या परिक्षेसाठीं सादर केलेला प्रबंध 'Commercial Relations between India and England' हा तयार करण्याच्या कामीं त्यांना अनायासें ह्या दौऱ्याचा फायदा झाला तो निराळाच! डॉक्टरसाहेबांच्या ह्या प्रबंधाची इतकी वाखाणणी झाली कीं इंग्लंडमधील एका प्रसिद्ध प्रकाशकानें त्याच्या प्रकाशनाची परवानगी

मागितली' व त्यांतील काहीं विधानें गाळून टाकण्याची अट घातली. त्याला डॉक्टरसाहेबांनीं, आपल्या प्रत्येक विधानाला ऐतिहासिक पुरावा असल्याचें सांगून, आहे त्या स्थितींत प्रकाशन करावयाचें असल्यास करावें, असें रोखठोक उत्तर दिलें. पुढें तेथील सुप्रसिद्ध Routledge & Son, London या कंपनीनें तें पुस्तक प्रसिद्ध केलें. लंडन येथील स्कूल ऑफ इकॉनॉमिक्सच्या पाठ्य पुस्तकांत त्याचा अंतर्भाव केला आहे.

डॉक्टरसाहेबांनीं विलायतेंत आर्यसंस्कृतीचें श्रेष्ठत्व व आर्थिक परि-स्थिति याबद्दलचीं व्याख्यानें तर दिलींच, शिवाय, कित्येक चर्चमधून वेद, भगवद्गीता व उपनिषदांतील विश्वव्यापी तत्वाचें निरूपण करण्यासाठीं प्रवचनेंही केलीं. तेथील फेबियन सोसायटी, लेबर कॉलेज व कामगार संस्था यांनीं हिंदी प्रश्नांवर त्यांचीं व्याख्यानें करविलीं. त्यांच्या व्याख्यानाला जमणाऱ्या श्रोतृसमुदायाला एक हिंदी गृहस्थ आपल्या हिंदुतत्त्वज्ञानाचा उघपणा परकी भाषेंत अस्खलित रीतीनें पटवीत असल्याचें पाहून अचंबा वाटे. एवढ्यावरच न थांबता सन १९२० च्या ऑक्टोबर महिन्यांत त्यांनीं आर्यसमाजसंस्थापक स्वामी दयानंद यांची पुण्यतिथि लंडन येथें लॉर्ड मेस्टन यांच्या अध्यक्षतेखालीं अत्यंत थाटानें साजरी केली, व सत्यार्थ-प्रकाशाच्या इंग्रजी प्रती मोफत वाटून आर्यसमाजाचें प्रचारकार्य केलें.

१९२० च्या डिसेंबरमध्यें हेज (Hayes) येथें ग्रेटब्रिटनमध्यें शिक्षण घेत असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांचें संमेलन भरलें होतें. अध्यक्षस्थानीं मिसेस सरोजनी नायडू या होत्या. त्या प्रसंगीं मी महमदअलींनीं 'पॅन-इस्लामिझम्' (दक्षिण व पश्चिम आशियांतील मुसलमानांचें अधिराज्य स्थापण्याच्या योजने) वर एक व्याख्यान दिलें. मी. महमदअलींनीं सदर व्याख्यानांत मुसलमानांबद्दलचा आपला ज्वाज्वल्य अभिमान व्यक्त करून धर्मप्रसारार्थ मुसलमानांनीं जुलुमजबरदस्ती मुळींच केली नाहीं अशी

मिथानें केली. त्यांच्या मायगाला त्याच सभेंत डॉ. बाळकृष्णांनीं जोरदार विरोध करून त्यांचीं विधानें कशी धादांत खोटीं आहेत हें सिद्ध करून दाखविलें. शेवटीं श्री. नायडूंनीं दोघांच्या मतांत तडजोड करण्याचा प्रयत्न केला, पण डॉक्टरसाहेबांचीं त्यावेळीं व्यक्त केलेलीं मतें शेवटपर्यंत तशींच राहिलीं. बॅ. जिनाच्या पाकिस्तान योजनेवर लिहिलेल्या डॉक्टरसाहेबांच्या लेखावरून हें स्पष्ट दिसून येतें. पण तो लेख त्यांच्या शेवटच्या आजारामुळें तसाच अप्रकाशित राहिला.

तसेंच विलायतेंत असताना लीडस् युनिव्हर्सिटीचे उपकुलगुरु सर मायकेल सॅडलर यांचें शिफारसपत्र घेऊन त्यानीं बहुतेक सर्व विश्वविद्यालयाना व रग्बी, ईटन वगैरे शतकानुशतकें प्रसिद्ध असलेल्या शाळांना भेटी देऊन तेथील शिक्षणपद्धतीचें सूक्ष्म अवलोकन केलें. शेती सुधारणेचें मर्म समजावून घेण्यासाठीं सरकारी शेतें, मळे, दुग्धालयें, पोल्ट्री फार्म, शेतकी व गुरांचीं प्रदर्शनें पाहिलीं; एकाहून एक सरस असे सहस्रावधि औद्योगिक कारखाने पाहिले; लँकेशायर, शेफील्ड, ग्लासगो वगैरे शहराना भेटी दिल्या; ब्रिटिश म्यूझियम्, इंडिया ऑफिस, पब्लिक रेकॉर्ड ऑफिस्, कस्टम हाउस्, लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स, बोर्ड ऑफ ट्रेड वगैरे संस्थात दोन वर्षे वाचनांत घालविलीं; व अखेर १९२२ च्या फेब्रुवारी महिन्यांत लंडन युनिव्हर्सिटीची पीएच्. डी. ही पदवी मिळवून ते मायभूमीस परत आले.

डॉक्टरसाहेबांच्या गाढ विद्वत्तेबद्दल व व्यासंगाबद्दल जास्त कांहीं एक न लिहितां लंडन युनिव्हर्सिटींतील कॉमर्सचे प्राध्यापक ए. जे. सार्जंट व लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्सचे डिरेक्टर डब्ल्यू. एच्. बीव्हरिज् यांनीं त्यांच्याबद्दल काढलेले उद्गार कोणालाही पटण्यासारखेच असल्यामुळें तेच येथें देतों:—

"He (Dr. Balkrishna) seems to me to possess a somewhat unusual capacity for economic analysis, together with a reasonably scientific balance of mind....................Mr. Krishna's acquaintance with the special economic conditions of India is undoubtedly of the widest. He has, moreover, an unlimited appetite for hard work and his work is directed with intelligence. He can express himself in English both fluently and clearly and has very definite ideas as to the character and scope of any subject which he is handling."

*　　*　　*　　*

## उत्तरार्ध

### राजाराम कॉलेज

सन १९१९ च्या प्रारंभीं कै. छत्रपति राजर्षि शाहू महाराजांनीं राजाराम कॉलेज व राजाराम हायस्कूल या शिक्षणसंस्था आर्यसमाजाच्या व्यवस्थेखालीं द्यावयाच्या ठरवून त्या संबंधींच्या विचारविनिमयासाठीं संयुक्त-प्रांत आर्यप्रतिनिधीसभेचें एक शिष्टमंडळ दिल्लीस असतांना बोलाविलें. या शिष्टमंडळांत डॉ. बाळकृष्ण हेही एक होते. बऱ्याच वाटाघाटीनंतर या शिक्षणसंस्था आर्यसमाजाच्या स्वाधीन करावयाच्या असें ठरलें. राजाराम कॉलेजच्या प्रिन्सिपॉलची जागा प्रथम डॉक्टरसाहेबांनाच देऊं केली होती. पण त्यावेळीं विलायतेला जाण्याचा त्यांचा बेत नक्की झाला असल्यामुळें त्यांनीं ती नाकारली. पुढें १९२२ च्या मार्च महिन्यांत ज्यावेळीं ते विलायतेहून परत आले त्यावेळीं प्रिन्सिपॉल नेपाळसिंग यांची बादशाही सनदी नोकरींत नेमणूक झाली असल्यामुळें राजाराम कॉलेजच्या

प्रिन्सिपॉलची जागा पुन्हां रिकामी झाली. तेव्हां तीन वर्षांपूर्वी स्वतःच नाकारलेली जागा आर्यप्रतिनिधिसभेच्या विनंतीवरून त्यांनीं पुन्हां स्वीकारली. ता. १५ मे, १९२२ रोजीं ते कोल्हापुरास आले. नुकतेच श्री. राजर्षि शाहू महाराज दिवंगत झाले असल्यामुळें आर्यसमाजाला व त्याच्यावर सोंपविलेल्या कार्याला स्थैर्य प्राप्त करून देऊन खर्चांत येणारी तूट दरबारकडून आणखी मदत मिळवून भरून काढण्याची कामगिरी त्यांच्यावर सोंपविण्यांत आली. येथें आल्यानंतर प्रथम छत्रपति राजाराम महाराजांना भेटून वरील दोन शिक्षणसंस्थांच्या खर्चाच्या व्यवस्थेबद्दल त्यावेळचे दिवाण सर रघुनाथराव सबनीस व ॲक्टिंग दिवाण मे. बाळासाहेब गायकवाड यांच्याशीं त्यांनी वाटाघाट केली. तेव्हां राजाराम कॉलेजच्या खर्चासाठीं आणखी अकरा हजार रुपये व हायस्कूलसाठीं जादा पांच हजार रुपये मंजूर झाले. अशा रीतीनें आर्यसमाजाला त्यावेळीं दरसाल ४१ हजार रुपये मिळण्याची व्यवस्था झाली; व दोन्ही शिक्षणसंस्थांचें कार्य विशेष जोरात सुरू झालें. सुरवातीलाच दरबारची सर्वांगीण मदत मिळाल्यामुळें प्रारंभ तर छान झाला! डॉक्टरसाहेबांच्या कल्पकतेला दरबारचें वेळोवेळीं प्रोत्साहन मिळाल्यामुळें अवघ्या तीन वर्षांतच विद्यार्थ्यांची संख्या दुपटीनें वाढली. पुढें १९२६ मध्यें दिवाणबहादूर लठ्ठे यांच्या सल्ल्यावरून दरबारनें या शिक्षणसंस्था आर्यसमाजाकडून परत आपल्या ताब्यात घेतल्या. दिवाणबहादुरांच्या इच्छेप्रमाणें व आर्यप्रतिनिधींनें आपली संमति दिल्यामुळें फेब्रुवारी, १९२६ पासून आर्यप्रतिनिधिसभेऐवजीं दरबारचे नोकर म्हणून ते कॉलेजचें काम पाहूं लागले व आर्यसमाजातर्फें कॉलेजची झालेली त्यांची नोकरी दरबारच्या नोकरीस जोडून घेण्यात आली. पुढें कॉलेज शुक्लेंदुवत् दिवसेंदिवस वाढत चाललें. राजाराम कॉलेजांत ज्यावेळीं ते रुजू झाले त्यावेळीं विद्यार्थ्यांची संख्या १७० होती व त्यांच्या

मृत्युसमयीं तीच सख्या ९२० पर्यंत गेली. ही वाढ कौतुकास्पद नाहीं असें कोण म्हणेल? याचें पुष्कळसें श्रेय डॉक्टरसाहेबांना आहे यात शंकाच नाहीं. डॉक्टरसाहेबांच्या पूर्वी बरेच युरोपियन प्रिन्सिपॉल होऊन देखील ते आर्यसमाजाच्या ताब्यात येईपर्यंत ४० वर्षे सेकंड ग्रेड कॉलेजच होतें, आज तेंच राजाराम कॉलेज एम्. ए., एम्. एस्सी. पर्यंत संपूर्ण शिक्षण देणारें (फर्स्ट ग्रेड) कॉलेज म्हणून गणलें जात आहे. "The biggest college on this side of Poona" असें अभिमानानें म्हणायला लावण्याचें व कोल्हापुरला शैक्षणिक क्षेत्रात पुण्यामुंबईच्या खालोखाल आणून बसविण्याचें बरेंचसें श्रेय त्याच्या जबरदस्त महत्त्वाकांक्षेला व अनिरत श्रमालाच दिलें पाहिजे. 'आपल्या वेळोवेळच्या नव्यानव्या कल्पनांचें कौतुक करून त्याला प्रोत्साहन व मूर्तस्वरूप देण्यात कै. राजाराम महाराज व त्यांचे कर्तबगार प्राइममिनिस्टर रा. ब. दादासाहेब सुर्वे यांनीं उदार अंतःकरणानें मदत केली नसती तर आपल्या हातून कांहींच कार्य होऊ शकलें नसतें; व कोल्हापुरला शैक्षणिक दर्जा प्राप्त करून देण्यात आपण केलेल्या थोड्या फार खटपटीला मिळालेल्या यशाचें सारें श्रेय त्या दोन पूज्य व महनीय व्यक्तींना आहे' असे कृतज्ञतेचे उद्गार ते वरचेवर काढीत असत. किर्लोस्कर मासिकात प्रसिद्ध झालेल्या आपल्या आत्मचरित्रात त्यांनीं काढलेले उद्गार खरोखरच टिपून ठेवण्यासारखे आहेत. "कै. राजर्षि शाहू छत्रपति महाराज यांच्या अचानक कालवशतेमुळें आर्यसमाजाविरुद्ध सर्वच वातावरण गैरविश्वास, साशंकता व विरोध यांनीं दुमदुमून राहिलें होतें. या दुस्थितिजनक परिस्थितींत एक मात्र मोठी समाधानकारक व धैर्यदायी अशी गोष्ट ईश्वरकृपेनें आमच्या वाट्यास आली होती ती म्हणजे श्री छत्रपति महाराज, त्यांचे दिवाण व थोरथोर अधिकारी यांची प्रसन्नता. या अंतिम आधारामुळेच

माझी सर्व मदार होती. माझ्या आशाआकांक्षाचा तोच एक सहस्त्ररश्मि होता. अनेक मानसिक यातनानीं भडकलेल्या माझ्या चित्तनौकेचा तोच एक नागर बनला पक्षाभिनिवेशाचा तिटकारा, गुप्त कारस्थानाची चीड, सरकार त्याच्या आणि दिवाणसाहेब याचा उदार आश्रय, प्राणापलीकडचेंही कॉलेजवरील प्रेम, आत्मविश्वास व ईश्वरावरील श्रद्धा हे त्यानेंचेपासूनचे माझ्या जीवनाचे आधारस्तंभ झालेले आहेत. जें कांहीं अन्यस्वल्प यश मी मिळवू शकलों असेन तें केवळ याच्यामुळेंच! मासा कितीही धडधाकट आणि शक्तिमान असला तरी तो पाण्याबाहेर राहू शकत नाहीं. सत्ता-शाली अधिकाऱ्याचा उचित आधार व प्रोत्साहन यावाचून कोणतीही संस्था तगणें अगर उत्कर्षास येणें शक्य नाहीं. हुजूर त्याच्याच्या व त्यांच्या सन्मान्य दिवाणाच्या सक्रिय सहानुभूतीच्या अभावीं माझे सर्व प्रयत्न व्यर्थच गेले असते."

## लॉ कॉलेज

तसेंच, आपल्या येथील विद्यार्थ्यांना कायद्याचें शिक्षण घ्यावयाला परक्या ठिकाणीं जावें लागतें व अध्यापनशास्त्राचें शिक्षण घेण्यासाठीं सरकारी कॉलेजातून संस्थानीं अनेक जो पक्षपात सहन करावा लागतो त्याची चीड येऊन त्यानींच लॉ व टीचर्स कॉलेजच्या कल्पना १९३२ च्या डिसेंबरात राजाराम कॉलेजच्या वार्षिक दिनाच्या वेळीं प्रथम मांडल्या त्यानंतर लॉ कॉलेज काढण्याच्या योजनेबद्दल जें कार्यकारी मंडळ नेमण्यात आलें त्यात कै. दादासाहेब करंदीकर, कै. रा व चौगुले, न्या पंडितराव, श्री. दळवी, व डॉ. बाळकृष्ण याची नेमणूक केली होती या कमिटीपुढें लंडनच्या इन्सच्या (Inns) धर्तीवर एकादी संस्था काढावी हा मुख्य हेतु होता. चांगली हवा व स्वस्त राहाणी याचा फायदा मिळून थोडक्या खर्चात कायद्याचें शिक्षण घेणाऱ्याची सोय व्हावी या हेतूनें लॉ कॉलेजची योजना आखली.

## टीचर्स कॉलेज

फक्त लॉ कॉलेजच्या स्थापनेनें त्यांच्या मनाचें समाधान झालें नाहीं. त्यावेळी शिक्षणशास्त्राचें ज्ञान देणारी मुंबई इलाख्यात एकच संस्था मुंबईस होती, व त्यात केवळ शंभर विद्यार्थ्यांसच प्रवेश मिळत असे. शिक्षणाची वाढ झपाट्यानें होत असल्यामुळें अशा तऱ्हेच्या संस्थेची गरज अत्यंत तीव्रतेनें भासू लागली. ही उणीव दूर करण्यासाठीं व राजाराम कॉलेज-प्रमाणेंच केवळ कोल्हापुरातील विद्यार्थ्यांसच नव्हे तर ब्रिटिश हिंदुस्थानातील ज्यांना ज्यांना म्हणून मुंबईच्या कॉलेजचा फायदा मिळत नसे त्यांना त्याचा अवश्य फायदा घेता यावा व मुंबईच्या कॉलेजात सरकारी शिक्षकाला सहाशें रुपये जादा फी द्यावी लागत असे ही शिक्षकांच्या मार्गातील धोंड कमी करून सर्वांना समानतेनें वागविणारी संस्था कोल्हापुरात स्थापली जावी या उदात्त हेतूनें टीचर्स कॉलेजची योजना त्यांनीं पुढें मांडली, व लॉ कॉलेजच्या स्थापने-नंतर एक वर्षाच्या आत 'श्री महाराणी ताराबाई टीचर्स' कॉलेज निघालें.

## शिवाजी युनिव्हर्सिटी

लॉ कॉलेज व टीचर्स कॉलेज स्थापल्यानंतर तेथ्यासच स्वाची महत्त्वाकांक्षा त्यांना स्वस्थ बसू देईना. बनारस हिंदु युनिव्हर्सिटीप्रमाणें कोल्हापुरात देखील शिवाजी युनिव्हर्सिटीची स्थापना करावी यावद्दल त्यांचे भगीरथ प्रयत्न चालू होते. गेल्या २० वर्षांत कोल्हापुरात शिक्षणाची झपाट्यानें होत असलेली प्रगति पाहून, कोल्हापुरास लखनौ, म्हैसूर, अलिगड, अन्नमलाय किंवा उस्मानियाप्रमाणें स्वतंत्र युनिव्हर्सिटी असावी ही कल्पना त्यांच्या मनात निरंतर घर घेऊन होती. ती कल्पना राजाराम कॉलेजच्या वार्षिक दिनाप्रसंगीं जनतेपुढें मांडली नाहीं असें गेल्या ५/६ वर्षांत एकही वर्ष सुनें गेलें नाहीं. या युनिव्हर्सिटीच्या शास्त्रशाखा-संबंध कॉलेजचा पाहुणा म्हणून आलेल्या प्रत्येक शिक्षणतज्ज्ञापुढें आपली

योजना माइून त्याच्याशीं त्यावद्दल चर्चा करणें असाही क्रम सारखा चालू होता. 'शिवाजी युनिव्हर्सिटी' हें डॉक्टरसाहेबांचें एक गोड स्वप्न होतें. त्याची कल्पना थोडक्यात अशी —कोल्हापूरच्या पूर्वेस दीड मैलावर पूना बँगलोर रस्त्याच्या समीप राजाराम तलावानजीक निसर्गरम्य अशी जवळ जवळ दीडशें एकर जमीन यासाठीं राखून ठेवून तेथें राजाराम कॉलेजच्या आर्टस् व सायन्सच्या शाखा, लॉ कॉलेज, टीचर्स कॉलेज, ओमायन टेक्निकल स्कूल, व शेतकी शाळा या संस्था तेथें न्यावयाच्या. याखेच पुढें व्हेटेरनरी व मेडिकल कॉलेजची जोड द्यावयाची. वरील संस्थांचीं कॉलेजें निरनिराळ्या विषयाची भर घालून वाटतील येण्यासारखीं आहेत, तीं वाढवावयाची. उदाहरणार्थ, राधानगरी येथील हायड्रो इलेक्ट्रिक स्कीम व ॲल्युमिनियमचा कारखाना सुरू झाल्यावर येथील सायन्स कॉलेजमध्यें खनिज वस्तुशास्त्र (Minerology) व भूगर्भशास्त्र (Geology) हे विषय शिकविले जातील हे विषय शिकविण्यासाठीं व तेथील विद्यार्थ्यांना उमेदवार म्हणून घेण्यासाठीं अल्प आर्थिक फीज सोसण्यात वरील कारखान्याच्या चालकांना आनंदच वाटेल. हायड्रो-इलेक्ट्रिक स्कीम सुरू होताच इलेक्ट्रिक इंजिनियरिंगचा कोर्स सुरू करता येईल. ॲल्युमिनियम व हायड्रो इलेक्ट्रिक स्कीम मुळें उत्पन्न होणाऱ्या विजेच्या सहाय्यानें कोल्हापुरात इतर धंद्यांची वाढ होऊन रेल्वेची वाढ होईल, त्यासाठीं मेकॅनिकल इंजिनियर्सची जरुरी भासेल, म्हणून, तीही शाखा उघडावी लागेल. उद्योगधंद्याच्या वाढीमुळें कमर्शिअल स्कूल उघडणें सोयिस्कर होईल. तसेंच कोल्हापूर हें संगीत-चित्र-नाट्य-चित्रपट या कलांचें माहेरघर असल्यामुळें त्या कलांचें शिक्षण देण्यासाठीं ॲकॅडमी ऑफ फाइन आर्टस् सुद्धां स्थापन करावी लागेल. कोल्हापुरची मर्दानीविषयीची बरीच ख्याति असल्यामुळें लष्करी शिक्षणाच्या खालोखाल शास्त्रशुद्ध शारीरिक

शिक्षण जितक्या तरुणतरुणींस देतां येईल तितक्यांना मिळायला हवें. यासाठीं (१) शारीरिक शिक्षण व मल्लविद्या आणि (२) लष्करी शिक्षण यांच्या दोन शाळा उघडाव्या लागतील. या सर्व कॉलेजांचीं वसतिगृहें एकाच ठिकाणीं बांधलीं गेलीं तर बनारस हिंदु विश्वविद्यालयाप्रमाणें कोल्हापूर शिवाजी विश्वविद्यालयास स्वरूप येईल.

या युनिव्हर्सिटीच्या सवाढव्य खर्चाच्या बाबतींत थोडी मदत म्हणून त्यांनीं कांहीं अपेक्षाही केल्या होत्या. कोल्हापूर हें दक्षिण महाराष्ट्राचें केंद्र असल्यामुळें दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांना व येथील जहागिरदार यांना यांतील अनेक शाखांचा फायदा करून घेतां येईल म्हणून त्यांनीं त्याच्या स्थापनेसाठीं व नंतरच्या खर्चासाठीं यथाशक्ति देणग्या द्याव्या; शिवाजी महाराजांच्या वंशजांच्या राजधानींत त्यांच्याच नांवच्या या युनिव्हर्सिटीविषयीं उत्तर हिंदुस्थानांतील मराठा संस्थानिकांना व येथील जनतेला आदर व प्रेम वाटून त्यांनींही पण थोडीफार मदत करावी; व श्री. छत्रपति राजाराम महाराज सरकार व त्यांचे प्राइम मिनिस्टर यांचा या योजनेला पाठिंबा मिळाल्यास आपल्या या गोड स्वप्नाला मूर्त स्वरूप येण्यास फारसा अवकाश लागणार नाहीं अशी त्यांची मनोमय खात्री होती. या शिवाजी विश्वविद्यालयाचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील मराठी या विषयाला देण्यांत येणारें प्राधान्य व मराठी हेंच माध्यम! परिस्थितीची अनुकूलता असती तर डॉक्टरसाहेबांचें हें स्वप्न सत्यसृष्टींत अवतरायला वेळ लागला नसता. उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं मराठा संस्थानिकांनीं व खुद्द कोल्हापुरच्या छत्रपतींनीं या योजनेला पाठिंबाही पण दिला होता. पण—! सान्या मानवी आकांक्षा पूर्ण होत्या तर!

## सेकंडरी टीचर्स असोसिएशन

१९२६ सालीं दरबारनें राजाराम कॉलेजच्या प्रिन्सिपॉलच्या जागे-

व्यतिरिक्त 'इन्स्पेक्टर ऑफ सेकंडरी एज्युकेशन' म्हणून डॉक्टरसाहेबांची नेमणूक केली. पुढें त्यांनीं दुय्यम शिक्षणाची १९३६ पर्यंत अत्यंत समाधानकारकरीतीनें प्रगति घडवून दाखविली. याच अवधींत त्यांनीं येथील दुय्यम शाळेंतील शिक्षकांना विचारविनिमय करण्यासाठीं वाव मिळावा व त्यांच्यांत सहयोग उत्पन्न होऊन सर्व शाळांत एकसूत्रता यावी या उद्देशानें 'सेकंडरी टीचर्स असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन केली या संस्थेतर्फे कोल्हापुरांतील दुय्यम शिक्षकांची एक परिषद् त्यांच्याच अध्यक्षतेखालीं येथील ईश्वर पॅटन हायस्कूलमध्यें भरली होती. पुढें त्याची उत्तरोत्तर वाढ होऊन सदर संस्था कोल्हापुरच्या दुय्यम शाळांचा अभ्यासक्रम व क्रमिक पुस्तकें ठरविणें, आंतर्–शालेय खेळांचे सामने, पाठांतर, वगैरेंच्या चढाओढी ठेवून वक्तृत्वं खेळादूना, विद्यार्थ्यांना व शाळांना उत्तेजनार्थ ढाली, पदकें व बक्षिसें देणें इत्यादि कार्ये अद्याप करीत आहे

## बालवीर संस्था

कोल्हापुरच्या बालवीर संस्थेचे ते प्रारंभापासून अध्यक्ष होते. संस्थेच्या बाल्यावस्थेंत तिला हाताशीं धरून अनेक अडचणींतून त्यांनीं संस्थेला मार्ग दाखविला आहे अनेक कामाची गडबड असल्यामुळें असतांना देखील बालवीरांकरितां ते खास वेळ काढून त्यांना मदत करण्यास 'सदैव तयार' असत. कोल्हापूर बालवीर संस्थेला आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा फायदा देऊन ही उपयुक्त चळवळ संस्थानांत स्थिर करून त्यांनीं कोल्हापुरच्या तरुणांवर मोठा उपकार करून ठेवला आहे अडीच वर्षांपूर्वींची गोष्ट बावडा जहागिरींतील माधवनगरजवळील नदीतीरीं निसर्गाच्या रम्यस्थळीं कोल्हापुरांतील बालवीरांचा एक कॅंप होता. शेवटच्या दिवशीं श्रीमंत पतंगराव बावडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं दीक्षाविधी होणार होता डॉक्टरसाहेब तेथून ५।६ मैलावर असलेल्या

आपल्या बगल्यात रहात होते. त्यानाही आमत्रण गेलें. अंगांत ताप असताना देखील स्वत हजर राहून त्या समारभात भाग घेऊन त्यांनीं बालवीराना उपदेश केला.

## कोल्हापूर आर्यसमाज

डॉक्टरसाहेबांनीं कोल्हापूर आर्यसमाजाबद्दल केलेल्या कामगिरीला तर तोडच नाहीं. उत्तर हिंदुस्थानात आर्यसमाजाबद्दल त्यांनीं काय कामगिरी केली याचा उल्लेख मागें आलाच आहे. प्रि नेपाळसिंग येथून गेल्यानतर आर्यसमाजाचें धुरीणत्व १९२२ सालीं त्यांच्याकडे आलें. पुढील १८ वर्षीच्या काळात कोल्हापूर आर्यसमाजाची जी भरभराट झाली त्याचें श्रेय बहुशी डॉक्टरसाहेबांच्याकडेच जातें. राजाराम हायस्कूल व कॉलेज आर्यसमाजाच्या ताब्यांतून जाईपर्यंत आर्यसमाजाच्या सभा बहुतेक शाळेंत भरविल्या जात. पुढें मात्र ही अडचण जास्त भासू लागल्यामुळें आर्यसमाजासाठीं एकादें स्वतत्र मदिर असावें असे विचार त्यांच्या मनांत घोळू लागले, व त्यासाठीं त्यानीं फड गोळा करण्यास सुरवात केली. ठिकठिकाणीं व्याख्यानें दिलीं. अनेक लोकांच्या गाठीभेटी घेतल्या. अवघ्या दोन वर्षांच्या खटपटीनतर त्यांनीं दहा हजार रुपये जमविले. श्री छत्रपति महाराज सरकारानी उदारपणें दिलेल्या लक्ष्मीपुरी-तील जागेंत मदिर बाधण्याला सुरवात केली. या मदिरासाठीं सरस्थानिक, जहागिरदार व इतर लोकानीं त्यांना अगत सढळ हातानें मदत केली. त्यावेळीं त्याचे गुरुकुलातील सहचारी व आर्य जगताचे गुरु श्री स्वामी श्रद्धानद यांचा दिल्ली येथें खून झाला. श्री स्वामी श्रद्धानदांच्याबद्दल वाटत असलेला पूज्यभाव व्यक्त करण्याकरितां त्यांनीं त्या मदिराला 'श्री स्वामी श्रद्धानद स्मारक मदिर' असें नांव दिलें. हें मदिर म्हणजे आर्यसमाजाच्या सर्व कार्याचें केंद्रच होय

प्रचारकार्यासाठीं आर्यसमाजाचें साहित्य निर्माण करण्याचें साधन म्हणून आरंभीं कोल्हापूर आर्यसमाजानें 'आर्यभानु' नांवाचा छोटा छापखाना काढला होता. आरंभीं तो फेरेंतरी माल्याच्या मार्गांतच असे व आर्थिक अडचणींमुळें तो बंद करण्याची देखील एकदां पाळी आली होती. पण डॉक्टरसाहेबांनीं यादी घालून वेळींच लक्ष घालून यंत्रसामुग्रींत सुधारणा व कामगार वर्गात शिस्त निर्माण केली. प्रथम कर्ज काढून सहा हजार रुपयांची स्वतंत्र इमारत उभारली; व छापखान्यांत अद्यावत् बदल केला. आज कोल्हापुरांतील एक चांगल्या मोठ्या छापखान्यांत त्याची गणना होते. आर्यसमाजाच्या प्रचार कार्यासाठीं लागणाऱ्या, आर्यसमाजाचे प्रवर्तक श्री स्वामी दयानंदप्रणीत सत्यार्थप्रकाशासारखे ग्रंथ व इतर वैदिक वाङ्मय याच छापखान्यांतून योग्या-खर्चांत छापले जातें. डॉक्टरसाहेबांचे 'शिवाजी द ग्रेट', 'हिंदु फिलॉसॉफर्स ऑन इव्होल्युशन' सारखे विद्वन्मान्य ग्रंथ याच छापखान्यांत छापले आहेत. या छापखान्यास ऊर्जितावस्थेस आणून समाजाचा आर्थिक प्रश्न सोडविण्यास त्यांनीं बरीच मदत केली आहे. तसेंच श्रद्धानंद स्मारक मंदिराच्या आवारांत आर्यभानु प्रेसच्या समोर पांच हजार रुपये खर्चून वसतिगृहवजा छोटी इमारत बांधली. त्याचें नांव 'आर्यभवन' असें ठेवण्यात आलें होतें. ह्या इमारतीचें उद्घाटन झाल्यानंतर थोड्याच दिवसांत डॉक्टरसाहेब कालवश झाले. म्हणून त्यांच्याच स्मरणार्थ 'बाळकृष्ण भवन' असें त्याचें नामांतर करण्यात आलें आहे.

उत्तर हिंदुस्थानांतील आर्यसमाजाचें कार्य पाहून आर्यसमाजाच्या प्रचाराचें कोल्हापूर येथें केंद्र स्थापन व्हावें या उद्देशानें कै. श्री छत्रपति शाहू महाराजांनीं साठ हजार रुपये किंमतीच्या इमारती व जमिनी कोल्हापूर आर्यसमाजाला दिल्या, व आर्यसमाज गुरुकुल, फर्नेल गुदहाउस

अनाथालय व इंग्रजी मोफत शाळा चालविण्यासाठीं योग्य ती कायमची भेंट दिली. डॉक्टरसाहेबांच्या कारकिर्दीत या तीन्ही संस्थांची अत्यंत समाधानकारक रीतीनें प्रगति होत गेली. डॉक्टरसाहेबांनीं ज्यावेळीं आर्यसमाजाची सूत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं त्यावेळीं वरील इंग्रजी शाळा हें इंग्रजी पांचव्या इयत्तेपर्यंत शिक्षण देणारें एक लहानसें ए. व्ही. स्कूल होतें. तेवढ्यावरच समाधान न मानून दरबारची भेंट केवळ ए. व्ही. स्कूल चालविण्यापुरतीच असतांनादेखील कर्तव्यनिष्ठेनें व धडाडीनें त्यांनीं १९२८-२९ सालीं त्याचें रूपांतर हायस्कुलांत केलें; व त्याला 'श्री शाहू दयानंद की हायस्कूल' असें नांव दिलें. या शाळेंत तीनशें विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण मिळतें व त्याचबरोबर येथें हिंदी व वैदिक धर्माचें शिक्षण दिलें जातें. आज कोल्हापुरांतील चांगल्या हायस्कुलांत त्याची गणना होत आहे. त्याचप्रमाणें गुरुकुल, कर्नल बुडहाउस अनाथालय व श्रद्धानंद मराठी शाळा याही संस्था अत्यंत समाधानकारकरीतीनें चालविल्या जात आहेत. अनाथालयांत जवळ जवळ पंचवीस विद्यार्थ्यांची मोफत जेवण्याची व राहाण्याची सोय केली जाते. गुरुकुलांत देखील आणखी तितक्याच विद्यार्थ्यांना जेवण्याराहाण्या-बद्दल पुष्कळ सवलती दिल्या आहेत. गुरुकुल व अनाथालय या दोन वसतिगृहांत ब्राह्मणापासून हरिजनापर्यंत सर्व जातींच्या हिंदु विद्यार्थ्यांना जातिभेद न मानतां समानतेनें वागविण्यांत येते व या सर्वांना वैदिक धर्माचें शिक्षण दिलें जातें, हें आर्यसमाजाचें वैशिष्ट्य होय! गुरुकुला-शेजारीच आर्यसमाजातर्फे चार हजार रुपये खर्चून डॉक्टरसाहेबांनीं 'श्री राजाराम आर्याश्रम' नांवाचें एक छोटें वसतिगृह बांधलें आहे. त्याचें उद्घाटन कै. छत्रपति राजाराम महाराजांच्या हस्तें झालें. याही वसतिगृहांत जातिभेद न मानतां सर्व जातींच्या हिंदु विद्यार्थ्यांना प्रवेश

मिळतो. गुरुकुल, शाळा व कॉलेजें यांतील विद्यार्थी त्याचा फायदा घेतात.

हिंदी भाषेचा प्रसार हें आर्यसमाजाचें एक ध्येय आहे. त्याचप्रमाणें कोल्हापुरात त्याचा प्रसार व्हावा म्हणून कोल्हापूर आर्यसमाजानें आपल्या इग्रजी व मराठी शाळेंत हिंदी शिकविण्याची सोय केली. शिवाय, कोल्हापूर आर्यसमाजातर्गत 'श्री दयानंद निःशुल्क हिंदी विद्यालय' नांवाची सस्था सदर हिंदी प्रचाराचें काम अव्यत उत्साहानें करीत आहे या विद्यालयातर्फे हिंदी मामप्रचार चालविला जातो.

तसेंच तरुणांचें सघटन व आत्मोन्नति व्हावी या हेतूनें 'आर्य कुमार सभा' या नांवाच्या सस्था उत्तर हिंदुस्थानात आर्यसमाजानें चालविल्या आहेत. तशा सस्था येथेंही कोल्हापूर आर्यसमाजाच्या नियंत्रणाखालीं स्थापन करण्यात आल्या. या सस्थांच्या नियामक मडळाचे डॉक्टरसाहेब शेवटपर्यंत अध्यक्ष होते

सकेंबर येथील एक ए व्ही स्कूल अगदीं मोडकळीस आलें होतें. सन १९२९ सालीं ती शाळा चालविण्याबद्दल डॉक्टरसाहेबांना विनति करण्यात आल्यावरून त्यांनीं ती शाळा आर्यसमाजाच्या ताब्यात घेतली; व आपलें वजन खर्च करून सदर शाळेस सरकारी मान्यता व ग्रँट मिळवून दिली. प्रथम तीन इयत्तापर्यंतच शिक्षण देणारी ती सस्था होती. तिला चौथी व पाचवी या दोन इयत्ता जोडण्यात आल्या. सदर शाळेच्या सुव्यवस्थेसाठीं कोल्हापूर आर्यसमाजातर्फे 'आर्यन एज्युकेशन बोर्ड' स्थापून त्याचे प्रेसिडेंट या नात्यांनीं त्या शाळेची सर्वांगीण उन्नति करण्यासाठीं त्यांनीं अत्यत परिश्रम घेतले. यदा या शाळेला इग्रजी सहावी इयत्ता जोडण्यांत आली आहे.

इथें येथील धर्मांतर केलेल्या बऱ्याच लोकांनीं आर्यधर्मांत येण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्यांनीं त्यांना शुद्ध करून घेऊन वैदिक

धर्मांत घेतलें. त्या लोकांना धर्मांतरामुळें त्रास होण्याचा संभव दिसल्यामुळें कोल्हापूर दरबारकडून त्यांच्या स्वतंत्र वसाहतीसाठीं जागा मिळावी म्हणून कै. श्री छत्रपति महाराजांकडे त्यांनीं विनंति केली, व कै. महाराजांनीं अत्यंत उदारपणें त्यांना जागा दिली. आता तेथें वसाहत होणार आहे. डॉक्टरसाहेबांनीं या लोकांच्या शिक्षणासाठीं तेथें एक रात्रीची शाळा स्थापन केली. तसेंच तेथील लोकांच्या आर्थिक सुधारणे-साठीं त्यांच्याच प्रोत्साहनानें दोन भिशी स्थापन झाल्या आहेत.

ह्या सर्व संस्थांचें कर्णधारित्व त्यांच्याकडे गेलीं १८ वर्षे होतें. त्यांच्या वाढीबद्दल व उन्नतीप्रीत्यर्थ डॉक्टरसाहेबांनीं अत्यंत परिश्रम घेतले आहेत. रुग्णशय्येवर असतांना देखील समाजाच्या कामीं त्यांनीं आपल्या प्रवृत्ती-कडे लक्ष्य दिलें नाहीं. दोन वर्षांपूर्वी एकदा आर्यसमाजाचें काम चालू असतां त्यांच्या मातोश्रींच्या निधनाची तार आली. पण सत्संगाच्या कार्यांत खंड पडू नये म्हणून कोणालाही न कळविता त्यांनीं काम तसेंच चालू ठेवलें व सारें काम आटोपल्यानंतर ती दु:खद बातमी निवेदन केली.

हिंदुधर्माचें संरक्षण, सुधारणा व प्रचार हेंच आर्यसमाजाचें मुख्य कार्य! परधर्मियांचा जाच, जुलूम, जबरदस्ती व प्रचार यामुळें हिंदुधर्माला लागलेली गळती थांबविण्यासाठीं कोल्हापूर आर्यसमाजातर्फे दरसाल होणाऱ्या शुद्धिकार्यामुळें हिंदुधर्मप्रसाराला डॉक्टरसाहेबांनीं बराच हातभार लावला आहे. कित्येक वेळां त्यांना खुनाच्या धमकीचीं पत्रें देखील यावीं लागलीं आहेत. आजपर्यंत कोल्हापूर आर्यसमाजानें पांच हजारावर धर्मां-तर केलेल्या हिंदु बांधवांना शुद्ध करून त्यांना परत वैदिक धर्मांत घेतलें आहे. या शुद्धीकरितां उपयोग लावून देण्यांत येथील शुगर फॅक्टरीसारख्या संस्थांनीं डॉक्टरसाहेबांना अत्यंत मदत केली आहे. शुद्धीच्या बाबतींत त्यांचें नेहमीच प्रोत्साहन असे, व कित्येकवेळां आपल्या प्रकृतीकडे दुर्लक्ष्य

फरून ते जातीनें हजर राहात असत. एकदा तर कोल्हापुरजवळील एका खेडेगांवांत श्रीमन् क्षात्रजगद्गुरु महाराजांच्या अध्यक्षतेखालीं शुद्धि होणार होती ऐन पावसाळ्याचे दिवस! आपल्या दम्याच्या प्रकृतीला ती हवा सोसणार नाहीं हें माहीत असूनही त्या सभेस हजर राहून त्यांनीं पावसांतच व्याख्यान दिलें. त्याचा परिणाम मात्र त्यांना पुढें भोगावा लागला तो निराळाच! त्याच रात्रीं त्यांना ताप भरला व त्याचें निमित्त होऊन पुढें ते तीन महिने अथरुणाला खिळून राहिले.

कॉलेजचें काम व आपलें लेखन सभाळून आर्यसमाजासाठीं त्यांनीं अत्यंत परिश्रम घेतले—ते खरोखरच शिजले! ह्या सर्व संस्थांच्या कामीं त्यांना अत्यंत दगदग सोसावी लागली. हा सर्व व्याप त्यांच्यामागें नसता तर डॉक्टरसाहेबांचें आयुष्य कदाचित आणखी दहा वर्षांनीं खचित वाढलें असतें पण आपल्या प्रकृतीची देखील त्यांनीं पर्वा केली नाहीं कोल्हापूर आर्यसमाजाच्या इतिहासातील त्यांची ही कामगिरी अपूर्व नाहीं असे कोण म्हणेल?

## विविध कामगिरी

डॉक्टरसाहेबांनीं केवळ शैक्षणिक जगांतच क्रांति केली असें नसून कोल्हापूर म्युनिसिपालटी, इलाखा पंचायत, वगैरे संस्थांत देखील भाग घेऊन कार्य केलें आहे म्युनिसिपालटींत मेंबर, सॅनिटरी कमिटीचे चेअरमन, इत्यादि नात्यांनीं त्यांनीं सार्वजनिक कार्यें केली आहेत. १९२६ सालीं कोल्हापुरची जी घरफाळा आकारणी झाली त्यावेळीं दरबारला कोल्हापूर शहरातील दहा हजार घरें व दुकानें यांचा फाळा ठरवून देण्यास कोणीतरी निष्पक्षपाती व निर्भय मनुष्य हवा होता त्यासाठीं म्युनिसिपालटीनें 'डायरेक्टर, रेंट असेसमेंट ब्यूरो' म्हणून डॉक्टरसाहेबांची निवड केली सदर कार्य करतांना पूर्वी सर्वांना सारखा

असलेला घरफाळा बदलून व श्रीमंतांचा योग्य प्रमाणात थोडासा वाढवून अत्यंत गरिबीत असलेल्या शेकडो लोकांचा घरफाळा माफ केला. याशिवाय विद्यार्थ्यांच्या सहाय्यानें कोल्हापुरची व्यापार विषयक पहाणी करून त्याचा अहवाल 'इकॉनॉमिक सर्व्हे ऑफ कोल्हापूर' या नांवच्या पुस्तक रूपानें प्रसिद्ध केला. १९३० सालीं कोल्हापूर स्टेटतर्फे बँकिंग इन्क्वायरी कमिटी नेमली होती. त्यावेळीं त्यांच्याच अध्यक्षतेखालीं संस्थानतर्फे प्रसिद्ध झालेला अहवाल विश्रुतच आहे. कांहीं वर्षे इलाखा पंचायतीचे ते स्टेटतर्फे कौन्सिलर होते व त्याठिकाणीं बजेट कमिटीचे चेअरमन या नात्यानेंही त्यांनीं काम केलेलें आहे. कोल्हापुरांतील औद्योगिक शिक्षणाचा पुरस्कार करणारी जी एकमेव संस्था आहे त्या 'ओब्रायन टेक्निकल स्कूल'चे ते अध्यक्ष होते.

कोल्हापुरांत राहून वर नमूद केल्याप्रमाणें कार्य सतत चालू असतानाच कोल्हापूर बाहेरील कार्यांत देखील भाग घेऊन त्यांनीं आपला व पर्यायानें कोल्हापुरचा लौकिक वाढविला. टॅक्सेशन इन्क्वायरी कमिटी, रॉयल कमिशन ऑन बँकिंग अँड करन्सी, युनिव्हर्सिटी रिफॉर्म कमिटी, आणि स्कीन कमिटी यांनी काढलेल्या प्रश्नावलीवर त्यांचीं मतें विचारण्यात आलीं होतीं. तसेंच वरीलपैकीं कित्येक समितींनीं त्यांची उलट तपासणी घेतली व त्यांनीं त्यावेळीं प्रदर्शित केलेलीं मतें त्या त्या कमिटीच्या अहवालात दाखल केलेली आहेत. हिंदुस्थान सरकारनें स्थापन केलेल्या हिस्टॉरिकल रेकॉर्डस् कमिशनचा १९२५ सालापासून सभासद होण्याचा मान त्यांना मिळालेला होता. त्या समेच्या त्रैवार्षिक नेमणुका होत. त्यांना त्यांची निरंतर शेवट-पर्यंत होत असे. त्यांच्या बहुतेक परिषदेला ते दरबारचे प्रतिनिधि म्हणून हजर राहून आपले निबंध सादर करीत. १९३५ च्या एप्रिलमध्यें मुलतान येथें भरलेल्या मुलतान विद्या परिषदेचे ते अध्यक्ष होते. पुढें

१९३५ च्या जूनमध्यें मुंबई इलाखा इतिहास शिक्षण परिषदेचें पहिलें अधिवेशन पुणें येथें डॉ. बाळकृष्णाच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. १९३६ च्या आक्टोबरांत कोल्हापूर येथें रा. ब. गो. स. सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या त्याच परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाचे ते स्वागताध्यक्ष होते तसेंच १९३८ च्या आक्टोबरांत अलाहाबादेस भरलेल्या इंडियन हिस्टरी काँग्रेसांतर्गत अर्वाचीन हिंदुस्थानच्या इतिहास विभागाचें अध्यक्षस्थान त्यांना लाभलें होतें.

डॉक्टरसाहेबांचा बऱ्याच विद्वन्मान्य संस्थांशीं निरनिराळ्या नात्यांनीं संबंध आला होता. लंडनच्या 'रॉयल इकॉनॉमिक सोसायटी', 'रॉयल स्टॅटिस्टिकल सोसायटी', 'रॉयल हिस्टॉरिकल सोसायटी' या संस्थांचे ते फेलो होते. तसेंच मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'चे व अमेरिकेच्या 'इकॉनॉमेट्रिक असोसिएशन'चे ते सभासद होते. १९२३ पासून ते मुंबई युनिव्हर्सिटींत फेलो, मेंबर ऑफ दी फॅकल्टी ऑफ् आर्टस्, चेअरमन ऑफ् दी बोर्ड ऑफ स्टडीज इन् हिस्टरी अँड आर्किऑलॉजी, इत्यादि नात्यांनीं काम करीत होते, व बी. ए., एम्. ए. इत्यादि परिक्षांचे ते शेवट-पर्यंत परीक्षक होते मरणापूर्वी एक महिना अगोदर अथरुणाला खिळलेल्या परिस्थितींत देखील त्यांनीं अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. च्या परिक्षेचा पेपर काढलेला होता १९३४ मध्यें आग्रा येथें भरलेल्या शिक्षण संमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९३२ मध्यें कोल्हापूर येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांतर्गत प्रथमप्रकाशन संमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. १९३७ सालीं कोल्हापुरास डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखालीं जी हिंदुधर्म-परिषद् भरली होती त्यावेळीं डॉक्टरसाहेबांच्याच अध्यक्षतेखालीं परिषदेची व्यवस्था पाहाण्यासाठीं एक कमिटी नेमिली होती. थोडक्यात सांगायचें तर डॉ. बाळकृष्ण व्यक्ति नसून समष्टि होती

## महाराष्ट्राभिमान

डॉक्टरसाहेबांचा महाराष्ट्राबद्दलचा व हिंदुधर्माबद्दलचा अभिमान अस्सल आज्वल्य होता. त्यांची पंजाब ही जन्मभूमि असली तरी महाराष्ट्र ही खरी कर्मभूमि होय! वयाचीं पहिलीं ४० वर्षे पंजाबातील वातावरणांत घालवून योगायोगानें महाराष्ट्रांत आल्यानंतर येथील वातावरणाशीं ते इतके समरस झाले कीं, महाराष्ट्राच्या त्यातल्या त्यांत कोल्हापुरच्या लौकिक वादविवादातच त्यांच्या आयुष्याचीं शेवटचीं १८ वर्षे गेलीं. डॉक्टर साहेबांनीं महाराष्ट्राबद्दल जी आपुलकी दाखविली त्याबद्दल महाराष्ट्रानें देखील वेळोवेळीं त्यांचा गौरव करून त्यांना उत्तेजन दिलें आहे. कोल्हापुरच्या छत्रपतींनीं त्यांना वेळोवेळीं केलेली मदत तर अमोलिक होय. त्याशिवाय १३ मे, १९३१ सालीं त्यावेळीं राजगादीवर कै. श्री. सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं आपल्या भेटीस बोलावून 'शिवाजी' च्या कार्याबद्दल डॉक्टरसाहेबांना एक हजार रुपयांचा चेक दिला. याशिवाय पुष्कळ संस्थानिकांनीं व जहागिरदारांनीं आपापली कदरदानी त्यांना दाखवून त्यांच्या कार्यांत शक्य ती मदत केली. महाराष्ट्रानें १९३३ च्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनांतर्गत ग्रंथप्रकाशन संमेलनाचे स्वागताध्यक्ष नेमून जो गौरव केला त्यावेळीं डॉक्टरसाहेबांनीं आपलें भाषण मराठींत केलें हें विशेष होय. महाराष्ट्रांतल्या बहुतेक सर्व संस्थानिकांशीं त्यांचा स्नेहसंबंध होता. डॉक्टर-साहेबांच्या गाढ विद्वत्तेमुळें व कार्यामुळें त्यांनीं त्यांना योग्य तो मान दिला आहे. १९३३ च्या मेच्या सुटींत डॉ. बाळकृष्ण महाबळेश्वरीं असतांना कै. श्री. सयाजीराव महाराज तेथेंच होते. त्यांनीं त्यांना आपल्या भेटीस बोलावून घेऊन बडोद्यास युनिव्हर्सिटी व्याख्यानें करण्यास सांगितलें. पुढें डॉक्टरसाहेबांच्या बडोदा येथील मुक्कामाचा फायदा तेथील जनतेनें व राजनिवासिनीसभा वगैरे सरकारच्या प्रमुख संस्थांनी घेऊन त्यांची विद्वत्ताप्रचुर

व्याख्यानें वगैरेंतीं. जसे लोक त्यांच्या ज्ञानाचा फायदा करून घेण्यास टपलेले असत, तसेंच डॉ बाळकृष्ण अशा सधीचा फायदा स्वत घेतल्या-शिवाय रहात नसत बडोद्यास असल्यावेळीं तेथील व्यापार–उद्योग खातें, शिक्षणखातें व राज्याचा दप्तरखाना हीं सरकारी खातीं त्यांनीं सूक्ष्मपणें पाहिलीं व सूचनाही केल्या. त्यांचा सल्ला घेण्यासाठीं कै. श्री. सयाजीराव महाराजांनीं त्यांना Translation Branch दाखविला व त्याचें शुक्र-नीतीवरील पुस्तक पाहिलें त्याचवेळीं त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या 'शिवाजी' ग्रंथाचे २५ सेट बडोदा दरबारनें खरेदी केले. डॉक्टरसाहेबाना महाराष्ट्राबद्दल, महाराष्ट्राच्या सत्याग्रहाबद्दल व गादीबद्दल जितका अभिमान तितकाच त्यांच्या वशजावद्दलही वाटत होता. आपला अमूल्य ग्रंथ, 'शिवाजी द ग्रेट', कै छत्रपति राजाराम महाराजाना अर्पण करिताना त्या पुस्तकाच्या अर्पणपत्रिकेंत 'The only ruling representative of the noble house of Shivaji the Great' असा त्यांनीं गौरवपूर्ण उल्लेख केलेला आहे

## शिकागो परिषद् व अमेरिकेंतील कार्य

१८९३ सालीं अमेरिकेंत 'पार्लमेंट ऑफ रिलिजन्स' या नावानें सर्वधर्मपरिषदेचें जें पहिलें अधिवेशन भरलें होतें त्यावेळीं हिंदी प्रतिनिधि म्हणून जाऊन अमेरिकेंत आर्यधर्माची पताका रोवण्याचें महत्कार्य स्वामी विवेकानदांनीं केल्याचें सर्वश्रुतच आहे त्या परिषदेचें दुसरें अधिवेशन बरोबर चाळीस वर्षांनीं १९३३ सालीं शिकागो येथें भरलें. दोन हजार खीपुरुष जगातील सर्व प्रमुख देशातून भिन्न भिन्न धर्मांचे प्रतिनिधि म्हणून आले होते. त्या परिषदेस दिल्ली येथील सार्वदेशिक आर्य प्रतिनिधि–सभेनें आर्यसमाजाचा प्रतिनिधि म्हणून डॉक्टरसाहेबाना पाठवून तेंच महत्कार्य पुढें चालविण्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकली त्या परिषदेचें

उद्घाटन कै. श्री सयाजीराव महाराज गायकवाड याच्या हस्तें झालें. खुद्द शिकागो परिषदेचें काम जून ते सप्टेंबर पर्यंत चाललें होतें. पण कांहीं परस्थ व अमेरिकन प्रतिनिधींना कांहीं कारणामुळे हजर राहाता न आल्या-मुळें त्याची पुरवणी परिषद् न्यूयॉर्क येथें जून १, १९३४ पर्यंत भरून नंतर ती परिषद् समाप्त झाली. त्या परिषदेंत निरनिराळ्या राष्ट्रांतील धर्मांच्या व पंथाच्या १८८ प्रमुख पुढाऱ्यांनीं एकूण २३२ व्याख्यानें दिलीं. सदर परिषदेंत डॉक्टरसाहेबांनीं तीन व्याख्यानें दिलीं —(1) Hindu Theories of Cosmic Evolution (31-10-33), (2) India's Contribution to Civilization (5-11-33), व (3) The Cultural contact between India and America (1-1-34)

पाश्चिमात्य देशांत आपल्या आर्यधर्माच्या प्रचारासाठीं व आर्यसंस्कृतीची श्रेष्ठता प्रस्थापित करण्यासाठीं त्यांनीं एक दौरा काढला. तेथें त्याचा अनेक संस्थांतर्फे गौरव करण्यांत आला. विशेषतः मिचिगन, कोलंबिया व हॉवर्ड युनिव्हर्सिट्या, हिंदुस्थान असोशिएशन ऑफ अमेरिका, अमेरिकन लीग फॉर इंडियन फ्रीडम, नॉर्थ वेस्टर्न युनिव्हर्सिटी, न्यूयॉर्क युनिव्हर्सिटी आदि निरनिराळ्या युनिव्हर्सिटींतील प्रोफेसरांनीं व तेथील हिंदी रहिवाश्यांनीं डॉक्टरसाहेबांचीं व्याख्यानें ठेवून त्यांना खाने दिले. अशावेळीं डॉक्टर-साहेबांनीं तेथील तज्ञ प्रोफेसरांशीं विचार विनिमय करण्याची संधि मात्र दवडली नाहीं. तसेंच भर्गन्‌ टाउन कट्टी इत्यादींतर्फे त्याचीं तीन व्याख्यानें झालीं. या सर्व व्याख्यानांतून अर्वाचीन व प्राचीन युगासंबंधीं तुलनात्मक विवेचन करून त्यांनीं सुधारणेची नवी दिशा व्यक्त केली. इतकेंच्या सुधारलेल्या युगांतील कांहीं घरंदाज चाकोरीत उपाय सांगतांना त्यांनीं वेद-कालीन चालीरीतींची व समाजाची बरीच प्रशंसा केली. विशेषतः प्राचीनकालीन 'मास प्रॉडक्शन'पेक्षा प्राचीन व्यक्तिगत शिक्षण देण्याची पद्धत बरीच अनुकरणीय आहे व पूर्वींच्या आश्रिता शिक्षणाबरोबर शारीरिक

शिक्षण देण्याच्या पद्धतीचा अमेरिकन कॉलेजानीं अवलंब केला पाहिजे" असें त्यानीं निक्षून सांगितलें. एका व्याख्यानात तर मिस् मेयोनें हिंदु स्त्रियांविषयीं काढलेल्या अनुदार उद्गाराचा फोलपणा दाखवून त्याचा खरपूस समाचार घेतला. अमेरिकेस जाण्याचा त्याचा मुख्य हेतु हिंदुसंस्कृति, धर्म व तत्वज्ञान यावर व्याख्यानें देऊन एकदर अमेरिकेंत हिंदुस्थानाविषयीं असलेला गैरसमज दूर करावा, अमेरिकन राष्ट्रात हिंदुस्थानाबद्दल सहानुभूति उत्पन्न करून त्याचें सख्य संपादण्यासतव होता होईल तितकें तेथें प्रचारकार्य करावें, आर्यसमाजाची माहिती, वेद व उपनिषद् याचें महत्त्व त्याना समजावून सांगावें असा होता, व तो त्यानीं आपल्या तेथील पुष्कळ व्याख्यानानीं तडीस नेण्याचा प्रयत्न केला. एका व्याख्यानात तर प्राचीन हिंदुस्थानातील उज्वल कारकिर्दीचें व हिंदुसमाजाचें वर्णन करून 'पाश्चात्य देशाची सुधारणा प्राचीन हिंदुसमाजाचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवलें असता होईल व त्यामुळें पौर्वात्य व पाश्चिमात्याच्या सामाजिक घटनातील चागल्या तत्वाचा गोड मिलाफ होईल' असें प्रतिपादन केलें

ह्या कार्यासाठीं जाताना रा. ब. दादासाहेब सुर्वे याच्या शिफारसीवरून कै. छत्रपति राजाराम महाराजानीं त्याना आठ महिन्याची भर पगारी रजा दिली होती एवढेच नव्हे तर सारा पगार त्याना आगाऊच दिला होता. आपल्या कोल्हापुरच्या एका अधिकाऱ्याला मिळालेली ही मानाची जागा पाहून त्यानीं केलेली ही मदत त्याच्या हिंदुधर्माच्या व आर्यसंस्कृतीच्या जाज्वल्य अभिनिवेशाचीच द्योतक नव्हे का? डॉक्टरसाहेबांना सदर कार्यासाठीं जाताना त्याच्या दयाळु प्रकृतीमुळें पुष्कळानीं मोडता घातला होता; पण त्यानीं तो न जुमानता आर्यधर्माचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यासाठीं परदेशच्या ह्या दुसऱ्या सफरींत पदरचे सोळा हजार रुपये खर्च केले. हा हिंदुधर्माबद्दलचा त्याचा स्वार्थत्याग उल्लेखनीय नाहीं असे कोण म्हणेल?

अमेरिकेंत असतांना फोर्ड व इतर बऱ्याच मोटार कारखान्यांना भेटी देऊन, त्यांनीं सुप्रसिद्ध नायगराचा धबधबा व प्रसिद्ध शहरें पाहिलीं; बहुतेक विश्वविद्यालयांना भेटी देऊन तेथील शिक्षणपद्धतींचें सूक्ष्म निरीक्षण केलें; याशिवाय आर्थिक मंदी नाहींशी करण्याकरितां प्रेसिडेंट रूझवेल्ट यांनीं जी मोहीम सुरू केली होती तिचाही त्यांनीं खोल अभ्यास केला.

अमेरिकेचा दौरा आटोपून ते विलायतेस गेले. तेथें असतांना त्यांनीं इंडिया ऑफीसमध्यें जाऊन आपल्या शिवरायाच्या चरित्रानंतर राजारामाच्या चरित्राचें कार्य हातीं घेण्यासाठीं पूर्व तयारी म्हणून पहिल्या राजाराम याच्या-संबंधीं उपलब्ध असलेली ऐतिहासिक माहिती गोळा केली. या कामास त्यांना साडेतीन महिने लागले. नंतर इंग्लंडहून हॉलंडास जाऊन तेथील 'दी हेग' ऑफीसमधून डच भाषेतील महाराष्ट्राच्या पूर्वीच्या इतिहासावर प्रकाश पाडणारी बरीच ऐतिहासिक माहिती त्यांनीं गोळा केली. हॉलंडमध्यें असतांना त्यांनीं हेग, आमस्टरडॅम्, रॉटरडॅम् वगैरे शहरें पाहिलीं व हॉलंडमधील शेतकीचें अवलोकन करण्यासाठीं मोटारीतून बराच प्रवास केला. हॉलंडमधून ते हेर हिटलरच्या अमदानींतील अभिनव जर्मनीच्या परिस्थितीचा अभ्यास करण्यासाठीं जर्मनीस गेले. तेथील वास्तव्यांत बऱ्याच विश्वविद्यालयांतील शिक्षणक्रमाचें त्यांनीं आस्थापूर्वक अवलोकन केलें. जर्मनीहून निघाल्यानंतर ते स्वित्झरलंडमधून इटालीस गेले. इटाली-तील मिलन, रोम, जिनेव्हा, व्हेनिस वगैरे प्रसिद्ध शहरें त्यांनीं पाहिलीं; इतकेंच नव्हे तर इटालियन सरकारच्या निरनिराळ्या खात्यांतील कांहीं अधिकाऱ्यांच्या भेटी घेऊन त्यांनीं इटलींत मुसोलिनीनें केलेल्या कार्यविषयक माहिती मिळविली. अशा रीतीनें पाश्चात्य राष्ट्रांत आठ महिने घालविल्या-नंतर ते नेपल्सहून ता. ८ जून रोजीं निघून ११ जून, १९३४ रोजीं कोल्हापुरास सुखरूप परत आले. या सफरीच्यानिमित्तानें त्यांनीं मिसेस

बाळकृष्णाना व एका मुलीला आपल्यानंतर नेलें होतें. पाश्चात्य राष्ट्रांत मिळविलेल्या ज्ञानाचा फायदा त्यांनीं ठिकठिकाणीं दिलेल्या व्याख्यानांतून व कोल्हापुरास आल्यानंतर गुंफलेल्या व्याख्यानमालेंतून जनतेस करून दिलाच, शिवाय त्यांनीं स्वतः व मिसेस बाळकृष्ण यांनीं निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून व मासिकांतून लेख लिहून प्रसिद्ध केले.

## नामांकित वक्ता

हिंदुस्थानांतील नामांकित वक्त्यांत त्यांची गणना करायला हवी! त्यांच्या अभ्यासाचा प्रांत फारच विस्तृत असल्यामुळे त्यांचें कोणतेंही व्याख्यान अत्यंत मनोरंजक व विचार परिप्लुत होई. आपल्या व्याख्यानांतून उपहास व टीका या दुधारी तलवारींनें प्रतिपक्षाला चीत करण्याची त्यांची शैली फारच वाखाणण्यासारखी होती. हिंदुसंस्कृति व शिवरायांबद्दलचा त्यांचा अभिमान इतका जाज्वल्य होता कीं त्यांवर कुणी शिंतोडा उडविला कीं सात्त्विक संतापाच्या भरांत त्यांच्या वक्तृत्वाचें खरे स्वरूप प्रगट होई; व ह्या 'बाळकृष्णां'च्या वक्तृत्वाच्या विराट् स्वरूपाची खरी कल्पना त्यावेळीं येई. इंग्लंडातील हेंज परिषदेंत मौ. महमदअलींच्या विधानांना उत्तर देतांना, अमेरिकेंतील हिंदुस्थान असोसिएशनतर्फे झालेल्या व्याख्यानांत मिस् मेयोनें आपल्या पुस्तकांत केलेल्या बेजबाबदार विधानांची हजेरी घेतांना, किंवा पं. जवाहरलाल नेहरूंनीं आपल्या पुस्तकांत अफझुलखानवधाच्या बाबतींत काढलेल्या उद्गारांना उत्तर देतांना सांगली येथें घेतलेल्या भाषणांत याचें प्रत्यंतर लोकांना पहावयास मिळालें. आर्यधर्माच्या जाज्वल्य अभिमानानें प्रेरित होऊन आपल्या ओजस्वी भाषणानें, अचूक कोटिक्रमानें व उपहासानें प्रतिपक्ष्याला चारी मुंडे चीत करून त्यांनीं आपलें प्रभावी वक्तृत्व थोर थोर लोकांच्या निदर्शनास आणून दिलें ते प्रख्यात जागतिक वक्ते व पाश्चात्य संस्कृति व ख्रिस्तीधर्म यांचे कट्टे पुरस्कर्ते डॉ. जोन्स हे

कोल्हापुरास आल्यावेळीं आपल्या धर्माचें श्रेष्ठत्त्व सिद्ध करून दाखविण्यासाठीं डॉ. जोन्सनीं येथील पॅलेस थिएटरांत एक व्याख्यानमाला गुंफली. त्या मालेंतील एका व्याख्यानाचें अध्यक्षस्थान डॉक्टरसाहेबांनीं विभूषित केलें होतें. डॉक्टर बाळकृष्णांच्यासारखा वैदिक संस्कृतीचा पुरस्कर्ता अध्यक्ष, व डॉ. जोन्ससारखा खिश्चन संस्कृतीचा पुरस्कर्ता व्याख्याता. मग काय! युरोपियन, खिस्ती, हिंदु व मुसलमान वगैरे धर्माच्या लोकांनीं थिएटर अगदीं फुलून गेलें होतें. एकूण एक समाज सुशिक्षित! डॉ. जोन्सनीं आपल्या भाषणांत हिंदुधर्मावर टीका करून आपली संस्कृति उच्च असल्याबद्दल पटविण्याची पराकाष्ठा केली, व आपलें भाषण संपविलें. सर्वत्र गंभीर शांतता पसरली. डॉक्टरसाहेब उठले. डिवचून उठविलेल्या शार्दूलाचीच उपमा त्यांना त्यावेळीं शोभली असती. आपल्या घोगऱ्या आवाजात आरंभीचें वाक्य त्यांनी उच्चारलें, 'Here two doctors differ on principles'. नंतर व्याख्यात्यानीं केलेलें प्रत्येक विधान वेदोच्छिष्ट कसें आहे हें तुलनात्मक दृष्टीनें पटवून द्यायला सुरवात झाली. व्याख्यात्यांच्या प्रत्येक विधानाला वेदांतील वचनें उद्धृत करून केलेल्या उपहासात्मक भाषणांत वाक्यागणिक टाळ्या पडत होत्या. डॉक्टरसाहेबांची परिणामकारक वाणी आपल्या अस्त्रांची अमोघ फेंक करूं लागली होती. सारेंच भाषण कांहीं आतां आठवत नाहीं. मात्र त्या भाषणानें केलेला परिणाम व त्यांतील कांहीं वाक्यें अंतःकरणावर कोरलेलीं आढळतील. The learned lecturer of to-day put forth the principle of a western philosopher, 'Man is what he eats.' But our Vedas, thousands of years ago, proclaimed, "अन्नं वै पुरुषः।" What is it after all? Is it not a mere translation of our Vedic principle?....

And who was Jesus Christ? He was born in Asia. At this juncture it is not East that needs this Gospel so much as the West that is after blood and bombs. We may say, to-day, there is Christ born in India... is being crucified and perhaps will be crucified to-morrow... Mahatma Gandhi! What do you find in the present movement? The unarmed men make the armed men disarmed." टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटानें पॅलेस थिएटर दुमदुमून गेलें होतें. त्यांच्या भाषणांत विषयाच्या गांभीर्याबरोबरच निरूपणाची जादु होती, बहुश्रुतपणाबरोबर विनोदाची चमक दिसून येत होती, उपरोधिक भाषेबरोबरच तपश्चर्येचें तेजही दिसून येत होतें.

१९३३ सालीं शिकागो परिषदेस गेल्यावेळीं न्यूयॉर्क येथील सेमिनरी कॉलेजचे प्रि. डॉ. ह्यूम यांनीं आपली संस्था व लायब्ररी पहाण्यास डॉक्टरसाहेबांना आमंत्रण दिलें होतें. त्यावेळीं अचानक डॉ. जोन्सची व त्यांची तेथें गांठ पडली. आपल्या मित्रांना डॉक्टरसाहेबांची ओळख करून देतांना डॉ. जोन्सनीं उद्गार काढले, "The only man who beat me in India." 'World orator' म्हणवून घेणाऱ्या डॉ. जोन्सच्या ह्या उद्गाराखेरीज त्यांच्या वक्तृत्वास दुसरें कोणतें सर्टिफिकेट हवें?

त्यानंतरचीं त्यांचीं अत्यंत गाजलेलीं भाषणें म्हणजे दुसऱ्या खेपेस विलायतेहून परत आल्यानंतर त्यांनीं गुंफलेली व्याख्यानमाला! १९३४ च्या जुलै महिन्यांत १९।२०।२१।२२ रोजीं त्यांनीं जर्मन राष्ट्रांतील घडामोडींवर प्रकाश पाडणारीं अशीं एकंदर चार व्याख्यानें दिलीं: (१) हिटलर व हिटलरशाही, (२) जर्मनींतील नाझी सरकार, (३) जर्मन

तरुणांची चळवळ, व (४) जर्मनी व नि शस्त्रीकरण या चार व्याख्यानां-तून हिटलरचें चरित्र, त्यानें अवघ्या १४ वर्षांत केलेलें कार्य, व्हर्सायच्या तहानें जर्मन राष्ट्र भिवेस लागून त्याच्यामध्यें उत्पन्न झालेली भयंकर चीड व असंतोष, सर्वाधिकारशाहीची स्थापना, ज्यू लोकांची भाडवलशाही, त्यांची हद्दपारी, नाझी सरकारची स्थापना, जर्मन तरुणाची चळवळ वगैरेंचें सुंदर विवेचन करून त्याचा परिणाम पाश्चात्य राष्ट्रावर काय होणार हे अगोदरच त्यांनी भाकीत करून ठेवले, व पश्चिमेनें पूर्वेकडील शांतिमत्तेचें तत्त्वज्ञान शिकलें पाहिजे, वेद, उपनिषदें व गीता यानीं प्रतिपादलेलें विश्वबंधुत्व व आत्म्याचें अमरत्व याचा अभ्यास केल्यास जगांत सुख व शांति लाभेल, व महात्मा गांधींच्या तत्वज्ञानात हा धडा ओतप्रोत भरला असल्याचें त्यांनीं या चार व्याख्यानांतून स्पष्ट करून सांगितलें

तसेंच, पुढें १९३७ च्या जूनमध्यें २५।२६।२७ या तीन दिवशीं तीन जगप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी अमेरिकेचे प्रेसिडेंट रूझवेल्ट, इटालियन फॅसिस्ट पंथाचे प्रवर्तक सिनॉर मुसोलिनी, व तुर्कस्थानचे उद्धारक कमालपाशा याच्या प्रभावी राजकारणावर राजाराम कॉलेजमध्यें सुंदर, सुश्राव्य व वक्तृत्वपूर्ण व्याख्यानें त्यानीं दिलीं सदर तीनही व्याख्यानांत या तीन्ही व्यक्तींचीं चरित्रें थोडक्यांत सागून त्यांच्या पूर्वीच्या त्या त्या राष्ट्राचा इतिहास, त्यांनी आपापल्या देशांत केलेल्या सुधारणा व नवचैतन्य यांचें फारच सुंदर रीतीनें विवेचन केलें, व त्यापासून हिंदुस्थाननें कोणता बोध घेऊन आपला उद्धार व उत्कर्ष घडवून आणावा हें सांगितलें. डॉक्टरसाहेबांच्या 'गाजलेल्या भाषणां'त वरील व्याख्यान सग्राह्याचा अवश्य उल्लेख करावयास हवा. त्यावेळीं जमणारा प्रचंड श्रोतृसमुदाय हीच त्यांच्या वक्तृत्वाची साक्ष !

सुवर्ण निर्गतीच्यावेळीं राजाराम कॉलेजात त्यांनी तीन दिवस एक व्याख्यानमाला गुंफली. अगदी वक्तृत्वाच्या भरात आले की त्यांनी आपल्या डोक्यावरील फेटा काढून ठेवावा व आपल्या पहाडी आवाजांत कोटी, विनोद वगैरेंच्या सहाय्यानें आपले विचार पटवून देण्याची पराकाष्टा करावी. त्यावेळीं त्यांनी केलेला कळकळीचा उपदेश: 'Conserve, preserve, and reserve gold,' हा सर्वांच्या स्मृतिपटलावरून केव्हांही पुसला जाणार नाहीं.

राजकारणांतील वेळोवेळीं होणारीं वादळें ऐन भरांत असताना विद्यार्थ्यांनीं वर्गांत विचारलेल्या प्रश्नांची उत्तरें देण्यासाठीं व त्यांच्या विद्यार्थ्यांचें लक्ष वेधण्यासाठीं डॉक्टरसाहेबांनीं कॉलेजात व्याख्यान द्यावें. त्या वादळाचें थोडक्यात दिग्दर्शन करून त्याचा शेवट कोणत्या तऱ्हेनें होणार हे अगोदरच भाकित करून आपल्या विद्यार्थ्यांना ह्या विषयाची गोडी लावून द्यावी, असाही क्रम चाले.

डॉक्टरसाहेबांनीं स्वत शेंकडों व्याख्यानें देऊन ज्ञानप्रसार केल्याच त्याशिवाय कॉलेजच्या संमेलन प्रसंगीं, आर्यसमाजाच्या वार्षिक उत्सव प्रसंगीं व इतर प्रसंगीं प. मालवीय, डॉ. जयकर, प्रि. मॅकेन्झी, सर चिमणलाल सेटलवाड, बॅ चंदावरकर, श्री. तात्यासाहेब केळकर, व्हाइस चान्सलर मि. मसानी आदि बड्या बड्या पाहुण्यांना बोलावून आणून करवीर विद्यार्थिवर्गाला व जनतेला त्यांनीं बौद्धिक मेजवान्या दिल्या.

डॉक्टरसाहेबांच्या वक्तृत्वाचें शेवटचें दर्शन करवीरस्थांना पहावयाला मिळालें ते सुप्रसिद्ध क्रिकेटमहिनाथ श्री. सत्यारखान कोल्हापुरास आल्यावेळीं! प्रो. फडक्यांनी व्याख्यात्यांची आरभीं करून दिलेली ओळख, श्री सत्यारखानांचें तासभर अस्खलित भाषण व शेवटीं डॉक्टरसाहेबांनीं केलेला समारोप! वक्तृत्वाचा त्रिवेणी संगम जर केव्हां

चवायला मिळाला असेल तर त्याचवेळीं!

## क्रीडाप्रेम

डॉक्टरसाहेबांचें क्रीडाप्रेम खरोखरच बाळाणपणासारखें होतें. शाळेंत असताना खेळाकडे दुर्लक्ष झालें असलें तरी कॉलेजात असताना फरीगदगा, अश्वारोहण, नौकाविहार, फुटबॉल वगैरे खेळ त्यांना अत्यंत आवडत हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय कोल्हापुरात प्रथम आल्या-वेळीं दरबारनें त्यांच्या दिमतीला एक घोडा दिलेला होता. त्यावेळीं दररोज सकाळीं ते त्या घोड्यावरून रपेट करून येत. नौकाविहाराचा इतका नाद कीं आरमी विद्यार्थ्यांबरोबर ते वेळोवेळीं नौकाविहारास जात. मैदानी खेळाबरोबरच त्यांचा अत्यंत आवडता बैठा खेळ म्हणजे बुद्धिबळ! त्या कलेंत त्यांनी इतकें प्राविण्य मिळविलें होतें कीं मद्रासमध्यें असताना सार्वजनिक चढाओढींत त्यांनी भाग घेतला होता. त्यांत ते शेवटपर्यंत टिकून राहिले. सरते शेवटीं राहिलेले त्यांचे प्रतिस्पर्धी एक वडे उमराव होते. त्यांनाही जिंकल्यावर डॉक्टरसाहेबांच्या सन्मानार्थ एक तलवार त्यांना अर्पण करण्यांत आली. ती तलवार अजूनही त्यांच्या संग्रहीं आहे. कोल्हापूरच्या दरबारप्रसंगीं दरबारी पोशाखांत वावरतांना फर्स्ट क्लास ऑफिसर्सना जी तलवार वापरावी लागते, त्यावेळीं डॉक्टरसाहेब हीच तलवार वापरीत. परदेशांत जाऊन त्यांना तलवार जरी गाजविता आली नाही तरी ते तलवार मिळवून मात्र आले खास! बुद्धिबळाच्या खेळावरील प्रेमामुळें त्यांनी त्यावरील येथ ग्रंथ वाचून त्यांचा अभ्यासही केलेला होता. याची साक्ष 'बुद्धिबळक्रीडारनें' हा श्री. ग. रं दळवीकर यांच्या पुस्तकाला त्यांनी लिहिलेल्या उपोद्घातावरून पटून येईल.

डॉक्टरसाहेबांना शिकारीचा नाद! क्षुधेत गगनचारस्यास

गेल्यावेळीं शिकारीच्या नादापायीं डोंगरच्या डोंगर त्यांनीं पायीं तुडविले आहेत. सुदैवानें शिकारी लोकांची एक छोटी टोळी त्यांच्याबरोबर नेहमी असायची! सांबर, भेकर, डुक्कर वगैरेंच्या शिकारी त्यांनीं केल्या आहेत. ह्या सर्वांवर कळस म्हणजे १९३६ च्या डिसेंबरात श्रीमंत विशाळगडकराचे पाहुणे म्हणून गेल्यावेळीं मलकापुरच्या पश्चिमेकडील जंगलात ५॥ फूट लांबीचा चित्ता त्यांनीं अचूक निशाणबाजीनें पहिल्याच काडतुसानें ठार केला. या चित्त्यानें तेथील शेतकरीवर्गास अत्यंत सतावून सोडलें होतें. या शिकारीनें त्यांनीं आपल्या विद्वत्तेप्रमाणेंच मृगयेंतील नैपुण्य प्रगट करून दाखविलें. आपण स्वत केलेल्या शिकारीपैकी काहीं प्राणी भरून त्यांच्या बैठकीच्या खोलींत जागोजागीं ठेवलेले त्यांच्या भेटीस गेलेल्या पुष्कळांनीं पाहिले असतीलच.

खेळाविषयीची त्यांची आवड त्यांच्या उतारवयात देखील अत्यंत उत्कटत्वानें दिसून येत होती. राजाराम कॉलेजातील जिमखाना विभागाची केलेली सर्वांगीण उन्नति व विद्यार्थ्यांमध्यें निरनिराळ्या खेळाविषयीं जागृत केलेला अपूर्व उत्साह त्यांचाच निदर्शक होय. दम्यानें शरीर पोखरून टाकले असताना देखील मृत्युपूर्वी चार पाच महिन्यांपर्यंत ते आपल्या मुलींच्याबरोबर रोज नेमानें एक दोन डाव रिंगटेनिस खेळत. राजाराम कॉलेजच्या मोठमोठ्या सामन्याना जातीनें हजर राहून विद्यार्थ्यांच्या क्रीडाप्रियतेला ते वारंवार प्रोत्साहन देत. येथील खासबागेतील राजाराम कॉलेजचें टर्फ ग्राउंड व पॅव्हेलियन म्हणजे डॉक्टरसाहेबांच्या क्रीडाप्रेमाचें मूर्तिमंत प्रतीकच!

### मिसेस बाळकृष्ण

गेल्या १६ वर्षांत डॉक्टरसाहेबांना विविध क्षेत्रात कामगिरी करून यश संपादण्याला जें शारीरिक व मानसिक स्वास्थ्य लाभलें

त्याचें बरेंचसें श्रेय त्यांच्या पत्नी श्रीमती राधाबाई यांच्या संसारदक्षतेला द्यावयास हवें. सान्या प्रपंचाची व्यवस्था त्या अत्यंत दक्षतेनें पाहात. डॉक्टरसाहेबांना पैसे देण्याची व हिशेब घेण्याची जी दगदग पडे तेवढीच! कुणी पाहुणा आला किंवा येणार असला की तेवढी बातमी कळावी डॉक्टरसाहेबांनीं! त्यांच्याकडे येणाऱ्या मित्रमंडळींच्या चहापाण्यापासून तो वस्त्या वस्त्या पाहुण्यांना देण्यांत येणाऱ्या मेजवान्यांपर्यंत सारी व्यवस्था त्यांनीं अत्यंत चोख रीतीनें ठेवावी. १९१९ सालीं पहिली पत्नी वारल्यानंतर १९२५ पर्यंत राजाराम कॉलेजची पूर्ण घडी बसेपर्यंत त्यांनीं विधुरावस्थेतच काढली. पुढें १९२५ च्या डिसेंबरांत त्यांनीं हा द्वितीय विवाह केला. मिसेस बाळकृष्ण ह्यांनीं स्वतः वैद्यकी शिक्षण घेतलें असल्यामुळें डॉक्टरसाहेबांना त्यांच्या दम्याच्या प्रकृतीची काळजी घ्यायला आयतेंच एक 'तज्ञ माणूस' मिळालें! मुलाबाळांची दुखणीखुपणीं, डॉक्टरसाहेबांचा आजार, घरचा प्रपंच, मुलाबाळांच्या अभ्यासाची व्यवस्था, नोकरचाकरांवर देखरेख, आल्यागेल्यांचा पाहुणचार, दूधदुभतें, बाग वगैरेची व्यवस्था त्या अत्यंत दक्षतेनें पाहात असल्यामुळें डॉक्टरसाहेबांना तिकडे लक्ष्यच घावें लागत नसे. त्यांच्या आवडीच्या विषयाशीं उदेशून बोलायचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, त्यांच्या घरांत निर्दोष 'द्विदल राज्यपद्धति' (Dyarchy) होती. कांहीं खातीं डॉक्टरसाहेबांनीं आपणाकडे ठेवून बाकीचीं सर्व खातीं मिसेस बाळकृष्णांच्याकडे सोंपविलेलीं होतीं.

डॉक्टरसाहेबांच्या प्रकृतीला तर त्या अत्यंत जपत. ड्रेसिंग, किरकोळ औषधें, व इंजक्शनें घ्यायला त्यांना इतर डॉक्टराची जरुर भासत नसे. घरचा डॉक्टर नेहमी सेवेला तयार! डॉक्टरसाहेबांच्या प्रकृतींत थोडाफार चढउतार झाला कीं, निश्चिंतीचा व श्रीजाचा यांचा टक्कर

सारखा सुरू होई. मिसेस बाळकृष्णांनी त्यांच्या प्रकृतीची जितकी काळजी घेतली, तितकी डॉक्टरसाहेबांनी स्वतःच्या प्रकृतीची घेतली नाही. मिसेस बाळकृष्णांची डॉक्टरसाहेबांच्या प्रकृतीवर करडी नजर नसती तर सतत १५।१६ वर्षे दर्यादरी डोंगरदऱ्यांतर्फे त्यांचे शरीर कार्यक्षम होऊच शकले नसते असे म्हटल्यास अतिशयोक्ति मुळीच होणार नाही. अमेरिकेस सर्वप्रथम परिषदेस गेल्यावेळी डॉक्टरसाहेबांच्या बरोबर जाण्यात तिकडील देश पाहाण्याबरोबरच तिकडील थंड प्रदेशांत त्यांच्या प्रकृतीला जपणे हाही एक त्यांचा हेतु होता. डॉक्टरसाहेबांना 'गृहिणी सचिवः सखी मिथः' याचा अनुभव आणून देणारी गृहकृत्यांत अत्यंत दक्ष अशी पत्नी लाभली म्हणूनच आपल्या कार्याचा एवढा पसारा वाढविण्यास त्यांना पुरसत मिळाली. या द्वितीय संबंधापासून डॉक्टरसाहेबांना चार मुली व एक मुलगा, अशी एकंदर पाच अपत्ये आहेत.

## व्यक्ति, व्यासंग व मते

डॉ. बाळकृष्णांच्यासारख्या थोर व विद्वान् गृहस्थांच्या सान्निध्यांत राहाण्याची संधी मला त्यांच्या शेवटल्या दोन वर्षांत लाभली. आरंभी राजाराम कॉलेजचा विद्यार्थी म्हणून व पुढे येथील शाहू दयानंद मी हायस्कुलांतील एक शिक्षक या नात्याने त्यांच्याशी माझा थोडाफार संबंध आला असला तरी प्रत्यक्ष परिचय असा फारसा नव्हता. मात्र १९३९ व १९४० या दोन साली उन्हाळ्याच्या सुटीत त्यांच्या मुलीचा शिक्षक व त्यांच्या लेखनाच्या कामांतील मदतनीस म्हणून त्यांच्याकडे दोन दोन महिने राहाण्याचा मला योग आला.. उन्हाळ्याच्या सुटींत ते कोल्हापुरच्या पश्चिमेस ३२ मैलांवर असलेल्या गगनबावड्याजवळील आपल्या बंगल्यांत जाऊन राहात. त्यांच्या त्या उन्हाळी वसतिस्थानाची

(Summer resort). व तेथील त्यांच्या कार्यक्रमाची स्थूल कल्पना येथें दिल्यास अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें. गगनबावड्याच्या अलिकडे दीडएक मैलावर मोटाररस्त्यापासून फर्लांगभर आंत निसर्गाच्या सान्निध्यांत त्यांनीं ८००० रुपये खर्चून 'कृष्णकुंज' नांवाचा एक टुमदार बंगला बांधला आहे. चोहोंबाजूला लहान लहान टेकड्या, बंगल्यामोंवतीं प्रशस्त सपाट जागा, तेथेंच केलेली देशी–विलायती फळफुलांची इवलीशी बाग, जवळूनच खळखळत वाहणारा लहानसा ओढा, त्या ओढ्याला घातलेलें एक छोटेसें धरण, धरणावर घरापुरती केलेली भाज्यांची लागवड, ओढ्यापलिकडे करवंदें व तोरणें यांच्या जाळ्या, आसपास जांभळें, अळू, आंबे व पेरू यांच्या लहान लहान राया, व लगतच श्रीमंत बावडेकरांच्या दोन बंगल्यांचा शेजार! शहरी वातावरणापासून सर्वस्वी अलिप्त असलेल्या अशा या निवांत ठिकाणीं मनःपूत वाचन व लेखन करावें, संध्याकाळीं अंगणांतील रिंगटेनीस ग्राउंडवर एखादा दुसरा डाव खेळावा, मधून मधून शिकारीस जावें, धरणावर गळ टाकून 'फिशींग' ची करमणूक करावी, वाटल्यास एखाद्या टेकडीवर जाऊन सृष्टीसौंदर्य मनसोक्त लुटावें, अथवा सकाळीं रानांतून किंवा जाळ्यांतून सहज करीत करीत रानफळांचा आस्वाद घ्यावा व संध्याकाळीं सह्यशिखरांवरून वाहात येणाऱ्या थंडगार वाऱ्याच्या मंदमंद झुळुकेंत सान्या दिवसाचा शीण घालवावा असा तेथें त्यांचा कार्यक्रम असे. अशा ठिकाणीं त्यांच्या निकट सहवासांत राहात असतांना त्यांचें घरगुती जीवन, व्यासंग, लेखन व त्यांच्या व्यासंगनिष्ठेचें यांचा बारकाईनें अभ्यास करण्याची मला संधी मिळाली. दम्यानें शरीर जर्जर झालें असतांना देखील शेवटच्या दोन वर्षांत त्यांनीं टिकवलेला व्यासंग पाहून आपल्या आयुष्याच्या दैनंदिन रहाटींत त्यांनी केलेल्या कालव्ययाची मला थोडीफार कल्पना येई. मी तेथें जाण्यापूर्वी ते

मधून मधून शिकारीस जात, पण पुढें पुढें दम्यामुळें तितकें चालणें त्यांना झेंपत नसल्यामुळें शिकारीऐवजीं ते सकाळीं मैल दीड मैल फिरावयास जात. फर्ग्युसन गेटपर्यंत चाढून गेल्यावर दमून काठीवर रेलून दोन चार मिनिटें विश्रांति घ्यावी व पुढें पुन्हा चालू लागावें असा त्याचा क्रम चाले. त्याच्याबरोबर चालण्यानें एखाद्या तरुणमनुष्याच्या बरातींत चालण्यानें होण्याइतकाच मला व्यायाम होई, व सकाळच्या फिरण्यानें येणाऱ्या तरतरीपेक्षां उलट शीणच येई, याची जाणीव असूनही त्याच्याबरोबर फिरावयाला जाण्यास मी नेहमींच उत्सुक असे यांचें कारण, त्यावेळीं निरनिराळ्या क्षेत्रांतील ते जे आपले अनुभव सांगत त्याचा मुकेला म्हणून! घरांतून निघाल्यापासून परत येईपर्यंत कोणती ना कोणती तरी चर्चा चाले. राजकारणांतली किंवा शिक्षणक्षेत्रांतली मी एखादी शंका विचारली की डॉक्टरसाहेबांना बोलायला विषय मिळे. त्याविषयींचे ते आपले विचार सांगतच, खेरीज, अवांतर खूप माहिती देत. तसेंच दररोज सध्याकाळीं खेळल्यानंतर किंवा फिरून आल्यानंतर बागेंत विश्रांति घेतांना येथील व परदेशांतील शिक्षणक्रमावरील ते आपले विचार सांगत.

शालेय शिक्षणाच्या बाबतींत त्यांचीं मतें पुष्कळशी सनातनीच होतीं त्यांनीं आपल्या वडील मुलाला गुरुकुल कांगडीस विद्याभ्यासासाठीं ठेवलें होतें अलिकडे सर्वत्र बोकाळलेल्या शिक्षणांतील 'प्रत्यक्ष पद्धती'च्या (Direct Method) तर ते विरुद्धच होते. "ह्या पद्धतीमुळें विद्यार्थ्यांना त्या त्या विषयाचें ज्ञान वरवरचें मिळतें, त्यातील मूलभूत तत्त्वांना विद्यार्थी मुकतो, व एखाद्या विषयाचें संपूर्ण ज्ञान करून घेण्याची तळमळ तर त्याला लागतच नाहीं समुद्राच्या तळाशीं बुड्या मारून तेथील माणिकमोतीं हस्तगत न करता पृष्ठभागावरच तरंगून काठचे शंखशिंपले

गोळा करण्यांतच आनंद मानण्यासारखी प्रवृत्ति आहे ह्या ' प्रत्यक्ष पद्धती'ची ! ह्या पद्धतीमुळें बोलण्यांत थोडासा धीटपणा येत असला तरी एक धड ना भाराभर चिंध्या अशीच विद्यार्थ्यांच्या ज्ञानाची स्थिति होते. इंग्रजी वातावरणांतील ' प्रत्यक्ष पद्धती'चें अनुकरण आपल्या देशांत रूढ करणें इष्ट नव्हे. या पद्धतीमुळें खिलाडूवृत्ति अंगीं बाणत असली तरी ज्ञानपिपासा मात्र वाढत नाहीं हेंही तितकेंच खरें!" अशी त्यांची थोडक्यांत विचारसरणी होती. पूर्वीची पाठांतरपद्धति दिवसेंदिवस नाहींशी होत चाललेली पाहून त्याबद्दल ते तीव्र नापसंती दर्शवीत. "अलीकडील शिक्षणक्रमांत संगीत व धर्म यांचा अवश्य समावेश करायला हवा. आपल्या धर्माचें, आपल्या उच्च संस्कृतीचें शिक्षण विद्यार्थ्यांना देऊन त्यांच्यांत राष्ट्रप्रेम जागृत करायला हवें. आज जो इतिहास शाळेंत शिकविला जातो त्यांत आम्ही कसें खालावलों, पराभूत कसें झालों व गुलाम कसें बनलों याचेंच शिक्षण दिलें जातें. आपल्या पूर्व दिव्यत्वाची व संस्कृतीची ओळख करून द्यायला हवी! शाळेंत चाललेल्या इतिहासाचें शिक्षण देशभक्त निर्माण करीत नाहीं. मागील अनुभवानें आम्ही शहाणे कसे व्हावें हें शिकण्यासाठीं इतिहास शिकविला पाहिजे."

"तसेंच, शाळेंत इंग्रजी चवथ्या इयत्तेपासून जें इंग्रजी व्याकरण शिकविलें जातें त्यांतील अर्थच विद्यार्थ्यांना कळत नाहीं. त्यामुळें व्याकरणाबद्दल एक प्रकारची अनास्थाच सर्वत्र दिसून येते. यासाठीं इंग्रजी व्याकरणाची मूलतत्त्वें अगोदर मातृभाषेतून विद्यार्थ्यांना शिकवावीत; व्याख्या व उदाहरणें मात्र इंग्रजी द्यावीत; व हीं आनशात् शास्त्राचें दिसतांच इंग्रजी माध्यम उपयोजावें" असे त्यांचे विचार होते. त्याप्रमाणें त्यांनी मास्याकडून एक व्याकरणाचें पुस्तक लिहून घ्यायला सुरुवात केली

होती. पहिला भाग त्यांच्या हयातींतच तयार झाला होता व तो त्यांनीं तपासलाही होता. पण त्यांच्या शोचनीय मृत्यूमुळें तें काम तसेंच राहून गेलें आहे. डॉक्टरसाहेबांचे विचार थोडेसे सनातनी वाटत असले तरी त्यांचा अनुभव व निरनिराळ्या देशांतील शिक्षणपद्धतीचा अभ्यास करून त्यांनीं निश्चित केलेलीं मतें वस्तुस्थितीचें दिग्दर्शन करीत नाहींत का?

अलीकडील विद्यार्थ्यांचें स्पेलिंग दिवसेंदिवस खालावत चाललेलें पाहून इंग्रजींतील स्पेलिंगच्या बाबतींत कांहीं ठोकळ नियम बसवून त्यावर 'Hints on Correct Spelling' या नांवाचें एक छोटें पुस्तक लिहिण्याचें कार्य त्यांनीं सुरू केलें होतें. त्याचप्रमाणें मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांसाठीं 'Comparative Philology' नांवाचें एक छोटेसें पुस्तक लिहून सर्वसामान्य इंग्रजी शब्दांची उत्पत्ति मूळ कोणत्या भाषेंतील आहे, त्याचे ग्रीक, लॅटीन, संस्कृत, फारसी, हिंदी व मराठी प्रतिशब्द कोणते, त्यांच्यात असलेलें साम्य, व निरनिराळ्या भाषेंत जातांना त्यांच्यात होणारी प्रक्रिया यांचें थोडक्यात दिग्दर्शन या छोट्या पुस्तकांत करण्याचा त्यांचा विचार होता. रोज रात्रीं जेवण झाल्यानंतर ह्या कामासाठीं माझी ते मदत घेत असत. या दोन्ही पुस्तकांचें बरेंचसें लिखाण झालें होतें. गेल्या उन्हाळ्याच्या सुटींत तीं दोन्हीं पुस्तकें पुरीं करण्याचा त्यांचा मानस होता. पण करटाचें निमित्त होऊन त्यांच्या मानेवर शस्त्रक्रिया केली असल्यामुळें बरेच दिवस ते अंथरुणाला खिळून होते. त्यांतून थोडेसे बरें वाटायला लागल्याबरोबर त्यांनीं आपला 'शिवाजी' अपुरा राहील या भीतीनें त्याच्या शेवटच्या भागाकडे आपलें लक्ष वळविलें. यामुळें हीं दोन्ही पुस्तकें अपूर्णावस्थेतच राहिलीं. दिवसेंदिवस अशक्तता वाढत चालल्यामुळें मृत्यूची छाया त्यांना भेडसावीत असावी असें दिसतें.

एकदां तर मी त्यांना म्हणालों, "सारीं कामें बाजूस सारून चार सहा महिने विश्रांति घेतल्यास चालायचें नाहीं कां? निदान कॉलेजच्या कामांत लेखनाची तरी दगदग नको." त्याला त्यांनीं थोडेसें निराशेनें उत्तर दिलें, "I am at the close of my career. I must jot down whatever I have in me."

अशा परिस्थितींत देखील शेवटल्या दोन वर्षांत त्यांनीं ठेवलेला व्यासंग पाहून आम्हाला अचंबा वाटे. सुटींत वानवडीस असतांना त्यांचा रात्रंदिवसप्रमाणें कार्यक्रम असे : सकाळीं ५॥ ला उठून प्रातर्विधी, फिरणें व न्याहारी आटोपून आठ वाजायच्या सुमारास ते बैठक मारून बसले कीं ११॥ वाजेपर्यंत जागचे हालायचे नाहींत. मी मात्र मधून मधून चुळबुळ करीत असे. पण डॉक्टरसाहेब आपल्या खालावलेल्या प्रकृतींत सुद्धां हूं का चूं करीत नसत. आपल्या विषयाशीं तद्रूप होऊन गेल्यामुळें इतर गोष्टींचें त्यांना भान राहात नसे. मध्यंतरीं एकदा चहा घेण्यासाठीं जी विश्रांती मिळे तेवढीच! नंतर आंघोळ व जेवण. जेवल्यानंतर टपालाचें काम. आलेला पत्रव्यवहार वाचून त्याला उत्तरें लगेच देऊन मोकळे व्हायचे. मग वर्तमानपत्राचें वाचन व थोडी विश्रांति. पुढें तीन वाजल्यापासून सहा वाजेपर्यंत पुन्हा वाचन किंवा लेखन. त्यानंतर ८ वाजेपर्यंत थोडेसें लोळणें किंवा फिरणें, विश्रांति, फलाहार व जेवण. ८ ते १०॥ पर्यंत पुन्हा वाचन किंवा लेखन, व मग निद्रा. दम्याच्या प्रकृतीमुळें अलिकडे विशेषतः रात्रीं त्यांना पाठीवर झोंपता येत नसे. त्यावेळीं मुखोंप्रमाणें पोटाशीं गुडघे घेऊन व तक्क्यावर टेंकून टेबल किंवा तेवढी झोंप घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्या कारुण्य मूर्तीकडे पाहून मला धीर येई! एकंदर दोन तीन तास देखील स्वस्थ झोंप कधीं त्यांना मिळत नसे! पहाटेस परत्या परत्या कुशींत पुस्तक घेऊन पडावें, एरवीं दुसरी

आली की तेवढीच झोंप उपभोगावी व पुन्हा वाचत राहावें अशा रीतीनें झोंपेची आराधना करीत रात्रींच्या रात्रीं घालविलेल्या त्याना मी पाहिल्या आहेत. मध्येंच एकादा विचार सुचला कीं, पेन्सिल घ्यावी, टेबल पुढें ओढावा, सुचलेल्या विचार वेडावाकडा कागदावर उतरून ठेवावा, व अशा सर्व विचाराची संगति जमली कीं ते सर्व कागद जुळवून आपल्या टाइपिस्टकडून सुसंगतरीतीनें टाइप करून ठेवावेत. डॉक्टरसाहेबाना केव्हांही पाहिलें असतें तर ते आपल्या दिनक्रमात तरी गुंतलेले असायचे नाहीतर वाचन वा लेखन! अगात १०३°–१०४° पर्यंत ताप असला तरी देखील त्यांचें वाचन चालू असायचेंच. शेवटच्या आजारात तर डॉ. भडकमकर वगैरेंनीं त्याना बजावलें होतें कीं, "आपलें जीवनयंत्र केवळ औषधावर चाललें आहे कोणत्याही तऱ्हेची लेखनाची, वाचनाची किंवा विचार करण्याची दगदग करू नका." पण आपला 'शिवाजी' अपुरा राहील ह्या भीतीस्तव डॉक्टरांच्या सूचनेला देखील न जुमानता रात्रीं अपरात्रीं उठून त्यानीं एकादें पान लिहून ठेवावें. 'शिवाजी' पुरा करायचा एकच ध्यास! ज्यादिवशीं 'शिवाजी'चा शेवटचा परिच्छेद लिहिला त्यावेळीं त्याना अत्यंत आनंद झाला. अंथरुणावर पडल्या पडल्या त्यानीं मिसेस बाळकृष्णाना सांगितलें, "आजपर्यंत केलेल्या श्रमाचें सार्थक झालें. एका मोठ्या जबाबदारींतून पार पडल्याचें समाधान आज मला झालें आहे" काळ त्यांच्या ह्या ग्रंथाच्या पूर्ततेची वाटच पाहात होता कीं काय कळत नाही कारण तो ग्रंथ पुरा केल्याचा समाधानाचा सुस्कारा सोडल्यानंतर त्या ग्रंथाच्या 'सूची'चा फॉर्म छापेपर्यंत देखील नियतीला दम धरवला नाहीं. वाङ्मयतपस्येच्या कामीं आपल्या प्रकृतीची त्यानीं जी हेळसांड केली तिनेंच त्याना शेवटीं दगा दिला शेवटीं शेवटीं आजाराला तर ते इतके कंटाळले होते कीं, आपला आजार कांहीं हटत

नाहीं, निदान व्यासंग तरी चालू टेवावा, असें त्यांना वाटलें असेल! कांहींही असो, आजाराला कटाक्षून व्यासंग व व्यासंगामुळें आजार अशा परिस्थितींतच त्यांना प्रकृतीचें स्वास्थ्य कांहीं लाभलें नाहीं.

डॉक्टरसाहेबांना बऱ्याच भाषा येत होत्या, व बऱ्याच विषयाचें त्यांना ज्ञान होतें. इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व तर वाखाणण्यासारखें होतें. अत्यंत सफाईदार रीतीनें ते इंग्रजी बोलत व लिहीत. हिंदीवरील त्यांचा अधिकार अत्यंत कौतुकास्पद होता. त्यांनीं इंग्रजींत व हिंदींत लिहिलेल्या पुस्तकाचा उल्लेख मागें आलाच आहे. त्यांची मातृभाषा मुलतानी. उर्दू तर प्राथमिक शाळेंतच शिकलेली. फारसी भाषा चांगलीच लिहावयाला व वाचायला येत होती संस्कृत भाषेचा त्यांचा अभ्यास व व्यासंग बराच होता. फ्रेंच भाषा त्यांना चांगली समजत होती मराठी भाषा जरी त्यांना चांगली बोलता येत नव्हती (आपल्या मुलांबरोबर व नोकरांबरोबर ते नुसतमावसत मराठींतच बोलत) तरी मराठीचें त्यांनीं बरेंच वाचन केलें होतें; मात्र त्यांचा प्रांत मराठी रियासती, बखरी, ऐतिहासिक कागदपत्रें, चरित्रें व मराठी वाङ्मयाच्या इतिहासावरील ग्रंथ एवढाच असे. मराठीचा एक विद्यार्थी या नात्यानें केव्हां केव्हां जुन्या कागदपत्राचा अर्थ लावतांना ते माझी मदत घेत. फारसी भाषेचें ज्ञान असल्यामुळें कित्येकदां कुआट शब्दाचे अर्थ ते बरोबर सांगत. शिवाजीचें चरित्र लिहितांना महाराष्ट्राच्या इतिहासाची साधनें, समर्थांचें चरित्र, दासबोध, महाराष्ट्र-सारस्वत, पांगारकराच्या मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे खंड त्यांनीं वाचले होते. सर्व पाहिलें तर मराठी मुद्रितेजनाचें त्यांना वावडेंच होतें. पण त्यांच्या शालेय 'भारतवर्षाच्या इतिहासाच्या दुसऱ्या भागाच्या द्वितियावृत्तीच्यावेळीं प्रुफें तपासतांना ते मुद्रितेजनासंबंधीं माझ्याशीं चर्चा करीत. आरंभीं अमुक शब्दानंतर अनुस्वार का, अमका शब्द ऱ्हस्व कां, वगैरेची ते मोठ्या जिज्ञासेनें

पृच्छा करीत मीही यथामति त्याना समजावून सागत असे क्रियेच्या व्याकरणातून नियम काढून दाखविल्याखेरीज त्याच्या मनाचें समाधान होतच नसे त्या चर्चेच्या वेळीं ते शुद्धलेखनाचा अभ्यास करीत असतील अशी शकादेखील मला आली नाही महिना दीड महिन्यात त्यानीं तें इतकें आमसात् केलें कीं शेवटच्या मुद्राकाच्या वेळीं आमच्या नजरेतून सुट लेल्या चुका त्यानीं अचूक दाखवाव्या सागण्याचा हेतु इतकाच कीं मराठी शुद्धलेखनासारख्या चिकट विषयात त्यानीं अल्पावकाशात केलेली तयारी वाखाणण्यासारखी होती इतिहास, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाज शास्त्र, धर्मशास्त्र वगैरेंचा त्याचा अभ्यास गाढ होता हिंदु तत्त्वज्ञानाचा देखील त्यानीं अभ्यास करून यावर एक मोठा ग्रथ प्रसिद्ध केला आहे

त्याना गाता येत नसले तरी सगीताची त्याना अत्यत आवड होती, व ज्ञानही होतें एकदा येथील गधर्व निकेतनच्या एका वार्षिकोत्सव प्रसगीं अध्यक्ष या नात्यानीं त्यानीं आपल्या पूर्वकालीन संगीताबद्दल सामवेद वगैरेंतून उदाहरणें देऊन अत्यत सुश्राव्य व माहितीपूर्ण असें एक व्याख्यान दिलें

त्याची विद्वत्ता, व्यासग व बहुश्रुतपणा याकडे पाहिल्यास 'He is a walking Encyclopaedia' असे त्याच्याबद्दल एका प्राध्यापकानीं काढलेले उद्गार अगदीं सार्थ वाटू लागत

आपल्या ग्रथावर त्याचें अगदीं पुत्रवत् प्रेम होतें, इतकेंच नव्हे तर आपल्या पुत्राना आपल्या ग्रथाचींच नावें त्यानीं दिलीं गुरुकुलात असताना 'वेद क्यों ईश्वरीय ज्ञान है?' हें पुस्तक लिहिल्यावेळी त्याना पहिला मुलगा झाला त्याचें नाव 'वेदरत्न' असें ठेवलें, व सहा सात वर्षांपूर्वी कोल्हापुरात आपला हिंदींतील 'शुक्रनीतिसार' हा ग्रथ लिहून हातावेगळा केल्यावर त्याना जो दुसरा मुलगा झाला त्याचें नाव देखील 'शुक्रदेव' असें ठेवलें

डॉ. बाळकृष्णाचा खासगी ग्रंथसंग्रहालय बराच मोठा आहे इतिहास, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, वैदिक वाङ्मय वगैरेवरील हजारों दुर्मिळ व प्रमाण-ग्रंथांनीं भरलेल्या कपाटाशेजारी आराम खुर्चीवर एखाद्या जाडजूड ग्रंथात डोकें खुपसून बसलेली डॉक्टरसाहेबांची मूर्ती आता कोठून दिसायला! त्यांच्या पश्चात् त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथाकडे व त्यांच्या या ग्रंथसंग्रहालयाकडे पाहाताना 'गेला मयूर उरलाच परी पिसारा' हा कै. डॉ. माधवराव पटवर्धनांच्या एका काव्यातील चरण चटकन् डोळ्यापुढें उभा राहातो.

* * *

व्यक्ति या नात्यानें डॉ. बाळकृष्णांच्याबद्दल मला अत्यंत आदर वाटत होता. गरिबांबद्दलची आस्था हें त्यांच्या लोकप्रियतेचें एक अंग होतें. कॉलेजांतील विद्यार्थ्यांना फी भरण्याच्या बाबतींत मिळणाऱ्या सवलतीकडे व मदतीकडे पाहिल्यास गरीब विद्यार्थ्यांचा एक आधार नाहींसा झाला असें वाटल्यावाचून राहात नाहीं. नोकरांनीं व कनिष्ठांनीं केलेल्या चुकाकडे तर ते अत्यंत सहानुभूतीनें पाहात. एकदा मंगळवारपेठ येथील त्यांच्या बंगल्यातील बागेच्या समोर नेमलेल्या अडाणी लोकांनीं मजुरांशीं डोकेफोड करून त्रासलेल्या मिसेस बाळकृष्ण आम्हीं काम करीत होतों तेथें येऊन म्हणाल्या 'या लोकांना समजावून सांगेपर्यंत जीव अगदीं बेजार होतो कांहीं सुद्धा कळत नाहीं यांना! ....' मध्येंच डॉक्टरसाहेब शांत-पणें उद्गारले, "बाहायचच! कां उगाच त्रास करून घेतेस? येऊन चालून अडाणी ते! त्या बिचाऱ्यांना जर कळत असतें तर तीन घर आणि मजुरीवर कशाला राबायला आले असते ते आपल्याकडे?" कोठल्याही गोष्टीबद्दल त्यांनीं त्रास करून घेतल्याचें आठवत नाहीं इतकी शांत वृत्ति होती डॉक्टरसाहेबांची!

त्याची धीरगंभीर मूर्ति पाहिली कीं त्याच्याबद्दल एक तऱ्हेचा भीतियुक्त आदर प्रत्येकांना वाटे. पिंडे, पोया, पिंढ्या, हीर, फांद्या, नारळ वगैरे नात्यानीं आपल्यातील प्रत्येक भागाचा समाजाला उपयोग करून देणाऱ्या माडाचीच उपमा त्यांना साजेल. आपणाला माहीत असलेल्या प्रत्येक ज्ञानशाखेचा उपयोग त्यांनीं समाजाला करून दिलेला आहे, तसेंच धीरगंभीर दिसणाऱ्या ह्या माडाच्या अंतःकरणांत शहाळ्यातील मधुर अमृताचीच प्रचीति येई.

अभ्यासातील त्यांची एकाग्रता तर खरोखरीच वाखाणण्यासारखी होती. मुलें शेजारीं सारखी दंगा करीत असली तरी त्यांनीं कधीं पोरांना दटावलें नाहीं. अशा पोरांच्या गलबल्यात त्याचें लेखन चालू असायचें. एकदां तर व्हरांड्यात ते वाचीत बसले होते. त्या व्हरांड्यापुढील छोट्या बागेंत दोन म्हशी घुसल्या व वेली खाऊ लागल्या. डॉक्टरसाहेबांना याचें भानही नव्हतें. थोड्या वेळानें नोकर चहा घेऊन येतो तों त्यानें तीं गुरें पाहिलीं व हाकललीं. हें पाहून डॉक्टरसाहेब उद्गारले, "अरेच्या, हीं गुरें येथें केव्हा आलीं हें मला समजलें देखील नाहीं!"

त्यांचा कामाचा उरक मात्र मोठा दांडगा! आपला सारा व्यवसाय संभाळून इतर सरवांची कामें ते झटपट करून टाकत. क्षुल्लक गोष्टींत ते फारशी चिकित्सा करीत नसत. आपल्या विविध कार्यांच्या पसाऱ्यात वैयक्तिक पत्रें लिहिण्यास त्यांना वेळच मिळत नसे. सकाळीं दाढी करतां करतां आपल्या टाइपिस्टला आपला मजकूर सांगत, व दाढी संपण्याच्या आत चार पांच पत्रांचें लेखन सहज पुरें होई.

आदरातिथ्याच्या बाबतींत तर ते फारच प्रेमळ! त्यांच्याकडे आवड्यास कॉलेजच्या किंवा इतर कोणत्याही कामासाठीं आलेल्या पाहुण्यास ते एकदोन दिवस राहण्याचा आग्रह करीत. कोणीही मनुष्य त्यांच्याकडे राहिला कीं

सवर्णांचे भान न बाळगतां ते त्यांची उत्तम बडदास्त ठेवीत. त्यांच्यासाठीं शिकार, वनभोजन, वगैरे कार्यक्रम ठरवीत.

Privacy अशी त्यांना नव्हतीच. त्यांचे कागदपत्र, खासगी डायऱ्या, लेख, तिकिटें, पैशांचें पाकीट इत्यादि जिन्नस त्यांच्या अभ्यासाच्या खोलींत अनिर्बंध पडलेले असत. आपला मौल्यवान जिन्नस कोणीतरी लांबवील ही कल्पनाच त्यांना पटत नसावी. एवढा बडा गृहस्थ नोकर-चाकरांशीं इतक्या विश्वासानें व मनमोकळेपणानें वागतो याचें कोणालाही राहून राहून आश्चर्य वाटे.

'डॉ. बाळकृष्ण' हें एवढेंच नाव इतकें रूढ झालें होतें कीं त्यांच्याशीं अत्यंत निकटचा संबंध आलेल्या लोकांपैकीं फारच थोड्यांना त्यांचें संपूर्ण नाव माहीत असेल. एकदा तर वाड्यांत असतांना शेजारच्या धनगरवाडीतील एक इसम रात्रीं दीडदोनच्या सुमारास हाका मारत तेथें आला. बाहेरल्या खोलींतच मी निजलों असल्यामुळें त्यानें घाबऱ्या घाबऱ्या आवाजानें मला जागें केलें. कोण व काय याचा तपास करतां तो म्हणाला, "माजी पोरगी लई बीमार हाय. डागदर साहेबास्नी दावून वखुद मागावं म्हून आलो." हे औषध देणारे डॉक्टर नव्हेत हे त्याला पटवून देईपर्यंत माझी चांगली धांदल उडाली! निराशेनें तो मनुष्य निघून जातांच माझ्या मनांत एक विचार चमकून गेला, 'ज्या डॉक्टरांच्याकडे औषधाच्या आशेनें हा गृहस्थ आला होता त्याच डॉक्टरांना इकडे औषधावर दिवस काढावे लागत होते.'

डॉ. बाळकृष्णांना दम्यामुळें पावसाळ्यांत कोल्हापुरची हवा मानवत नसल्यामुळें ते मिरजेस सरकारी बंगल्यांत जाऊन राहत. दरम्यानच्या मागल्या वर्षीही ते तिकडे गेले होते. दम्यांतच तापाची भर पडून दुखणें अगदीं विकोपास गेलें. त्यांतूनही ते बरे होऊन परत कोल्हापुरास आले.

त्यांतेथें विद्यार्थ्यांनी केवढ्या प्रचंड उत्साहानें त्यांचें स्वागत केलें! हळुहळु ते आपलीं कामें पाहूं लागले होते. पुढें एक दिवस कामाचा ताण त्यावर थोडासा जास्त पडून त्याचा ताप उलटला. त्यानच दम्यानें उचल खाल्ली. पल्ली एक इंजक्शननें उतार पडणारा दमा आक्टोबरच्या २० तारखेस लागोपाठ तीन इंजक्शनें देऊनही हटेना. घरच्या सर्व मंडळींच्या तोंडचें पाणी पळालें. आपला आजार दिवसेंदिवस वाढत असताना देखील घरातील मंडळी घाबरू नयेत म्हणून त्यांनीं एक शब्दानें 'मला त्रास होतो आहे' असें सांगितलें नाहीं. नाहीं म्हणायला २१ आक्टोबर रोजीं सकाळीं सगळ्या मुलांना जवळ घेतले व गोंजारलें. धाकट्या मुलाचा मुका घेतला व म्हणाले, "बाळ, मोठा हो व विद्वान हो. आईचा सांभाळ कर." कढ दाटून आल्यामुळें त्यांच्याच्यानें पुढें बोलवलें नाहीं. घरच्या मंडळींना काहीं सांगायचे आहे कां असे विचारताच ते एवढेच म्हणाले, "माझा दमा नेहमींचाच आहे. मी धीर सोडलेला नाहीं तुम्हीही पण सोडूं नका" सध्याकाळीं त्यांना थोडी गुंगी येऊ लागली होती "आपल्याला बरं वाटत नाहीं का?" असें मिसेस बाळकृष्णांनीं विचारताच ते शांतपणें म्हणाले, "आता मला थोडी गाढ झोंप लागेलसें वाटते" खरोखरच त्यांना गाढ झोंप लागली! मृत्यूनंतर त्यांचें शेवटचें दर्शन घेणाऱ्यांना डॉक्टरसाहेबांच्या चेहऱ्यावर कोणत्याही तऱ्हेची भेसुरता नसून ते शांत झोंपले आहेत असेंच दिसून येत होतें.

झालें! सोमवार ता. २१ आक्टोबर, १९४० रोजीं रात्रीं ९ वाजतां डॉक्टरसाहेबांचा आत्मा अनंतांत विलीन झाला त्यांच्या मृत्यूची बातमी हा हा म्हणता शहरभर पसरली. शेंकडों विद्यार्थी व नागरीक त्यांच्या अंत्यदर्शनासाठीं त्यांच्या बंगल्यावर जमले दुसऱ्या दिवशीं सकाळीं निघालेल्या त्यांच्या प्रचंड प्रेतयात्रेंत हजारों विद्यार्थ्यांनीं व नागरिकांनीं भाग

घेतला होता. शाळा कॉलेजें दिवाळीच्या सुटीमुळें बंद असून देखील त्यांना अखेरची श्रद्धांजलि वाहाण्यासाठीं जमलेला प्रचंड समाज, त्यांच्या मृत्यूनंतर हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं भरलेल्या दुखवट्याच्या सभा, व निरनिराळ्या प्रांतातून आलेले दुखवट्याचे संदेश डॉक्टरसाहेबांच्या लोकप्रियतेचीच साक्ष पटवून देत नाहींत का?

'प्रत्यक्ष कार्य हीच ईश्वरोपासना' या आपल्या ब्रीदवाक्यानुसार डॉक्टरसाहेबांनीं आपल्या आयुष्यभर अखंड यज्ञ चालविला व शेवटीं या यज्ञशांतच स्वतःची आहुति दिली. अशा या ऋषितुल्य ज्ञानोपासकाची आठवण होताच माझें मस्तक आदरानें विनम्र होतें ज्या थोर साहित्यिकाच्या सान्निध्यांत माझीं दोन वर्षे अत्यंत आनंदांत गेलीं त्यांच्या प्रेमळ सहवासाला आपण मुकलों या एकाच भावनेनें अंतःकरण भरून येतें

× × ×

आपल्यामागें एवढा मोठा पसारा टाकून पोरांबाळांचे 'तात्या', नोकरचाकरांचे दयाळू 'साहेब', गरीब विद्यार्थ्यांचा आधार, विद्वान प्रोफेसर, कर्तबगार प्रिंसिपॉल, नामांकित शिक्षणशास्त्रज्ञ, सुप्रसिद्ध इतिहास संशोधक, निष्णात अर्थशास्त्रज्ञ, प्रभावी वक्ता, आर्य संस्कृतीचा अभिमानी, कोल्हापूर आर्यसमाजाचा आत्मा, शिवरायाचा निःसीम उपासक, कोल्हापूरचें भूषण, कला व क्रीडा यांचा रसिक, व श्री शारदेच्या कर्तृत्वाचा देदिप्यमान मणि अकालीं ओघळून पडला!

× × ×

असो. आज या जीवन-वृत्तान्ताच्या निमित्तानें कै. डॉ. बाळकृष्णांच्या पुण्य स्मृतिसमाधीवर अत्यंत आदरानें माझी म्हणून एक अंजलि वहात आहें.



"मी गुरुकुलात दाखल झालों आणि तेथें पुढील वारा वर्षे जी अव्याहत सेवा मी केली, ती यदृच्छया किंवा योगायोग म्हणून नव्हे, तर माझ्या लहानपणापासून निश्चित केलेल्या समाजसेवेच्या ध्येयामुळेंच."

× × ×

"आजकालच्या विद्यार्थीवर्गांत सर्वसाधारणपणें मला ध्येयशून्यता अगदी स्पष्टपणें दिसून येते, आणि त्यामुळेंच भोंवतालची परिस्थिति त्यांना अधिकच बिकट वाटूं लागते व त्यांच्या शिक्षणाचा त्यांना विशेष उपयोग न होतां त्यांची जीवितनौका या जगांत परिस्थितीप्रमाणें वाटेल तशी भटकत राहाते कोणत्याहि उच्च शिक्षणापेक्षां ध्येयदृष्टि मी अधिक महत्त्वाची मानतों, आणि निश्चित ध्येयाखेरीज मनुष्याच्या हातून कोणतीच महनीय कामगिरी होणें शक्य नाहीं असेंहि माझें ठाम मत आहे या ध्येयदृष्टीच्या अभावामुळें त्यांच्यामध्यें एक प्रकारचा अंतःकरणाचा उत्साह किंवा विश्वातील विविध ज्ञान आत्मसात करण्याविषयींची अनावर इच्छा त्यांच्यामध्यें दिसून येत नाहीं"

डॉ. बाळकृष्ण

( माझी जीवनकथा, किर्लोस्कर १९३५).

# खरा आर्य

लेखकः—सर आर. व्ही. सबनीस, केटी, सी. आय. ई.,

माजी दिवाण, कोल्हापूर.

"They (Aryans) must have been a very light-hearted people, not morose and gloomy, but full of joy and adventure They were very proud of themselves and their race The very word 'Arya' meant a gentleman, a superior kind of person And they loved freedom greatly They were good fighters"

हजारों वर्षांपूर्वी, वायव्य सरहद्दीच्या पठारावरून, आपल्या या पुरातन भूमींत, आलेल्या आर्यांचें वर्णन, एका महान् हिंदी पुढाऱ्यानें वरील चार दोन पण समर्पक वाक्यात केलें आहे.

जेव्हां जेव्हां माझ्या मनात डॉ. बाळकृष्णासंबंधींचे विचार येतात, त्या त्या वेळीं, मला आर्यांचें वरील वर्णन आठवतें. प्राचीन आर्य परंपरा, डॉक्टरसाहेबांच्या ठिकाणीं, इतक्या प्रखर स्वरूपांत दिसून येई कीं, त्याना या परंपरेचे खरेखुरे वारसदार समजावयास हरकत नाहीं. डॉक्टरसाहेबांनीं पाश्चात्य शिक्षण घेतलें, पीएच्. डी. सारख्या उच्चतम पदव्याहि संपादल्या, त्यांचा बाह्य वेषहि, अनेक प्रसंगीं पाश्चात्य पद्धतीचा असे पण त्यांच्या अंतर्यामांत प्रवेश करण्याची ज्यांना ज्यांना संधी मिळाली असेल, त्यांना त्यांना प्रचीति आली असेल कीं, त्यांच्या ठिकाणीं आर्यांचे सर्व स्वभावविशेष प्रकर्षानें वास करीत होते. प्राचीन आर्यगुरूची ज्योत, त्यांनीं आधुनिक काळांत तेवत ठेविली होती.

डॉ. बाळकृष्णांनीं कोल्हापुरच्या शैक्षणिक प्रगतीच्या दृष्टीनें कोणतें कार्य केलें आहे, हें सांगण्याची जरूरी नाहीं. त्यांना या बाबतींत ज्ञान-

गंगेचीच उपमा शोभेल. आसमंतांतील प्रदेश सुपीक करीत निघालेल्या गंगेप्रमाणेंच त्यांनीं, कोल्हापूर संस्थानला आपल्या शिक्षणाचा व ज्ञानाचा फायदा करून दिला व हा प्रांत शैक्षणिक दृष्ट्या सुपीक करण्याबाबत, कोल्हापुरच्या माजी छत्रपतींना मनोमार्गे सहाय्य केलें. कोल्हापुरच्या अनेक संस्थांना त्यांच्या ज्ञानाचा प्रत्यक्ष फायदा मिळाला, अनेक संस्थांच्या ते पितृस्थानीं होते व कोल्हापुरच्या शैक्षणिक खात्याचा एकत्र विचार केला तर त्यावर डॉ. बाळकृष्णांची दाट छाया पडलेली दिसेल. स्वामी दयानंदांनीं आर्यसमाजद्वारें निर्माण केलेली ज्ञानाची ज्योत डॉ. बाळकृष्णांपूर्वीच इकडे येऊन पोंहोचली होती, पण ती प्रभावी करण्याचें व तिच्या प्रकाशाचा फायदा उच्चनीच हा भेद लक्षांत न घेतां, जास्तींत जास्त लोकांना मिळावा, अशी खटपट डॉक्टरसाहेबांनींच केली. पंजाब ही त्यांची मातृभूमि असली, तरी महाराष्ट्र ही त्यांची कर्मभूमि होती.

डॉक्टरसाहेब हे जन्मजातच लढाऊ वृत्तीचे होते, असे दिसते. दुर्दैवानें, सर्व साधारण पंजाब्याप्रमाणें त्यांना धिप्पाड शरीरयष्टी लाभली नसली तरी, त्याच्या दुबळ्या शरीरांतील मन धिप्पाड होतें. महाराष्ट्राची शौर्यशाली परंपरा त्यांना आवडे व स्वराज्यसंस्थापक श्री शिवाजी महाराजावद्दल त्यांना अभिमान वाटे. शिवाजी विश्वविद्यालय मूर्त स्वरुपात आणण्याची त्यांची जी महत्त्वाकांक्षा होती, तिचा उगम त्यांच्या या महाराष्ट्राबद्दलच्या अभिमानातच होता. महाराष्ट्राची भाषा शिकून या भाषेत त्यानीं पुस्तकें लिहिलीं, यावरून या अभिमानानें कोणती मजल मारली होती, हें कळून येईल.

दम्यासारखा प्रबळ विकार, आमरण त्यांचा सहचर असताही, त्यांची वृत्ति आनंदी असे. त्यांच्या लढाऊ वृत्तीचाच हा भाग होता, असें म्हणावयास हरकत नाहीं. दुर्धर अशा या रोगावर विजय

मिळविण्याचा, ते नेहमी प्रयत्न करीत. एखाद्या व्याख्यानाचे वेळीं, ते " Ladies & Gentlemen " हे शब्द कसेबसे उच्चारीत व त्यांना एकदम खोकल्याची उबळ येई. पण याही परिस्थितीत, हताश न होतां, ते आवेशानें पुढें भाषण चालूं करत आणि या आवेशाच्या प्रचंड वेगांत त्यांचा खोकला कोठच्या कोठें नाहींसा होई. त्यांच्या दुबळ्या शरिरांत तारुण्याचा जोम संचारल्यासारखे वाटे. त्यांची व्याख्यानें जितकी श्रवणीय असत, तितकेच त्यांच्या खासगी संभाषणांतील विचार मननीय असत. 'वैचारिकदृष्ट्या मेजवानी' असें या संभाषणांचें वर्णन करतां येईल. डॉक्टरसाहेब हे एक मोठे अर्थशास्त्रज्ञ, इतिहास संशोधक किंवा राजकारणतज्ञच नसून, त्यांच्या ठिकाणीं अभिजात विनोदबुद्धीही असल्याचें या संभाषणांत प्रगट होई.

आपल्या आर्यत्वाबद्दल त्यांना मोठाच अभिमान वाटे व याचमुळें, शिकागोसारख्या साता समुद्रापलीकडील शहरांत भरलेल्या सर्वधर्मपरिषदेस हजर राहून त्यांनीं आपल्या ओजस्वी वाणीनें, आर्यधर्माची बाजू प्रभावी रीतीनें मांडली. अध्ययन व अध्यापन करण्याची त्यांची आर्यवृत्ति शेवटपर्यंत कशी जागृत होती, हें या प्रसंगीं दिसून आलें. शिकागोहून परत येतांना, युरोपखंडांत दौरा काढून, त्यांनीं निरनिराळ्या देशांतील माहिती बारकाईनें गोळा केली व येथें आल्यावर तीच माहिती व्याख्यान रूपानें गुंफून जनतेला आपल्या अध्ययनाचा फायदा करून दिला.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे डॉ. बाळकृष्ण गोखुरे आर्य होते. प्राचीन आर्य लोकांप्रमाणें, ते आयुष्यभर झटले व प्राचीन आर्य ऋषी-प्रमाणें त्यांनीं आमरण अध्ययन व अध्यापनाचें कार्य केलें.



# जन्म पंजावांत, पण कष्ट महाराष्ट्रांत

लेखक —रा. ब. गो. स. सरदेसाई, बी. ए. (रियासतकार), कामशेत.

महाशय डॉ० बाळकृष्ण याचा माझा परिचय अलीकडील दहा पाच वर्षांतला आहे. मी आपला रियासतींचा उद्योग करीत असतां शिवाजी महाराजांच्या चरित्राचें विशिष्ट अध्ययन डॉ. बाळकृष्णांनीं चालू केलें, त्यात त्याना शंका आल्या व माहितीची जरूर लागली, त्यासाठीं त्यांनीं मला पत्रानें कित्येक गोष्टी विचारल्या. अशा रीतीनें त्यांची माझी ओळख होऊन पुढें अनेक भेटी व वादविवाद होताना समानव्यासंगामुळें उभयताचें निष्कृत्रिम सख्य घडून आलें. सामान्यत मराठी राष्ट्रसंबंधानें परस्थास फारसा प्रेमा नसतो, त्याच्या अगदीं उलट यांचा प्रकार नजरेस आल्यानें त्याजबद्दलचा माझा आदर सारखा वृद्धि पावत गेला. शिवाजी महाराजासंबधानें एवढी नि सीम भक्ति फारच थोड्या अभ्यासकाचे ठिकाणीं दिसून येते. शिवाजी महाराजानीं आपलें जिणें सर्वस्वीं राष्ट्रकार्यास अर्पिलें, त्याचप्रमाणें डॉ. बाळकृष्णानीं आपलें एकदर आयुष्य शिवाजी महाराजाचें साधार व व विस्तृत चरित्र लिहिण्यात वेंचलें, यात बिलकूल संशय नाहीं अहोरात्र त्यांच्या मनात एकच तळमळ वावरत होती, ती या शिवचरित्राची होय. पुष्कळदा मी त्यांच्या घरीं राहत असतां अपरात्रीं देखील उठून ते यासिवाय एखादी शंका किंवा मनात असलेला विचार मला विचारीत. जेवताना, चहा वगैरे घेताना, मोटारींतून फिरताना त्यांच्या डोक्यात सदैव एकच विचार घोळत असलेला माझ्या नजरेस येई, आणि तो या शिवचरित्रातील एखाद्या क्लिष्ट किंवा सूक्ष्म मुद्याचा, एखाद्या जुन्या कागदाचा, शिवाजीच्या हस्ताक्षराचा, एखाद्या त्यांच्या साहसाचा असावयाचा एकदा आम्हीं समरस होऊन अशी काही चर्चा करू लागलों, म्हणजे बाह्य जग साफ

विसरून जात असू. मला खात्री वाटते कीं, अलीकडील दहा वर्षांतला त्याचा प्रत्येकक्षण, त्याच्या रोगग्रस्त शरीरातील रक्ताचा शेवटचा कण त्यांनीं या कामात वेंचला. या निदिध्यासापुढें त्यांनीं प्रकृतीची पर्वा ठेविली नाहीं, म्हणूनच त्यांना असा अकाली मृत्यु आला. पुष्कळदा त्यांचें तें क्षीण शरीर आणि ती दुर्दम्य उद्योगाची हाव पाहून माझ्या पोटात धस्स होई. मी त्यांस याबद्दल पुष्कळदा बजावलेंही, पण त्यांनीं या कर्तव्यापुढें प्रकृतीची क्षिति बाळगली नाहीं यातच त्यांचें मोठेपण व्यक्त होतें. त्यांनीं आपला देह शिवचरित्रास वाहून सद्गति मिळविली. संकल्पित कार्य पुरें करून मग त्यांनीं प्रयाण केलें हा योगायोग अभिनंदनीय समजून त्यांचें आपण कौतुक केलें पाहिजे असे निरपेक्ष व्यासंगी दुर्मीळ होत.

त्यांच्यासंबंधानें मी आपल्या आठवणी लिहून पाठविण्याची विनंती संपादकांनीं केली ती मान्य करणें मी आपलें पवित्र कर्तव्य मानतों. इतिहासव्यासंग हेंच आमच्या स्नेहाचें मुख्य निबंधन होय. हें निबंधन दृढ होण्यास युनिव्हर्सिटीची एम्. ए. परीक्षाही बरीचशी कारण झाली. अलीकडच्या दहापांच वर्षांत मराठी इतिहासाचे आम्ही जोड परीक्षक असू. हें काम डॉ० बाळकृष्णांच्या नैसर्गिक सौजन्यामुळें मला अत्यंत आनंददायी वाटत असे. दोघांनींही तें मोठ्या कसोटीनें व काटेकोर न्यायदर्शीनें पार पाडिलें. प्रश्न काढताना कितीतरी लहान मोठ्या मुद्यांची पत्रानें चर्चा करावी लागे. युनिव्हर्सिटीचे नियम व अभ्यासक्रमाचे हेतु माझ्यापेक्षां त्यांनाच जास्त समजत असल्यामुळें प्रश्नपत्रिका निर्दोष तयार करण्यांत त्यांचें साह्य मला नेहमीच बहुमोल वाटे. मतभेदाचा प्रसंग असा क्वचित् कधीं उद्भवला नाहीं, कीं सर्वसंमत केल्यानेही पुरें करून देण्यात हयगय घडली नाहीं. खेद वाटे तो एवढाच कीं प्रत्यक्ष मुद्दे इतक्याच्या अभ्यास-क्रमात इतिहास विषयाची भयंकर उपेक्षा परीक्षकांनी नजरेस येई, मराठ्यांचा

इतिहास घेणारे विद्यार्थी एका हाताच्या बोटांहून बहुधा जास्त कधीं नसत. एकदी या राष्ट्रीय विषयाची हेळसांड युनिव्हर्सिटींत होत असलेली पाहून आम्हा उभयतांस मोठा उद्वेग वाटे.

कोणीकडे पंजाब आणि कोणीकडे कोल्हापूर ! शिवाजी महाराजांचें व त्यांच्या नियमानं राजधानीचें एवढें कौतुक करणारा परप्रांतीय विद्वान गृहस्थ निपजावा हें हिंदभूमीच्या इतिहासात विशेष स्मरणीय मानलें पाहिजे. अलीकडील पाचचार वर्षांत त्याचा मला निकट संबंध लाभत गेला. प्रत्यक्ष कोल्हापुरात त्याचा पाहुणचार अनुभवण्याचे योग मला आले, अशा निकट सहवासाशिवाय मनुष्याची खरी पारख सहसा होत नाहीं. आगगाडींत सहजगत्या दोघा गृहस्थांनी भेटून चहापाणी घेऊन इकडच्या तिकडच्या चार गप्पासप्पा सागणें वेगळें, आणि विशिष्ट कामासाठीं एकानें दुसऱ्याच्या घरीं काहीं दिवस राहून जिव्हाळ्याच्या विषयाचा उलगडा करणें हे दोन प्रकार अगदीं भिन्न होत. कोल्हापुरात इतिहास शिक्षण संमेलन भरलें त्यासाठीं मला त्यांनीं मुद्दाम बोलावून माझा जो सत्कार केला तो अद्यापि माझे मनात अगदीं ताजा आहे व्याख्यानें, वादविवाद, प्रदर्शनें, ओळखी, उपहारादि प्रकार होऊन मला कोल्हापुरच्या नवीन प्रागतिक वातावरणाचा निकट अनुभव प्राप्त झाला आर्यसमाज संस्था, गुरुकुल, चित्रपट, नवीन रस्ते, इमारती, राजारामपुरी वगैरे शहरविस्ताराचे भाग बाळकृष्णानीं मला बरोबर घेऊन हिंडून दाखविले. त्या मनोरम देखाव्यानें मला त्याच्या उद्योगाची व कर्तृत्वाची काहीं निराळीच कल्पना आली.

मी स्वत कोल्हापुररत्नागिरी प्रदेशाचा रहिवासी असून व त्यांतील घडामोडी माझ्या प्रत्यक्ष परिचयाच्या होत्या दिवाणसाहेब बर्वे याची कारकीर्द गाजली, केसरी पत्राचा जन्म होऊन टिळक आगरकराना डोंगरीवर १०१ दिवस सजा झाली तो प्रकार, शिवाजी महाराजाचा अंत, शाहू महाराजांचें

न्दत्तविधान व राज्यारोहण, काशीक्षेत्रस्थ कातानाथ भटांकडून त्यांना झालेला राज्याभिषेक, तदनंतरचें वेदोक्त प्रकरण, शंकराचार्यांच्या नेमणुकीचा गवगवा, राजोपाध्याचें उच्चाटन, असे शाहू महाराजांच्या कारकीर्दीचे नानाविध प्रकार माझ्या माहितींत ताजे होते. प्रस्तुतच्या महाराणी साहेबांचा विवाह बडोद्यांत झाला, त्यांत तर बडोदेकरांच्या वतीनें मी एक जबाबदार कार्यकर्ता होतों. त्यानंतर शाहू महाराजांचें आकस्मिक निधन वगैरे प्रकार आपणा सर्वांच्या परिचयाचे ताजे आहेत. सर्वच येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. यांत वाळकृष्णांच्या जीवनयात्रेचा संबंध कसा व किती आला एवढेंच मला दाखवायचें आहे.

मराठ्यांच्या पूर्वैभवाचें अवशिष्ट निदर्शन म्हणून कोल्हापुरची राजगट अखिल महाराष्ट्राला जिव्हाळ्याची वाटते. आज साठसत्तर वर्षांतील स्थित्यंतराचा चित्रपट माझ्या डोळ्यांसमोर उभा आहे. अनेक कारणांच्या संगमानें कोल्हापुरच्या पूर्वीच्या व आजच्या परिस्थितींत जमीनअस्मानाचा फरक पडलेला दिसतो. पूर्वीचें वातावरण अनेक विरोधी भावनांनीं व प्रखर दुर्भावनांनीं इतकें गढूळ व क्षोभकारी झालें होतें कीं, अनेक समाजहितकारी विषय बाजूला राहून जाऊन सामान्य जनता चिंताग्रस्त बनली होती. परस्पर विरोध व अविश्वास मर्यादेबाहेर गेल्यामुळें प्रगतीचें पाऊल खुंटल्या सारखें झालें होतें.

अशास्थितीत डॉ० वाळकृष्णांसारख्या पुरुषाची नेमणूक राजाराम कॉलेजच्या मुख्य पदावर झाली. त्या कॉलेजची स्थिति त्यावेळीं कशी होती आणि आज कशी आहे ही एकच गोष्ट डॉ० बाळकृष्णांच्या उच्च योग्यतेची परमोर साक्ष पटवील. विद्वत्ता, वक्तृत्व, उद्योग वगैरे गुण बाळकृष्णांप्रमाणें इतर चाळकांच्या अंगीं देखील सापडतील. पण सामान्यतः जो एक विशिष्ट गुण पुष्कळांच्या अंगीं नसतो तो हा कीं,

जनतेच्या सर्वांगीण उन्नतीसाठी निरपेक्ष तळमळ अहोरात्र मनात बाळगून कष्ट करीत राहणें. या त्याच्या गुणामुळें त्याचे विरोधकही सहाय्यक बनले. दहापाच वर्षांच्या अल्पावधींत कोल्हापूरचें एकंदर वातावरण बदलून त्यास नवीन सर्वसंग्रहकारी समाजहितकर असें स्वरूप प्राप्त झालें. नवीन संस्था निर्माण झाल्या, पक्षातीत विचार, उच्चार व आचार यांची वाढ झपाट्यानें होऊन पूर्वीचा आकुंचितपणा पार मावळून गेला. तीनचार दिवसांच्या त्या आमच्या सहवासात माझ्या मनश्चक्षूपुढें जो विशिष्ट ठसा उमटला तो हा होय. या सर्व विषयाची चर्चा डॉक्टरांशीं मी मनमुराद केली. त्यांनीं आपल्या अडचणी, हेतु व कर्तबगारी मला प्रांजलपणें कळविले. मी त्यांना पूर्वेतिहास निवेदन करून या नवीन स्पृहणीय उत्क्रांतीबद्दल धन्यवाद दिले. कदाचित् बाहेर कोणास आमच्या या विचारविनिमयाची वार्ता नसेल. आज ओघासच आलें म्हणून त्याचा मला निर्देश करावा लागत आहे.

अशा प्रकारचा प्रचंड उद्योग करतांना कोणाही चालकास पुष्कळांचे कटु व कठोर आघात सहन करावे लागतात, तसे बाळकृष्णांनाही अनुभवावे लागले. पुष्कळदा ते वरिष्ठांच्या रोषास पात्र झाले. नाना-प्रकारची कुलंगडीं व कुभांडें उत्पन्न झालीं. पण स्वतः त्यांनीं आपलें मन निर्मळ व खंबीर ठेविलें, प्रत्यक्ष शत्रूंचेंही अहित चिंतिलें नाहीं. होईल तितकें सर्वांचें भलें केलें, सर्व जनांची शाबासकी मिळवितां न आली तरी स्वतःच्या मनाची शाबासकी त्यांनीं भरपूर मिळविली. शरीर दुबळें, पण मन खंबीर असा देखावा, मला वाटतें, डॉ. बाळकृष्णांच्या इतका दुसऱ्या कोठें पाहण्यास मिळणार नाहीं. या मनाच्या खंबीरतेमुळेंच ते अल्पावकाशात एवढें कार्य करूं शकले. शिवाजी चरित्राचे चार लठ्ठ भाग व कोल्हापुरची आजची सर्वांगीण प्रगति त्यांच्या या खंबीर मनाची

साक्ष उत्तम पटवितील. त्यांच्या माझ्या त्या सहवासांतच मला याचा अनुभव आला. त्यांच्या उदार अंतःकरणाची प्रचीति मला पदोपदीं येई. माझी आंघोळ, निजणें, भोजन, चहापाणी, लेखनादि कर्मे, व्याख्यानें, मंडळींच्या भेटी वगैरे बारीक गोष्टींत देखील ते स्वतः लक्ष घालून माझा परामर्ष घेत, त्यामुळें त्यांच्या आतिथ्याची मला पराकाष्ठा वाटली.

शिवाय त्यांना पुष्कळ बाह्य गोष्टींचा विलक्षण शोक होता हेंही त्यावेळीं माझ्या नजरेस आलें. बागांत जाऊन फुलझाडें, फळझाडें, पशुपक्षी इत्यादींची हवाल त्यांनीं मला दाखविली, तेव्हां मी अगदीं थक्क झालों. बंगला, लायब्ररी, नोकरवर्ग, आप्तपरिवार या सर्व बाबतींवर त्यांचा खर्च अतोनात होत असावा हें त्यावेळीं माझ्या लक्षांत आलें. शिवाजीचें चरित्र तर केवळ आंतबट्ट्याचा शोक होय अशी माझी खात्री झाली. वास्तविक त्यांच्या या स्मारक ग्रंथासाठीं शिवाजी चरित्राचें परीक्षण मीं लिहावें अशीच सूचना संपादक रा. वाळंबे यांनीं मला केली, पण बाहेर आलेले नवीन भाग अल्पावकाशांत वाचून होणें शक्य नाहीं असें पाहून मी नाखुषीनें तें काम दूर ठेविलें. मला वाटतें ही डॉ० बाळकृष्णांची महनीय कृति आतां जगासमोर आहेच आणि तिचा परामर्ष घेणारा वाचकवर्ग व लेखकवर्ग महाराष्ट्रांत भरपूर आहे, त्याजकडून त्या ग्रंथाचें परीक्षण यथावकाश होऊं शकेल. पण माझ्या हारस्याच्या मागील आठवणींनीं अकालीं मृत्युमुखीं पडलेल्या त्यांच्या स्मृतीस तिलांजलि देणें जास्त युक्त वाटलें म्हणूनच मी हा लेख हातीं घेतला.

डॉ० बाळकृष्णांनीं बावडा येथील अमात्यांचें दप्तर आस्थेनें तपासलें. त्यासाठीं आवश्यक ते घर बांधून राहिले. दस्तऐवजांचे अनेक फोटोग्राफ घेतले. अंतःकरणांतही तळमळ कायम ती एक कीं, शिवाजी महाराजांचें

हस्ताक्षर निःसंदिग्ध असें जगास दाखवावें. मृत्युपूर्वी थोडे दिवस मिरजेच्या शुश्रूषागृहांत असतां त्यांनीं मला पत्र पाठवून याचीच चर्चा केली. यावरून शिवाजी चरित्रात त्यांचें अंतःकरण कसें तट्लीन झालें होतें याची साक्ष पटते. माझी फार इच्छा होती कीं त्यांनीं कामशेत येथें काहीं दिवस राहून येथील हवेचा उपयोग प्रकृतीस करून घ्यावा आणि आम्ही उभयतानीं एकमेकाच्या साह्यानें नानाविध ऐतिहासिक कार्यांची पूर्तता करावी. पण तसा योग जमून आला नाहीं याचा मला मोठा खेद वाटतो. नाहीं म्हणावयास स. १९३८ च्या दसऱ्यास आम्हीं कित्येक इतिहासाभ्यासकांनीं कामशेत सप्ताह साजरा केला. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतातले चाळीसपन्नास विद्वान अभ्यासक येथें जमले, त्या प्रसंगास डॉ० बाळकृष्ण एक दोन दिवस हजर होते. पण पाहुण्यांची गर्दी व अनपेक्षित पर्जन्याची झोड यामुळें त्यांची व्यवस्था मला मनाजोगती ठेवतां आली नाहीं ही गोष्ट माझ्या मनास अद्यापि टोंचते. मुख्यत पावसानें सर्व जागा जलमय केल्यामुळें त्यांच्या नाजूक प्रकृतीस दमट हवेनें अपाय होतो कीं काय अशीच धास्ती मला पडली. ते अल्पकाळच येथें राहिल्यामुळें मुख्य कार्यांचे कामीं त्यांचा माझा विचारविनिमय होऊं शकला नाहीं.

"मना चंदनाचे परी त्वा झिजावें" ही संत उक्ति अलीकडच्या मनूत डॉ० बाळकृष्णांनीं आपल्या एकदर जीवनांत खरी करून दाखविली हेंच त्यांच्या एकदर आठवणींचें रहस्य माझ्या मनांत विंबलेलें आहे. मला वाटतें, अखेरच्या क्षणीं त्यांना या आपल्या निरपेक्ष सेवेचा आनंद अवश्य वाटला असला पाहिजे. "मी जन्मास येऊन कोणाचेंही अहित केलें नाहीं, केलें असेल तर भलेंच केलें," असें ज्या मर्त्याला अत्यसमयीं छातीवर हात ठेवून सांगता येईल, त्यानें आपल्या जन्माचें

साफल्य केलें असें मी म्हणेन आणि तशा कोटींतले डॉ० बाळकृष्ण होते याचा मला त्यांच्या सहवासांत पुष्कळ अनुभव आला. त्यांच्या-सारखे विद्वान पुष्कळ मिळतील, त्यांच्या सारखी गंभीर व ओजस्वी वाणीही पुष्कळांना लाभली असेल, परंतु दुसऱ्याचें भलें करण्यांत आनंद मानणारे त्यांच्यासारखे प्राणी फार थोडे असतात. कुटुंबादि त्यांचा परिवार मागें मोठा आहे, त्या सर्वांनी वर सांगितलेली त्यांची कमाई लक्षांत घेतल्यास त्यांच्या मृत्यूबद्दल खेद करीत न बसतां त्यांनीं मिळविलेल्या सद्गतिबद्दल संतोष मानला पाहिजे. बाकी मरण हें कोणासही चुकलें नाहीं. आज नाहीं उद्यां सर्वांनाच तें यायचें आहे. रोगग्रस्त शरीराला अवास्तव ताण देऊन त्यांनीं हें मरण लवकर ओढून आणिलें यांत मात्र संशय नाहीं. लांबी कमी झाली, पण खोली वाढली हेंही तितकेंच खरें आहे.

डॉ. बाळकृष्ण निःसीम आर्यसमाजी होते. गेल्या वर्षप्रतिपदेस त्यांनीं हार्दिक अभिनंदनार्थ मला एक अप्रतिम जुन्या राजपूत चित्राची प्रतिमा पाठविली. त्यांत विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणाची मागणी करण्या-करितां राजा दशरथाची भेट घेत असल्याचा देखावा आहे. हें चित्र त्यांनी आपल्या अनेक मित्रमंडळींकडे पाठविलें असलें पाहिजे. यावरून मजवरचा त्यांचा आदर जितका व्यक्त होतो तितकीच त्यांची खरी धर्मनिष्ठाही व्यक्त होते. आठवूं लागलें म्हणजे पुष्कळ गोष्टी मनांत येतात, पण मी येथवर सांगितलेलें आपलें हृद्गत माझें भाव व्यक्त करण्यास पुरेसें आहे एवढें सांगून मी वाचकांची रजा घेतों.

# डॉ. बाळकृष्ण यांचा "शिवाजी"

लेखक —डॉ. ए. जी. पवार, एम्. ए., एल्एल्. बी., पीएच्. डी.,
बार–ॲट–लॉ, राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

कै. डॉ. बाळकृष्ण यांनी जे अनेक ग्रंथ लिहिले त्यात "शिवाजी द ग्रेट" या इंग्रजींत लिहिलेल्या ग्रंथाचें स्थान विशिष्ट स्वरूपाचें आहे. एकतर हा त्यांचा सर्वांत मोठा ग्रंथ आहे. ग्रंथाचा विषय महाराष्ट्रीयांनाच नव्हे, तर सर्व स्वातंत्र्यप्रेमी जनांना जिव्हाळ्याचा असा आहे. शिवाय डॉक्टरसाहेबांनीं या ग्रंथावर एक तपाहून अधिक वर्षे खर्च केलीं आणि तो परिपूर्ण करण्यांत कोणतीहि कसूर केली नाहीं अथवा खर्चाकडे पाहिलें नाहीं. या सर्वांहून अधिक हृदयंगम अशी कोणती गोष्ट असेल तर ती ही कीं, तो डॉक्टरसाहेबांचा शेवटचाच ग्रंथ होय! मृत्युपूर्वी डॉक्टरसाहेब मिरजेस राहावयास गेल्या-वेळीं त्यांना जणु काय मार्गी सक्र्यांची सावली दिसली म्हणूनच त्यांनीं आपल्या असाध्य रोगाच्या असह्य वेदना सोसून देखील ग्रंथाचा राहिलेला भाग रुग्णशय्येवरून पुरा केला. आसन्नमरणापर्यंत असून सुद्धा स्वीकृत कार्य पुरें झाल्याशिवाय त्यांचा आत्मा जड देहाला सोडून जाण्यास जणुं तयार नव्हता, म्हणूनच आपला समग्र ग्रंथ पुरा झाल्या-बरोबर त्यांनीं एक समाधानाचा निश्वास सोडला व पुढें थोड्याच दिवसांनीं ते इहलोक सोडून गेले. अशा रीतीनें ज्या ग्रंथाची परिपूर्तता झाली आणि ज्यांत डॉक्टरसाहेबांचे शेवटच्या बारापधरा वर्षांचे परिश्रम केंद्रीभूत झाले त्या ग्रंथाचें महत्त्व विशेष असेंच असणार हें सांगावयास नको.

या ग्रंथाचा विस्तार फारच मोठा आहे. याचें नांव जरी 'शिवाजी द ग्रेट' असें ठेविलेलें असलें तरी त्यांत शहाजीच्या चरित्राचाही

-समावेश केलेला आहे. साधारणपणें शिवाजीच्या मृत्युपूर्वीच्या शंभर वर्षांचा मराठेशाहीचा इतिहास यांत समाविष्ट केला गेला आहे. प्रत्येक खंडाचे दोन भाग याप्रमाणें या द्विखंडात्मक ग्रंथाचे एकंदर चार भाग पाडले गेले आहेत. यापैकीं पहिले दोन या पूर्वीच प्रसिद्ध झाले आहेत. राहिलेले दोन आतां होत आहेत. त्यांची पृष्ठसंख्या अनुक्रमें २२२, ५८९, ५९९ आणि २२० अशी म्हणजे एकंदर १६३० पानांचा हा ग्रंथ आहे. पहिल्या भागांत शहाजीचें चरित्र दिलेलें आहे. दुसरा नि तिसरा शिवचरित्रानें व्यापलेला आहे. चवथ्या भागांत शिवशाहीच्या प्रधान अंगांची चर्चा केलेली आहे. आधारभूत ग्रंथांची यादी पहिल्या विभागाच्या आरंभींच दिलेली आहे. व्यक्ति, स्थळें, प्रसंग आणि महत्त्वाचे ऐतिहासिक कागद, यांच्या छायाचित्रांनीं सर्वच ग्रंथ ओतप्रोत भरून गेलेला असून अभ्यासकांना उपयुक्त होईल अशी सूची त्या त्या भागांना जोडलेली आहे. (भाग दुसरा नि तिसरा या दोहोंची त्यांनीं एकच सूची तयार केली असून ती तिसऱ्या भागाच्या शेवटीं जोडलेली आहे).

अशा या ग्रंथाची समग्र माहिती करून देणें अगर यांत वर्णिलेल्या अनेक विषयांची साधकबाधक चर्चा करणें येथें शक्य नाहीं. सर्वसाधारण वाचकाला या ग्रंथाची रूपरेषा लक्षांत येईल इतकी त्याची ओळख करून देणें आणि डॉक्टरसाहेबानीं परिश्रमपूर्वक मिळविलेल्या नवीन माहितीच्या आधारानें त्या 'थोर शिवाजी'च्या जीवनक्रमांतील ठळक ठळक अशा गोष्टींचें दिग्दर्शन करणें हेच या लेखाचे प्रधान हेतु आहेत. 'शिवाजी द ग्रेट' या पुस्तकाचें परीक्षण म्हणून देखील हा लेख लिहिलेला नाहीं. यामुळें येथें निवडलेले विषय अगर दिलेली माहिती कोणास अपुरी अगर एकांगी वाटली तर त्याला उपाय एकच आहे. तो म्हणजे मूळ ग्रंथ सर्वच्या सर्व वाचणें हा होय.

ओळखून दर्शवणारी सर डॉक्टरांनी या ग्रंथाची ओळख करून देण्यापूर्वी त्या संबंधीं एक गोष्ट आधीच स्पष्ट केलेली बरी. आतापर्यंत जीं अनेक शिवचरित्रें लिहिली गेलीं आहेत, त्याप्रमाणें हें एक शिवाजीचें चरित्र नाहीं हा एक साधनग्रंथ आहे. संशोधकाच्या दृष्टीनें विचार करावयाचा झाल्यास 'शिवाजी द ग्रेट' हा एक अव्वल प्रतीचा साधन-ग्रंथ आहे, असेंच म्हणावें लागेल. शिवशाहीवर नवीन प्रकाश पाडणारे कितीतरी नवीन कागदपत्र यांत एकत्र करण्यांत आलेले आहेत. हे कागद एतद्देशीय भाषेंतील नसून बहुतेक सर्व परभाषेंतील आहेत. शिवपूर्वकालात प्रस्थापित झालेल्या पोर्तुगीज राजवटीचे कागद आणि इंग्रज व डच व्यापारी कंपन्यांचा शिवकालीन पत्रव्यवहार या सर्वांचा अभ्यास करून शिवचरित्राला परिपोषक असे अनेक कागदपत्र या ग्रंथात कालानुक्रमानें एकत्र छापलेले आहेत. जे इंग्रजींत लिहिलेले नव्हते, त्यांचें इंग्रजी भाषांतर दिलेलें आहे. डॉक्टरसाहेबांच्या या ग्रंथाला 'शिवशाहीचीं परभाषेंतील साधनें' हें नांव अधिक शोभण्यासारखें आहे.

डॉक्टरसाहेबांनी आपला ग्रंथ बहुशानीं परभाषेंतून घेतलेल्या मूळ-साधनांनीं सजविलेला असला तरी आपल्या देशात व भाषात आजवर उपलब्ध झालेल्या शिवशाहीच्या इतिहासाच्या साधनाकडे त्यांचें दुर्लक्ष झालेलें नाहीं, अथवा त्या साधनांचें महत्त्वहि त्यांनीं कमी गणलेलें नाहीं. शिवचरित्र कार्यालय आणि भारत इतिहास संशोधक मंडळ या सारख्या संस्था आणि कै राजवाडे आदिकरून संशोधक यांनीं शिवकालीन कागदपत्रांचे ढीगच्या ढीग उजेडात आणिले आहेत. वास्तविक मराठ्यांच्या इतिहासाची सामुग्री अधिक ती मराठी भाषेंतच सांपडावयास पाहिजे परंतु अनेक कारणामुळें आपल्या इतिहासाचीं सर्व साधनें आपणांस उपलब्ध झालेलीं नाहींत. तरी पण आपल्या संशोधकांच्या

चळवळीच्या परिश्रमामुळें आजवर पुष्कळच साहित्य जमा झालें आहे व त्याची उपयुक्तता इतर साधनांपेक्षा थोडी देखील कमी नाहीं. उलट, आपलीं साधनें अव्वल, इतर दुय्यम असाच सर्व साधारण समज ठेवून एकंदर साधनाचा उपयोग करून घेतला पाहिजे अशीच कल्पना डॉ. बाळकृष्ण यांची देखील असणार म्हणूनच आपल्या भाषांतून मिळणाऱ्या माहितीचा शक्य तितका उपयोग करून घेण्यास ते चुकले नाहींत. आता ही गोष्ट खरी आहे कीं, पेशवाईच्या इतिहासाचीं जितकीं साधनें आपणास आपल्या भाषांतून मिळतात तितकीं शिवशाहीचीं मिळत नाहींत. म्हणून परभाषांतून नि परदेशांतून मिळणारीं साधनें जमविणें प्राप्त झालें आहे. याच कारणाकरितां डॉक्टरसाहेबांनीं विशेषेंकरून डच आणि इंग्रजी साधनांचा सांठा हस्तगत करण्याचा प्रयत्न केला आणि त्यांच्या दीर्घ व चिकाटीच्या प्रयत्नांना जेवढें साध्य झालें तेवढे सर्व कागद त्यांनीं या साधनग्रंथात दिले आहेत. शिवाजीसारख्या राज्यसंस्थापकाच्या चरित्रावर प्रकाश पाडणाऱ्या अप्रकाशित व सहज-सुलभ नसलेल्या कागदांचा संग्रह इतिहासप्रेमी जनांच्या उपयोगासाठीं प्रसिद्ध करून डॉक्टरसाहेबांनीं संशोधनकार्याला चांगलीच मदत केलेली आहे. 'मूळ साधनेंच प्रसिद्ध करावयाचीं होतीं तर अन्य साधनग्रंथां-प्रमाणें तीं छापतां आलीं असतीं' असें ज्यांना वाटतें त्यांचें समाधान करतां येणें शक्य नाहीं. डॉक्टरसाहेबांना जी पद्धत योग्य वाटली ती त्यांनीं अवलंबिली एवढेंच म्हणतां येईल.

"शिवाजी द ग्रेट" या ग्रंथाच्या सर्व भागांत प्रारंभीं विस्तृत अनुक्रमणिका दिलेल्या आहेत. त्यावरून नजर फिरविली असता या ग्रंथांत दिलेल्या माहितीची स्थूल कल्पना ध्यानांत येते. पहिल्या भागांतील विषय खालीलप्रमाणें आहेत (१) उपोद्घात, पृ १७–३४;

(२) भोसले कुलवृत्तांत, पृ. ३५–५६; (३) नृप–निर्माता ( King-maker ) शहाजी, पृ. ५७–१०२; (४ व ५) शहाजीचें कर्नाटकांतील राज्यसंपादन, पृ. १०३–१७२; (६) परिशिष्ट नं. १ ते ८ आणि सूची.

दुसऱ्या आणि तिसऱ्या भागांतील विषय खालीलप्रमाणें आहेत:– (१) शिवाजीचा पूर्वेतिहास, पृ. १-३०; (२) स्वराज्य स्थापनेचा निर्धार, पृ. ३१-४८; (३) अफजलखानाचा वध, पृ. ४९-७५; (४) शाइस्ताखानावर छापा, पृ. ७६-८७; (५) कुडाळ प्रांतांत मिळविलेला जय, पृ. ८८-१३१; (६) शिवाजी आणि राजापुरकर इंग्रज, पृ. १३२-१६२; (७) सुरतेची पहिली लूट, पृ. १६३-२३२; (८) शिवाजी विरुद्ध जयसिंग, पृ. २३३-२५०; (९) आग्र्यास प्रयाण आणि आग्र्याहून सुटका, पृ. २५१-२७०; (१०) मोंगलांची चढाई, पृ. २७१-३०५; (११) सुरतेवरील छापे, पृ. ३०६-३६९; (१२-१३) शिवाजी आणि इंग्रज, पृ. ३७०-४७४; परिशिष्टें पृ. ४७४-५८९ (यांत बहुतेक उच पत्रांचे उतारे आहेत; (१४) शिवाजीचा राज्याभिषेक, पृ. १-४३; (१५-१६) इंग्रजांबरोबर शिवाजीनें केलेल्या तहाची पूर्तता होण्यास लागणारा विलंब, पृ. ४४-११७; (१७-१८) सात वर्षांतील शिवाजीची चढाई, पृ. ११८-२२२; (१९) शिवाजीची दक्षिणेंतील स्वारी, पृ. २२३-२८९; (२०) शिवाजी आणि जंजिरेकर सिद्दी, पृ. २९०-३७३; (२१) खांदेरी हस्तगत होतें, पृ. ३७४-४९४; (२२) शिवाजी आणि पोर्तुगीज, पृ. ४९५-५३१; (२३) शेवट, पृ. ५३२-५४२; परिशिष्ट आणि सूची, पृ. ५४३-५७४ व १-२५.

शेवटच्या भागांतील विषयवारी खालीलप्रमाणें आहे:–(१) शिवाजीचें व्यक्तित्व, पृ. १-१४; (२) शिवाजी हा लुटारू होता काय?

पृ. १५-२२; (३) शिवाजी बंडखोर कीं स्वातंत्र्यदाता? पृ. २३-२९; (४) अफझलखानाच्या वधाची चर्चा, पृ. ३०-३९; (५) शिवाजीची राज्यव्यवस्था, पृ. ४०-५९; (६) लष्करी पद्धत, पृ. ६१-१०२; (७) मुलकी व्यवस्था, पृ. १०७-१४५; (८) चलन, पृ. १४६-१५५; (९) न्यायदानपद्धत, पृ. १५६-१६८; (१०) धर्मभावना, पृ. १६९-१८१; (११) साधुसंतांची कामगिरी, पृ. १८२-१९८; (१२) शिवाजीच्या यशाचीं कारणें आणि त्याचे परिणाम, पृ. १९९-२१५; सूची, पृ. २१६-२२४.

अनुक्रमणिकांतील विषयांच्या या यादीवरून डॉक्टरसाहेबांनीं कोणत्या विषयाला किती महत्त्व दिलेलें आहे हें दिसून येतें. शिवचरित्रांतील शक्य तितक्या सर्व प्रसंगांची पुरेशी माहिती करून देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. ज्या प्रसंगाबाबत इंग्लिश अगर डच, अथवा दोन्ही साधनें अधिक उपलब्ध झालीं त्यांची माहिती विस्तारानें करून देण्यांत आली आहे. म्हणून 'शिवाजी आणि इंग्रज', 'शिवाजी आणि जंजिरेकर सिद्दी' वगैरे प्रकरणें प्रदीर्घ असून नवीन माहितीनें ओतप्रोत भरलेलीं आहेत. ज्या घडामोडींसंबंधीं नूतन साधनें मिळालीं नाहींत त्यांची माहिती पूर्वी उपलब्ध असलेल्या साधनांच्या आधारानेंच देण्यात आलेली आहे. ही नवीजुनी साधनें उपयोगांत आणतांना जरूर तेथें डॉक्टरसाहेबांनीं त्यांची चिकित्सापूर्वक छाननी केलेली आहे.

नवीन मिळविलेली साधनें सर्वच्या सर्व आणि जशींच्या तशीं छापली गेल्यामुळें डॉक्टरसाहेबांच्या ग्रंथांत केवळ शिवशाहीचा इतिहासच पहावयास मिळतो असें नाहीं, तर त्यांत हिंदुस्थानांतील इतर घडामोडींची हकिकतहि वाचावयास मिळते. यामुळें कांहीं वेळां मुख्य विषयाचा धागा तुटल्यासारखा होतो. आणि एखाद्या प्रसंगाबाबत डॉक्टरसाहेब

जेव्हां निरनिराळीं घातमीपत्रें उद्धृत करतात आणि तीं एकमेकाला परिपोषक अशीं असत नाहींत त्यावेळीं सर्वसाधारण वाचक घुचकळ्यांत पडण्याचा संभव आहे हें खरें आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें हा साधनग्रंथ आहे. याचा अधिक उपयोग संशोधकांना होण्यासारखा आहे. या दृष्टीनें विचार केल्यास डॉक्टरसाहेबांनीं सर्वच्या सर्व साधनें जशींच्या तशीं दिलीं हेंच चांगल केलें असें म्हणावें लागेल.

आतां या ग्रंथांत वर्णन केलेल्या मुख्य मुख्य अशा कांहीं विषयांची स्थूल कां होईना माहिती करून दिल्यास सर्वसाधारण वाचकांत ती उद्बोधक होईल असें वाटून तसा प्रयत्न येथें केला आहे.

या पुस्तकाच्या पहिल्या खंडांत पहिल्या विभागाच्या सुरवातीलाच भोंसले कुलवृत्तांत दिलेला आहे, आणि शेवटीं एक परिशिष्ट जोडून त्या माहितींत भर घातलेली आहे. भोंसले हे क्षत्रियकुलोत्पन्न आहेत, आणि त्यांच्या निती तरी पिढ्यांची संगतवार माहिती मिळूं शकते हें डॉक्टरसाहेबांनीं दाखवून दिलें आहे. या विषयाची मांडणी करतांना त्यांना त्या वेळीं नवीनच मिळालेलीं, पण आतां सुपरिचित झालेलीं, मुधोळच्या राजघराण्याला मिळालेलीं फर्मानें त्यांनीं उपयोगांत आणिलेलीं आहेत. या कागदांच्या खरेपणाबद्दल अलीकडे थोडा वाद माजलेला आहे. परंतु ते अजिबात खोटे आहेत असें अद्यापि शाबीत झालेलें नाहीं. या फर्मानांच्या आधारावर भोंसले आणि घोरपडे हीं दोन्हीं घराणीं उदेपूरच्या राजघराण्यांतून कशीं निर्माण झालीं आणि स्वतंत्रपणें नांवारूपास कशीं आलीं याचें विस्तृत विवेचन डॉक्टरसाहेबांनीं केलें आहे. फर्मानांचीं छायाचित्रेंहि पण दिलीं आहेत.

भोंसले हे रजपूत आहेत हें आतां सिद्ध झाल्यासारखेंच आहे. १६५६ मधील एका अस्सल पत्रांत शहाजी म्हणतो, "आपण रजपूत लोक-

अजी तलग पेशजीहि दोघा चौ पादशाहीत खिदमत केली." (पत्र सार संग्रह, भाग १, पृ. १५४). राज्याभिषेक प्रसंगाळा अनुलक्षून डॉक्टरसाहेबांनीं उद्धृत केलेल्या एका डच पत्रांत म्हटलें आहे कीं, भोंसले हे क्षत्रिय असल्याचें शिवाजीनें टासून सांगितलें ("Suasy replied that the Bhonslas were descended from the Kettery Caste" भा. ३, पृ. ३३). १६६० मध्यें लिहिलेल्या एका इंग्लिश पत्रांत शिवाजीचें वर्णन, "Senagy, a great Rashpoote" असें केलेलें आहे. (भा. २, पृ. ५४). एवंच, भोंसले कुळाचें क्षत्रियत्व दाखवून देण्यासाठीं डॉक्टरसाहेबांनीं एकत्रित केलेली माहिती संशोधकांना उपयुक्त अशीच होईल.

शहाजीविषयीं अद्यापि मिळावी तेवढी माहिती नसल्यामुळें त्याचें संपूर्ण चरित्र लिहिणें शक्य झालेलें नाहीं. डॉक्टरसाहेबांचे प्रयत्न देखील फारसे यशस्वी झाले असें म्हणवत नाहीं. कारण या काळांतील नवीनच असे त्यांना फारच थोडे कागद मिळाले. त्यांत इ. स. १६६१ मध्यें शहाजीनें दक्षिणेंत करोमांडल किनाऱ्यालगत जे विजय मिळविले आणि टेंगनापट्टम, पोर्टोनोव्हो वगैरे गांवें घेतलीं त्याची हकिकत देताना डॉक्टरसाहेबांनीं जी डच पत्रें दिलीं आहेत तीं संशोधकांना उपयुक्त वाटतील. तसेंच शहाजी आणि शिवाजी या पितापुत्रांच्या आयुष्यांतील एक अत्यंत बिकट प्रसंग म्हणजे शहाजीची पहिली कैद होय. शहाजी ता. २५ जुलै, १६४८ पासून ता. १६ मे, १६४९ पर्यंत आदिल-शहाच्या कैदेंत होता (सरकार: 'हाउस ऑफ शिवाजी', पृ. ९२). हा प्रसंग शहाजीवर कां ओढवला, शहाजीला कोणीं कसें पकडलें, कैदेंत आणपी कोण होते, सुटका कशी झाली, या सर्व गोष्टींचें विवेचन डॉक्टरसाहेबांनीं केलें आहे (भा. १, पृ. १२७-१३५).

आणि 'बाजी घोरपड्यानें दगाबाजी करून शहाजीला पकडलें,' 'आदिलशहा शहाजीला भिंतींत चिणून मारणार होता,' वगैरे जे गैरसमज पसरले आहेत ते खोटे आहेत हें त्यांनीं दाखवून दिलें आहे.

शककर्त्या शिवाजी महाराजांचें चरित्र जेवढें अलौकिक झालें तेवढेंच तें संशोधकांना बुचकळ्यांत पाडणारेंहि झालेलें आहे. याचें एक प्रमुख प्रत्यंतर म्हणजे त्याची जन्मतिथीच होय. कै. लोकमान्य टिळक यांनीं प्रसिद्ध केलेली जेधे शकावली म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचें एक अव्वल प्रतीचें साधन आहे. तींत जी शिवजन्मतिथि दिलेली आहे ती पूर्वी मान्य केलेल्या तिथीहून अगदींच भिन्न आहे. पूर्वी शिवाजीचा जन्म इ. स. १६२७ मध्यें झाला असें समजण्यात येत असे. आतां जेधे शकावली प्रमाणें ता. १९ फेब्रुवारी, १६३० ही शिवजन्म तारीख मानण्यात येऊं लागली आहे. या जुन्यानव्या जन्मतिथींची समग्र चर्चा डॉक्टरसाहेबांनीं भा. २, पृ. ५–१० वर केली आहे, आणि नवी तिथीच मान्य केली जावी असें प्रतिपादिलें आहे. सर जदुनाथ सरकार, राव ब. सरदेसाई यांच्या सारखे कांहीं नामवंत लेखक अद्यापि जुनीच तारीख मान्य करतात. पण ते देखील एकच तारीख मानतात असें नाहीं. सर जदुनाथांनीं १० एप्रिल, १६२७ ही शिवजन्म तारीख ठरविली आहे (त्यांचा 'शिवाजी' तिसरी आवृत्ति, पृ. २२), तर राव ब. सरदेसायांना ता. ६ एप्रिल, १६२७ मान्य आहे (त्यांचा 'शककर्ता शिवाजी' पृ. १७). एकंदरींत हा जन्मतिथीचा वाद अद्यापि कायमपणें मिटला नाहीं असेंच म्हणावें लागतें.

शिवाजीच्या बाळपणाचें वर्णन करतांना डॉक्टरसाहेबांनीं शिवाजीला यथायोग्य शिक्षण मिळालें होतें आणि त्याला चांगले लिहितां वाचतां येत होतें असें प्रतिपादिलें आहे. ही गोष्ट डॉक्टरसाहेबांना ठांसून सांगावी लागली याचें कारण ग्रँट डफ, सर जदुनाथ सरकार यांच्या सारख्या

विद्वान इतिहासकारानीं शिवाजीस निरक्षर ठरविलें आहे. यास्तव शिवाजी साक्षर होता हें दाखवून देण्यासाठीं डॉक्टरसाहेबानीं सोळा पुरावे दाखल केले आहेत ( भा. २, पृ. १२–१३ ) त्यात राजापूरकर इंग्रजाना पाठ्यास मिळालेलें शिवाजीनें 'स्वत लिहिलेलें' पत्र ( Written by himself ) आणि 'शिवाजीनें सही केलेलें' पत्र ( Signed by Shivaji ) अशा शिलालेखाचा निर्देश केलेला आहे. डॉक्टरसाहेबानीं या मुद्यासबधानें जी माहिती मिळविली आहे तिचें परिशीलन केल्यावर कोणीहि जबाबदार लेखक शिवाजी निरक्षर होता असें म्हणू शकेलसें वाटत नाहीं.

स्वराज्यस्थापनेची सुरवात करताना शिवाजीला एक कठोर पण आवश्यक गोष्ट करावी लागली. ती म्हणजे जावळीच्या मोऱ्याचा पाडाव होय (जाने. १६५६ ). बखरकारानीं थोडीबहुत कल्पकता लढवून जावळी प्रकरणाला भलताच रग आणलेला आहे. त्यामुळें दगाबाजी करून शिवाजीनें मोऱ्याचा निःपात केला असा शिवाजीवर आरोप येऊं पाहातो आहे. यास्तव डॉक्टरसाहेबानीं या प्रकरणाची बारीक छाननी केली आहे (भा. २, पृ. ३१–३८). जेधे शकावली, जेधे करीना, शिवभारत इत्यादि अधिक विश्वसनीय साधनांच्या आधारें त्यानीं दाखवून दिलें आहे कीं शिवाजीनें या बाबतींत काहीं दगाफटका केला नाहीं. शिवाजीचें मोऱ्याशीं वाकडें येण्यास अनेक कारणें घडलीं (पृ. ३३). त्यात मुख्य म्हणजे मोऱ्याचा शिवाजीला प्रथमपासून झालेला पक्का विरोध होय. या विरोधाला पायबद घालणें शिवाजीला प्राप्त झालें. तसें शिवाजीनें केलें नसतें तर शिवाजीची हुकमत त्याच्याच मिळकतीत त्याच्याच लोकावर चालती ना. म्हणून ता. १५ जानेवारी, १६५६ रोजी शिवाजीनें जावळी सर केली. पण असें करतांना शिवाजीनें दगा केला, अथवा निःशस्त्र

मोऱ्याचा खून केला अगर करविला, असें उपलब्ध कागदावरून वाटत नाहीं, असें डॉक्टरसाहेबांचें मत आहे

शिवाजीच्या आयुष्यांत पहिला आणीबाणीचा प्रसंग म्हणजे अफझलखानाची भेट होय ही भेट ता १० नोव्हेंबर, १६५९ रोजीं प्रतापगडाच्या पायथ्याशीं झाली आणि तींत अफझलखानाचा अंत झाला हा अंत कसा झाला हें ठरविणारा निर्णायक पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला नाहीं डॉक्टरसाहेबांना या प्रकरणासंबंधीं जेवढी माहिती मिळविता आली तेवढी सर्व त्यांनीं एकत्र केली आहे (भा २, पृ ४९-७५) यांत अफझलखानाच्या वधानंतर बरोबर एक महिन्यानीं कोल्हापुरहून एका इंग्रजानें लिहिलेलें एक पत्र उद्धृत करण्यांत आलें आहे तें अत्यंत महत्त्वाचें आहे त्या पत्रावरून असें दिसतें कीं, "शिवाजीचा प्रतिकार करणें अफझलाला शक्य नसल्यामुळें त्यानीं शिवाजीशीं मैत्री जोडण्याचें ढोंग करावें" (To pretend friendship with his enemy) असा आदेश त्याला मिळालेला होता (पृ ५०), आणि म्हणूनच तो शिवाजीला भेटावयास तयार झाला असें दिसतें प्रत्यक्ष भेटीच्या वेळीं काय घडलें हें निश्चितपणें सांगणें कठीण आहे परंतु असें दिसतें कीं आपणावर भलताच प्रसंग ओढवतो आहे असें शिवाजीला वाटल्यावरून त्यानें अफझलखानाच्या पोटांत (का छातींत?) शस्त्र खुपसून त्याचा जीव घेतला हें शस्त्र वाघनख होतें किंवा सुरा होता हें कळत नाहीं वर उल्लेखिलेल्या इंग्लिश पत्रांत म्हटलें आहे कीं, "स्वतःच्या उराजवळ लपवून ठेवलेला सुरा शिवाजीनें अफझलाच्या काळजांत खुपसला" ("Sevagy with a dagger from out of bosom stabd the other to the hart' पृ ५१) डॉक्टरसाहेबांनीं अफझलप्रकरणीं वर सांगितल्याप्रमाणें भाग २ मध्यें माहिती दिली आहे, आणि शेवटीं

(भाग ४ पृ. ३०-३९) वर या प्रसंगाची चर्चा केली आहे. त्यांच्या मतें अफझलखान हा दुष्ट हेतूनें प्रेरित होऊन शिवाजीला भेटावयास गेला आणि प्रथम त्यानें शिवाजीवर वार केला. आत्मसंरक्षणार्थ शिवाजीला जो प्रतिकार करावा लागला त्यांतच अफझलाचा अंत झाला. यदाकदाचित् दगा करून शिवाजीनें अफझलाला मारिलें असें ठरलें तरी त्यांत वावगें कांहींच नाहीं असें डॉक्टरसाहेबांनीं आपलें मत दिलें आहे. "Shivaji was justified even in treacherously murdering Afzal Khan; because everything is fair in love and war," असें डॉक्टरसाहेबांनीं विधान केलें आहे (भा. ४, पृ. ३१).

ता. ५ एप्रिल, १६६३ रोजीं रात्रीं शिवाजीनें शायिस्ताखानावर पुणें मुक्कामीं जो छापा घातला त्याची हकिकत एखाद्या सुंदर कादंबरीच्या वर्णनाप्रमाणें वाटते. संकट स्वतःवर ओढवून घेऊन प्रसंगाला तोंड देण्याची तयारी शिवाजीची प्रथमपासूनच होती हें त्याच्यावर आलेल्या निरनिराळ्या प्रसंगांवरून आणि ते निवारण्यासाठीं त्यानें योजिलेल्या उपायांवरून सिद्ध होतें. शिवाजीची कल्पकता इतकी अचाट होती कीं प्रत्येक वेळीं त्यानें नवीन नवीन उपाय योजिलेले दिसतात. मोंगल अधिकारी शायिस्ताखान यानें पुण्यात ता. ९ मे, १६६० रोजीं प्रवेश केला, आणि पुण्याची बळकटी करून तो शिवाजीनें जिंकिलेल्या मुलुखाला त्रास देऊं लागला. जवळजवळ तीन वर्षे शिवाजीनें शायिस्ताखानाला डिवचलेलें दिसत नाहीं. याचें कारण बहुधा त्याला गाफील करावें हेंच असणार. पुढें एकदम ता. ५ एप्रिल, १६६३ रोजीं रात्रीं अचानकपणें शिवाजीनें त्याच्यावर छापा घातला तो असा कीं, खानाच्या सर्व लोकांची गाळण तर उडालीच पण खुद्द खान शिपायांनें बचावला. यासंबंधीं डॉक्टरसाहेबांनीं जे कागदपत्र प्रसिद्ध केले आहेत त्यांत राजपुरहून ता. १२ एप्रिल रोजीं लिहिलेलें पत्र अत्यंत महत्वाचें आहे. कारण

यावेळीं शिवाजीचा 'रावजी' नांवाचा एक अधिकारी राजापुरांत होता. त्याला शिवाजीनें स्वतः लिहिलेलें पत्र पाठवून शायिस्ताखानावर छापा घातलेली जी हकीकत कळविली ती सदर इंग्लिश पत्रांत दिली आहे. छापा घातल्यावर लगेंच पत्र लिहिलें गेल्यामुळें, आणि तेंहि शिवाजीनें स्वतः लिहिल्यामुळें, त्यांतील मजकुराच्या सत्यासत्यतेबद्दल शंका घेण्याचें कारणच रहात नाहीं. शिवाजीनें रावजीला पाठविलेल्या पत्राचा सारांश असा होता —"४०० निवडक लोक बरोबर घेऊन मी शायिस्ताखानावर छापा घातला. कांहीं तरी निमित्त काढून मुजरा करण्यासाठीं म्हणून त्याच्या तंबूंत शिरलों लगेच पहार्‍यावरचीं माणसें, खानाचा वडील मुलगा आणि जांवई, १२ बायका, व त्याच्या बरोबर असलेले ४० एक उमराव ठार केले स्वतःच्या हातानीं शायिस्ताखानावर वार केला तो मेला असें समजलों होतों पण तो नुसता जखमी झाला असें आता कळतें. खानाचे दोन पुत्र व सहा बायका जखमी झाल्या. आपण शिताफीनें निसटून गेलों. मात्र या छाप्यांत आमचीं ६ माणसें मारलीं गेलीं व ४० जखमी झालीं." राजापुरकरांनीं लिहिलेल्या पत्रांत शेवटचें वाक्य असें आहे —"शिवाजी आपल्या लोकांना सांगतो आहे कीं, परमेश्वरानें हें अचाट साहस आपणास करावयास लाविलें" ("Sevagy tells his men his Permisera bid him do it"). असलें अभूतपूर्व साहस करणाऱ्या विभूतीला लोक अवतार मानूं लागले असल्यास नवल नाहीं. शायिस्ताखानावरील छाप्यासबंधींचें हें 'मौलिक' पत्र डॉक्टरसाहेबांनीं प्रसिद्ध करून संशोधकांना उपकृत केलें आहे

ज्या पद्धतीनें शायिस्ताखानावर शिवाजीनें छापा घातला त्याच पद्धतीनें पुढें एका वर्षानें त्यानें उभ्या सुरत शहरावर छापा घातला

आणि तेव्हां, शायिस्ताखानाच्या लोकांची यापूर्वीच्या वेळीं जेवढी गाळण उडाली नसेल त्याहून अधिक सुरतेच्या लोकांची भर दिवसा उडाली. सुरतेवर छापा घालण्याचें त्यानें केव्हां कसें ठरविलें त्याचें त्यालाच माहीत. एकाएकीं ता. ६ जानेवारी, १६६४ रोजीं सकाळीच तो सैन्यासह सुरतेच्या वेशींत दाखल झाला. इंग्रज नि डच लोकांच्या वखारी या शहरीं असल्यामुळें या प्रसंगासंबंधीचीं दोन्हीं भाषेंतील पुष्कळच बातमीपत्रें डॉक्टरसाहेबांना मिळालीं (भा.२, पृ. १६३-२३२). बुधवार ता. ६ ते शनिवार ता. १० पर्यंत शिवाजीनें सुरत शहराची मनसोक्त लूट केली. ("The villain had the plunder of this place for four whole days from Wednesday morning until Saturday at four in the afternoon.") दोनतृतियांश शहर उध्वस्त झालें; तीन एक हजार घरांची राखरांगोळी झाली. यावरून सुरतेची बेसुरत कशी झाली हें लक्षांत येतें. शिवाजीनें सुरतेहून जी लूट नेली ती अन्य कोणत्या वस्तूंची नसून फक्त "सोनें, रुपें, मोतीं, हिरे आणि अशाच मौल्यवान जिन्नसांची" होती असें कागदोपत्रीं नमूद केलें गेलें आहे. ही लूट कोट दीडकोट रुपयांची भरली असें इंग्लिश पत्रांत म्हटलें आहे. *

सुरतेवरील या छाप्यांत शिवाजीच्या जिवावर बेतलेल्या एका प्रसंगाची हकिकत इंग्लिश डायरींत दिलेली आहे. ती अशी आहे:—"शिवाजीचा

* सुरतेवरील या छाप्यासंबंधानें जे अनेक डच कागदपत्र डॉक्टरसाहेबांनीं उद्धृत केले आहेत त्या बाबत लिहितांना डच पत्रांत शिवाजीनें सुरतेवर ता. १५ जानेवारीला छापा घातला असें म्हटलें आहे, पण इंग्लिश पत्रांत ही तारीख ५ आहे. याबद्दल डॉ. साहेबांनीं आश्चर्य व्यक्त केलें आहे (भा. २, पृ. १९०). परंतु डच लोकांनीं कालगणनेची नवी पद्धत स्वीकारलेली होती म्हणून त्या काळांत त्यांच्या तारखा इंग्लिश तारखांपुढें दहा दिवस होत्या ही गोष्ट डॉक्टरसाहेबांच्या लक्षांत आली नाहीं असें दिसतें.

खून करण्याच्या इराद्यानें एका मुसलमानानें शिवाजीवर शस्त्र उगारलें. परंतु वार करण्यापूर्वीच त्याचा हात तोडला गेला. मग त्याची व शिवाजीची झटापट लागली. रक्तबंबाळ स्थितींत दोघेही जमिनीवर आदळले. शिवाजीच्या लोकांना वाटलें कीं, शिवाजी मारला गेला. म्हणून त्यांनीं आपल्या तान्यातील सर्व कैद्यांची कत्तल करण्याचा हुकुम दिला इतक्यात तो मुसलमान मारला गेल्याचें आढळून आलें आणि शिवाजीनें कैद्यांची कत्तल थांबविली." एकंदरींत या प्रसंगीं शिवाजीनें अगच्या शिताफीनें व दक्षतेनें स्वतः च स्वतःचें संरक्षण केलें असें दिसतें.

शिवाजीवर एकाहून एक भयंकर असे इतके प्रसंग आले कीं त्यांत सर्वांत मोठा कोणता म्हणावा हें सांगता येणें कठीण आहे. परंतु पुष्कळजणांना कबूल करावे लागेल कीं ज्या औरंगजेबानें पुढें हातीं सापडलेल्या संभाजीचा क्रूरतेनें प्राण घेतला त्याच बादशहाच्या तावडींत स्वखुषीनें शिवाजी राजे आपल्या युवराजासह जाऊन सापडले हा कांहीं त्यांच्यावर आलेला लहानसहान प्रसंग नव्हता. आपल्या राज्यातील सुरतेसारख्या धनाढ्य नगरीची राजरोस चार दिवस लूट करून सुखरूपपणें परत जाणाऱ्या शिवाजीचा वेळींच बंदोबस्त करणें औरंगजेबाला आवश्यक वाटलें असणार यांत शंकाच नाहीं कारण त्यानें लगेच जयसिंगास शिवाजीवर पाठविलें. जयसिंगाचें बल अधिक पाहून शिवाजीनें नमते घेतलें आणि तह केला. याला पुरंधरचा तह म्हणतात. या तहान्वयें शिवाजीनें आपला बराचसा मुलुख किल्ल्यासह मोंगलाच्या स्वाधीन केला आणि त्याची ताबेदारी मान्य केली. परंतु एवढ्यावरच शिवाजीनें हा प्रसंग निभावून नेला नाहीं. तर राज्याचा भावी वारस आपला ज्येष्ठ पुत्र संभाजी याला बरोबर घेऊन तो औरंगजेबाकडे जावयास तयार झाला—नव्हे गेलाही. आग्र्यास जाऊन त्या

दगाबाज औरंगझेबाच्या पकडीत शिवाजी कसा सापडला याचें वर्णन ज्या इंग्लिश पत्रात केलेलें आहे तें पत्र डॉक्टरसाहेबांनीं उद्धृत केलें आहे (भा २, पृ २५६). शिवाजी आपल्या परिवारासह ता १२ मे, १६६६ रोजीं आग्र्यास दाखल झाला. तो बादशहाचा वाढदिवस असल्यामुळें त्याच दिवशीं त्याला त्याच्या भेटीस नेण्यात आलें शिवाजी दरबारात येऊन दाखल झाल्यावर काय काय घडलें याचें हृदयंगम वर्णन त्यावेळीं आग्र्याहून जीं दैनंदिन बातमीपत्रें पाठविण्यांत आलीं त्यात दिलेलें आहे. हीं पत्रें सर जदुनाथ सरकार यांनीं अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या आपल्या 'हाऊस ऑफ शिवाजी' या पुस्तकात छापलेलीं आहेत भर दरबारांत बादशहानें आपला जाणून-बुजून अपमान केला असें शिवाजीस वाटून तो दरबारातून तडक निघून गेला, ही बातमी देताना एका पत्रांत लिहिलें आहे—"शिवाजीच्या उदात्त स्वभावाची नि धैर्याची तारीफ आग्र्याचे लोक यापूर्वी करीतच होते आता औरंगझेबाचे भेटीस आल्यावेळीं त्यानें जो बेदरकारपणा दाखविला आणि रोखठोक उत्तरें दिलीं त्यामुळें त्याच्या वीरश्रीचे पोवाडे लोक अधिकच गाऊ लागले आहेत" शिवाजीला जिवंत मरण्याचे, एखाद्या किल्ल्यात अथवा तुरुंगांत टाकून ठेवण्याचे, आणि शेवटीं कापून काढण्याचे असे निरनिराळे घाट घालण्यांत आले होते. पण त्या सर्वांतून शिवाजीनें स्वतःच्या चातुर्यानें मुक्तता करून घेतली. शेवटीं ता. १८ ऑगस्ट रोजीं त्यानें स्वतःची सुटका स्वतः करून घेतली आणि तो स्वदेशास येऊन दाखल झाला शिवाजीनें आपल्या बुद्धिबळानें आपली सुटका करून घेतली हें तर खरेंच, परंतु तो आग्र्यास कां गेला, आणि आपण होऊन औरंगझेबाच्या हातांत कां सापडला, या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें अद्यापि मिळालेलीं नाहीत.

यावेळीं शिवाजीचें वड किती वाढलेलें होतें आणि त्याचा दरारा किती दूरवर पसरलेला होता याची कल्पना डॉक्टरसाहेबांनीं उद्धृत केलेल्या कांहीं इंग्लिश पत्रांवरून येते. एका पत्रांतील मजकूर असा आहे:— "त्याच्या लुटमारीनें शिवाजीला इतकी विलक्षण प्रसिद्धि मिळालेली आहे कीं त्याचें शरीर वायूचें असावें आणि त्याला पंख असावेत असें लोकांना वाटूं लागलें आहे. नाहींतर आम्ही ऐकतों त्या प्रमाणें तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं कसा उद्भुत झाला असता! एके दिवशीं तो एका स्थळीं आहे अशी वार्ता येते न येते तोंच दुसरे दिवशीं तो अन्य स्थळीं असल्याचा सुगावा लागतो. याप्रमाणें दहापांच दूरदूरच्या ठिकाणीं तो एकाच वेळीं असल्याचें वृत्त ऐकूं येतें. हर्क्यूलसला जें शक्य झालें नाहीं तें शिवाजी करूं शकतो असें लोकांना वाटूं लागलें आहे, व लहानथोर सर्व लोक एका शिवाजीबद्दल बोलत असलेले दिसतात" (भा. २, पृ. १०२). दुसऱ्या एका पत्रांत लिहिलें आहे, "शिवाजी जें कांहीं बेत करतो ते अगदीं गुप्त ठेवण्यांत येतात; त्याचें सैन्य तळ देऊन एका ठिकाणीं असें कधीं राहातच नाहीं; आणि कोणासहि चाहूल लागण्यापूर्वीं त्याचा छापा पडून जातोहि" (भा. २, पृ. २४४). अन्य एक पत्र म्हणतें, "उत्तर आणि दक्षिण येथील बलाढ्य पातशाहांबरोबर लढणाऱ्या या शिवाजीनें जे विजय मिळविले आहेत ते म्हणजे मोठें आश्चर्य होऊन बसलें आहे. आतांपर्यंत त्याला यशच येत गेलें आणि पुढेंहि यशच मिळत जाणार यांत शंका वाटत नाहीं" (भा. २, पृ. ९९-१००).

अशा या महान् पराक्रमी, विजयशाली, धैर्यशील, कर्तृत्ववान शिवाजीनें आपल्या या देशाचें राजकीय स्वरूप इतकें बदललें कीं पुढें संभाजी आंग्रे यानें एका पत्रांत शिवाजीचें जें वर्णन केलें तें अगदीं

-समर्पक वाटते. संभाजी लिहितो, "महाराज अवतारी होते. वरदी होते. तेणें करून जे जे इच्छिले पदार्थ ते ते सिद्धीस नेले. **महाराष्ट्र नूतनच निर्माण करून** स्वधर्मस्थापना केली. त्यांनीं साहसकर्में सामान्य केलीं असें नाहीं. त्यांची उपमा त्यांसच. अन्यत्रांस बोलिली -नाहीं." (राजवाडे, खंड ३, ले. २७३). **महाराष्ट्र नूतनच निर्माण करणाऱ्या शिवाजीला** एकाच गोष्टीची उणीव भासली. ती म्हणजे राज्याभिषेक होय. शिवाजीनें राज्याभिषेक कां केला याचीं कारणें डॉक्टर-साहेबांनीं भा. ३, पृ. ३–६ वर दिलीं आहेत. कोणत्या कां हेतूनें राज्याभिषेक केला गेला असेना, त्यांचा एक परिणाम लगेच दिसून आला. मराठ्यांचें, महाराष्ट्राचें एक स्वतंत्र नि धर्मशास्त्रसंमत राज्य निर्माण झालें, तें असें कीं त्याचा दर्जा त्यावेळीं अस्तित्वांत असलेल्या पातशाहीबरोबर गणला जाऊं लागला. १६७७ सालीं शिवाजी कुतुबशहाच्या भेटीसाठीं हैदराबादेस गेल्या वेळीं त्यानें मालोजी घोरपड्यास जें एक महत्त्वाचें पत्र लिहिलें त्यांत ही गोष्ट प्रामुख्यानें नमूद केली आहे. शिवाजी लिहितो, "आम्ही येऊन हजरत कुतुब-शहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदब आहे की शिरमोई धरावी, तसलीम करावी. परंतु **आम्ही आपणावरी छत्र धरिलें असे. ही गोष्ट कुतुबशहास मान्य होऊन शिरमोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें.** पातशहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. **पादशहांनीं बहुतच इज्जती होऊन गळ्यास गळा लावून भेटले. आम्हांस हातीं धरून नेऊन जवळीं बैसविलें.**" महत्त्वपूर्ण असा या पत्राचें इंग्रजी भाषांतर डॉक्टरसाहेबांनीं भा. ३, पृ. २८१-८४ वर दिलें आहे. राज्याभिषेकामुळें शिवाजीचें राज्य शास्त्रसंमत झालें; समानतेचा दर्जा प्राप्त झाला; इतर राजेरजवाड्यांनी

त्याला मान्यता दिली; इत्यादि गोष्टी उघड असताना देखील जे लोक शिवाजीला केवळ धडपेखोर म्हणून संबोधतात त्यांना काय म्हणावें?

शिवराज्याभिषेकाचें वर्णन डॉक्टरसाहेबांनी एका स्वतंत्र प्रकरणांत केलेलें आहे (भा. ३, पृ १-४३) यासबंधीं त्यांना इंग्लिश नि डच कागद बरेच मिळाले, मुंबईहून ऑक्सिंडेनसाहेब याच सुमारास रायगडास आला होता राज्याभिषेकाचे सर्व विधी त्यानें पाहिले आणि त्याचें वर्णन आपल्या डायरींत केलें. ही डायरी डॉक्टरसाहेबांनी उद्धृत केली आहे. या डायरींतील नोंदींचा सारांश येथें दिल्यास तो वाचकांना उद्बोधक होईल असें वाटून खालीलप्रमाणें सारांश देत आहे —

**ता. २१ मे, १६७४:** शिवाजी प्रतापगडास भवानीच्या दर्शनास गेला होता, तो परत रायगडास आला असें आज कळलें. **२६ मे:** राज्याभिषेक, लग्न वगैरे गोष्टींच्या तयारींत शिवाजी अगदीं गढून गेला असला तरी त्यानें मला आज भेटीस येऊं दिलें. शिवाजी आणि त्याचा मुलगा (संभाजी) अगदीं गडबडींत आहेत **२९ मे:** शिवाजीची आज सुवर्णतुला केली गेली त्याचें वजन १६,००० पगोडा (म्हणजे अजमासें १४० पौंड) झालें. **३० मे:** राज्याभिषेक होऊन जाईपर्यंत शिवाजी अन्य कोणत्याच गोष्टीकडे लक्ष घालूं इच्छीत नाहीं असें मला सांगण्यांत आलें. **६ जून:** "सकाळीं ७–८ वाजतां मी दरबारास गेलो. त्या वेळीं शिवाजी एका भव्य सिंहासनावर बसलेला पाहिला मौल्यवान वस्त्रें परिधान केलेले त्याचे मानकरी लोक त्याच्या सेवेस हजर होते. सिंहासनाच्या जरा खालीं संभाजी राजा, पेशवा मोरोपंत, आणि एक अत्यंत विद्वान ब्राह्मण (गागा भट्ट?) असे तीघे बसले होते. लष्करी अधिकाऱ्यांसह इतर लोक उभे होते. सिंहासनाच्या दोन्ही बाजूस मुसलमानी पद्धतीप्रमाणें मुलामा दिलेल्या भाल्यांच्या

दोंकावर राज्य नि सत्तानिदर्शक चिन्हें अडकविलेलीं दिसत होतीं. उजव्या बाजूला दोन मस्त्या मोठ्या सुवर्णमस्त्यांची मस्तकें होतीं. त्यांना भले मोठे सुळे होते. डाव्या बाजूला कितीतरी मोरचेलें होतीं. शिवाय एका मौल्यवान भाल्याच्या टोंकावर समतोल न्यायदानाचें प्रतीक म्हणून एक सोन्याची तराजू उभी केलेली दिसत होती आम्ही दरबारातून बाहेर पडलों तेव्हा राजवाड्याच्या दरवाज्याजवळ सोन्याच्या दागिन्यांनीं शृंगारलेली दोन घोडीं व दोन लहान हत्ती दिसले. त्यांना पाहून आम्हास आश्चर्य वाटलें कीं, अत्यंत बिकट वाट असलेल्या या गडावर या प्राण्यांना आणले तरी कसें?" ८ जून: शिवाजीचें चवथें लग्न झालें पण समारंभ असा झाला नाहीं. ९-१० जून: आहेराना देकार देण्यात शिवाजीचा सर्व वेळ गेला.

राज्यारोहण समारंभाचें वर्णन करणारीं जीं डच पत्रें डॉक्टरसाहेबांनीं उद्धृत केलीं आहेत त्यांत शिवाजीला या प्रसंगीं जो थोडा त्रास झाला आणि जो अतोनात खर्च आला त्याचेंहि वर्णन केलेलें आहे. वेंगुर्ल्याहून ता. २३ आक्टोबर, १६७४ रोजीं लिहिलेल्या पत्राचें भाषांतर 'पत्रसारसंग्रह' मध्यें दिलेलें आहे. त्याचा सारांश येथें देण्यास हरकत नाहीं "पुष्कळ दिवसांच्या पूर्वतयारीनंतर जून महिन्यात शिवाजीच्या राज्याभिषेकाची संपूर्ण तयारी झाली. ब्राह्मण, विद्वान् भट, सहकुटुंब असे सुमारें अकरा हजार लोक रायगडावर जमा झाले. शिवाजीनें गुप्त व विद्वान् गृहस्थांना त्यापुढे हेतु सांगितला-क्षत्रियांची मोंगलांचे जातीं सोडून क्षत्रिय जातींत प्रवेश केल्याशिवाय आपल्याला मुकुट धारण करतां येणार नाहीं, करितां आपल्याला त्या जातींत घ्यावें अशी त्यानें विनंती केली. त्याचे पूर्वज दिल्ली, दिल्ली मेंहुतेच असल्यानें तसें करणें अशक्य आहे असें विद्वानांनीं सांगितलें.

भोंसले क्षत्रियांचेच वंशज आहेत आणि असें जातिपरिवर्तन होऊं शकेल असें शिवाजीचें म्हणणें पडलें. तेव्हां प्रथम क्षत्रिय बनल्या-शिवाय शिवाजी मुकुटधारणाला योग्य होणार नाहीं असा विचार करून, पूर्वीसारखें जुलमानें राज्य न करण्याचें त्यानें वचन दिल्याचें लक्षांत घेऊन गेल्या २९ मे रोजीं दुसऱ्या पक्षाच्या मटळीनें त्याला मोठ्या समारंभानें क्षत्रिय करून घेतलें. क्षात्रधर्माची दीक्षा ते देणार होते, परंतु ब्राह्मण्याचा आचार आपल्याला शिकवावा अशी त्यानें इच्छा दर्शविली. ही गोष्ट त्यांना मान्य होईना. परंतु त्यापैकीं एका मुख्यानें संमति दिली आणि शिवाजीनें त्याला ७००० होन बक्षीस दिले. एक सर्व दिवस त्याबद्दल सत्कार करून १७००० होन धर्मार्थ वाटून दिले. पापक्षालनार्थ म्हणून ४ जून रोजीं शिवाजीनें मोठा दानधर्म केला. . शिवाजीनें जाळपोळ केली त्यामध्यें स्त्रिया, मुलें, पशू व ब्राह्मण यांची हत्या झाली असण्याचा संभव होता. त्या पापाच्या क्षालनार्थ दोघा ब्राह्मणांच्या सूचनेवरून आणखी १६०० होनाचे दानधर्म करण्यात आले. सर्व आवश्यक धार्मिक विधी यथास्थित झाल्यानंतर ५ जून रोजीं मुद्दाम आणिलेल्या गंगाजलानें स्नान करून शिवाजीनें प्रत्येक ब्राह्मणाला १०० होन दक्षिणा दिली. मुख्याला ५००० होन व २००० होनांचें वर्षासन दिलें. ६ जून रोजीं पहाटे ५ वाजतां त्यानें मुद्दाम बनविलेल्या सिंहासनावर आरोहण केलें. समारंभाचा व दानधर्माचा एकंदर खर्च दीड लाख होन इतका झाला असें म्हणतात".

अन्य एका डच पत्रात म्हटलें आहे की *राज्याभिषेकानंतर शिवाजीनें* 'शिवराय छत्रपति हें नामाभिधान स्वीकारिलें' (He took the name of Shivarai Chhatrapati ).

राज्याभिषेकानंतर शिवचरित्रातील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याची दक्षिणेंतील स्वारी होय. हिलाच 'दक्षिण दिग्विजय' हें नांव

देण्यात आलें आहे. या स्वारीत दक्षिणेंत वखार करून राहिलेल्या इंग्रज, फ्रेंच आणि डच लोकांशीं शिवाजीचा थोडाफार संबंध आला; आणि त्याच्या अलौकिक पराक्रमाच्या गोष्टी हे व्यापारी आतापर्यंत नुसतें ऐकत होते तो जातीनें त्या भागात आल्यामुळें त्याच्या हालचालीची बित्तंबातमी त्यांनीं मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें इंग्रजी, फ्रेंच नि डच अशा सर्व भाषेंत या काळासंबंधीं कागदपत्र सापडतात ते बहुतेक सर्व डॉक्टरसाहेबांना मिळाले आहेत (भा २, पृ. २२३-२८९). शिवाजीनें या स्वारीवर जवळ जवळ चवदा महिने घालविले. या प्रदीर्घ काळांत बऱ्याच गोष्टी घडून आल्या. त्या सर्वांचा इतिहास येथें देणें शक्य नाहीं. म्हणून डॉक्टरसाहेबांनीं मिळविलेल्या पत्रांच्या आधारें शिवाजीच्या या स्वारीचें एक लहानसें टिपण मात्र येथें दिलें आहे.

'मोरो पंडित, अण्णाजी पंडित आदि करून' यांच्यावर राज्यकारभार सोंपवून शिवाजी १६७७ च्या फेब्रुवारी महिन्यांत स्वारीवर निघाला आणि मार्चच्या प्रारंभीं कुतुबशहाच्या राजधानीस (भागानगर उर्फ हैदराबाद) येऊन पोंहोचला. "बेंगुर्ल्याच्या मार्गानें १२००० घोडदळ बरोबर घेऊन शिवाजी मार्च महिन्यांत गोंवळकोंड्याच्या राजधानींत आला. ता. ४ मार्च रोजीं त्याची व कुतुबशहाची भेट झाली. मादण्णा आपुलकीनें त्याचें स्वागत करण्यांत आलें; आणि कर्नाटक व जिंजी जिंकण्यासाठीं कित्येक हजार सैन्य त्याच्या बरोबर देण्यांत आलें" (डच डायरी, पृ २३३). शिवाजीनें भागानगराहून मालोजी घोरपडे यांना लिहिलेलें पत्र सुप्रसिद्ध आहे. त्यांत आपण कुतुबशहाकडे कां गेलों, भेट कशी झाली, काय काय ठरलें वगैरे गोष्टी शिवाजीनें लिहून कळविल्या आहेत. मार्च अखेर किंवा एप्रिलच्या सुरुवातीला शिवाजी त्या राजधानींतून निघाला. मधली कांहीं ठिकाणें करीत करीत तो

ता. ८ मेला मद्रासपासून ८१९ कोसांवर येऊन ठेपला. ता. ९ मेच्या मद्रास डायरीतील नोंद अशी आहे "जिंजी घेण्यासाठीं २०,००० घोडेस्वार व ४०,००० पायदळ बरोबर घेऊन शिवाजी इकडे आला आहे. त्याच्या आघाडीवरचे घोडेस्वार येथून ८१९ कोस अंतरावरील त्रिपती नि कर्लोस्तीवरून पुढें गेले. आज त्याचा मुक्काम येथून ४ कोसांवर असलेल्या कांचीवरम् येथें होईल असें दिसतें" (पृ. २३३). मद्रासच्या पश्चिमेस सात मैलांवर असलेल्या पेदापोलम् या ठिकाणीं शिवाजीनें काहीं दिवस मुक्काम केला. बहुतेक तेथूनच मद्रासला पत्र पाठवून त्यानें विषबाधाप्रतिबंधक काहीं पदार्थ व द्रव्यें मागविलीं. मद्रासकरांनीं सर्व जिन्नस खुषीनें पाठविले. ही मागणी शिवाजीनें पुढें अनेक वेळा केली (पृ २३४-७). ता. २३ मेच्या सुमारास शिवाजीच्या सैन्यानें जिंजीचा किल्ला घेतला. एका जेस्यूइट पत्रात ही खबर मोठ्या मजेशीर रीतीनें दिलेली आहे. "शिवाजी बलाढ्य सेना घेऊन दक्षिणेंत येतो आहे अशी वदता येथें पसरली. परंतु शेंकडों मैल दूर असलेल्या या प्रदेशात तो कशास येईल, असा प्रश्न लोक विचारतात तोंच विद्युत्प्रहार व्हावा त्याप्रमाणें शिवाजीनें जिंजीवर झडप घालून तो किल्ला पहिल्या हल्ल्यासरशीं सर केला आणि लोकांच्या प्रश्नाला जातीनें हजर राहून उत्तर दिलें" (पृ. २३८-९). दक्षिण कर्नाटकाचा पठाण अधिकारी शेरखान लोदी याचा शिवाजीनें पाडाव केला, शेवटीं त्याला पकडिलें, आणि आजूबाजूचीं बरींच ठाणीं घेतलीं (पृ २३९ ४४) जुलै महिन्याच्या मध्याच्या सुमारास शिवाजीचा तळ कोलेरूनदीच्या काठीं तिरुमलवाडींत पडला. याच ठिकाणीं त्याची व एकोजीची भेट झाली. वाटणीच्या बाबतींत मतैक्य न झाल्या-मुळें, आणि बहुधा भीतिग्रस्त होऊन, एकोजी एकाएकीं निघून गेला. शिवाजीनेंहि आपला तळ तेथून उचलून हालविला. मद्रा यौरे

ठिकाणांकडून खंडणी वसूल करीत शिवाजी आगस्टच्या प्रारंभी वृद्धाचलम् येथें देवदर्शनास गेला. श्रीरंगपट्टण येथून त्यानें बरीच लूट नेली (पृ. २४९-५०). त्याच्या सैन्यानें मे महिन्यांत वेलोरास वेढा दिला होता. तो वेढा तसाच चालूं ठेवण्यांत आला आणि पुढें चौदा महिन्यांनीं वेलोरचा किल्ला हस्तगत झाला (पृ. २५८). परत येतांना शिवाजी बंकापूर, गदक, लक्ष्मेश्वर वगैरे ठिकाणांवरून एप्रिल (१६७८) च्या प्रारंभीं पन्हाळ्यास आला.

अशा या प्रदीर्घ स्वारीचा खरा उद्देश काय होता हा एक प्रश्नच आहे. डॉक्टरसाहेबांनीं या स्वारीचीं कारणें दिलेलीं आहेत (पृ. २२८-२९). एकोजीकडून इस्टेटीचा हिस्सा मिळविण्यास शिवाजी तेथवर गेला म्हणावें तर वडील वारल्यापासून १३ वर्षे शिवाजी गप्प बसला कसा? केवळ लूट मिळविण्यासाठीं शिवाजी तिकडे गेला असतां तर इतके दिवस तो तेथें राहाता ना. शिवाय देश जिंकून त्याची मजबुती करण्याचे त्यानें जे प्रयत्न केले ते केवळ लूटमारीच्या प्रकाराचे नव्हते. दक्षिणेंत असतांनाच शिवाजीनें मद्रासकर इंग्रजांना एक पत्र लिहून कळविलें कीं, "मार्गे कर्नाटकांत आगमन झाल्या दिवसापासून बरेच गडकोट माझ्या हातीं पडले. मी आतां किल्लेक बंदरें आणि किल्ले यांचे या ठिकाणीं नवीन बांधकाम सुरू करणार आहे...." (पृ. २५०-५१). शिवाजीबरोबर जवळ जवळ २०,००० माणसांचा एक तांडाच दक्षिणेंत गेला होता. यापैकीं पुष्कळजणांचा तेथील नवीन राज्यव्यवस्थेंत शिवाजीनें उपयोग करून घेतलेला असावा असें दिसतें. यावरून केवळ लुटीसाठीं शिवाजी दक्षिणेकडे वळला नाहीं हें उघड होतें. दक्षिणेंत आपलें राज्य वाढविण्यासाठीं तो तिकडे गेलेला होता, आणि आपला मार्ग सुकर व्हावा म्हणून आधीं त्यानें कुतुबशाहाशीं संधान जोडिलें असें म्हणतां येण्यासारखें आहे.

देशीं परत आल्यावर शिवाजींचें मोंगलाशीं युद्ध पुन्हा सुरू झालेंच. जंजिरेकर सिदी याच्याशींहि शिवाजीचें चांगलेंच जुंपलें आणि शिवाजीनें जेव्हां खांदेरी हस्तगत करण्याचा प्रयत्न सुरू केला तेव्हां त्याची नि मुंबईकर इंग्रजांचीहि चकमक उडाली. या प्रकरणाबाबत डॉक्टरसाहेबांना पुष्कळ कागदपत्र उपलब्ध झाले (भा ३, पृ. २९०-४९४). ते इतके आहेत कीं त्यांतील हकिकत साराशरूपानें देणें देखील स्थलाभावास्तव शक्य नाहीं.

शिवाजीच्या शेवटच्या दिवसांत त्याच्या अंतःकरणाला धक्का देणारी एक गोष्ट घडली. ता. १३ डिसेंबर, १६७८ रोजीं संभाजी परळीहून पळून गेला आणि दिलेरखानाला जाऊन मिळाला. एका वर्षानें संभाजीला उपरति झाली आणि फिरून तो पन्हाळ्यावर आला. (२१ डिसेंबर, १६७९). पुढें १३ जानेवारीला पितापुत्राची पन्हाळा मुक्कामींच भेट झाली परंतु भेटीमुळें दिलजमाई कितीशी झाली तें सांगता येत नाहीं. संभाजी पन्हाळ्यावरच असतांना शिवाजीला रायगड मुक्कामीं ता. २४ मार्च, १६८० रोजीं दुखणें सुरू झालें व तें शेवटचेंच ठरलें, आणि ता. ३ एप्रिल रोजीं शिवाजींचें प्राणोत्क्रमण झालें.

येथें शिवाजीच्या कार्याचा आढावा घेणें शक्य नाहीं. डॉक्टर बाळकृष्ण यांनीं त्यासाठीं एक स्वतंत्र भाग लिहिला आहे (भाग ४ था). त्यावरून ओझरती नजर फिरविली तरी सुद्धां शिवाजीनें केलेल्या खऱ्या कार्याची रूपरेषा लक्षांत येते *विद्युल्लतेप्रमाणें गतिमान अशा आपल्या पराक्रमानें* शिवाजीनें एतद्देशियांचे डोळे तर दिपवून टाकलेच (म्हणून तर त्याला ते अवतार समजू लागले); पण येथें व्यापारानिमित्त आलेल्या परकीयांवर देखील त्यानें विलक्षण छाप बसविली. हें डॉक्टरसाहेबांनीं त्याचीं कांहीं पत्रें उद्धृत केलीं आहेत त्यावरून स्पष्ट होतें. १६७८ मध्यें मुंबईहून लिहिलेल्या एका पत्रांत म्हटलें आहे, "स्वतःला महान विजेता म्हणवून

घेण्याच्या इराद्यानें शिवाजी गतसालचा पावसाळा संपल्यावर २०,००० घोडेस्वार व ४०,००० हशम घेऊन रायरीहून कर्नाटककडे गेला. त्या भागांतील जिंजी व तंजावर हीं दोन समृद्ध ठिकाणें आहेत. सैनवर सीझरनें स्वारी केली त्यावेळीं त्याला ज्या प्रकारचा जय मिळाला त्याप्रकारचा जय शिवाजीला कर्नाटकांत मिळाला. तो आला, त्यानें पाहिलें, आणि त्यानें जिंकिलें. सोनें, हिरे, माणिकमोतीं इत्यादि वस्तूंची त्याला मिळालेली संपत्ति अलोट होती" (मा. ३, पृ. २५३). आणखी एका पत्रांत लिहिलें आहे कीं, "शिवाजीनें दोन गड घेतले. चतुराई आणि चपळता या गुणांत तो **अलेक्झांडर द ग्रेट** पेक्षां तसूंभर देखील कमी नाहीं. त्याच्या सैनिकांना जणुं पंख असावेत असे वाटतें, तो स्वतः त्यांना उडती पांखरें म्हणत असतो" (मा. ३, पृ. २५४). दुसऱ्या एका पत्रांतील मजकूर असा आहे:—"शिवाजीचा निःपात करण्यासाठीं मोंगल सेनापति ८०,००० घोडेस्वार घेऊन जाणार आहे. पण आतां हें जगद्विख्यात झालें आहे कीं शिवाजी म्हणजे प्रतिसरटोरिअस आहे. युद्धा योजण्यांत तो हॅनिबॉलच्या तोडीचा आहे" (मा. ३, पृ. २५५). शेवटीं, एका पोर्तुगीज पत्रांतील उल्लेख असा आहे:—"दमणपासून गोव्यापर्यंतच्या आमच्या अंमलाखालील प्रदेशालगतचा सर्व देश शिवाजीनें आपल्या ताब्यात घेतला आहे. हिंदुस्थानच्या या नव्या ॲटिलाचें शौर्य, चातुर्य आणि निर्भर हे गुण इतके अगाध आहेत कीं जिंकलेल्या प्रदेशाचें संरक्षण तर तो करूं शकतोच, शिवाय नवीन नवीन चढाया करण्यासही तो चुकत नाहीं" (मा. ३, पृ. ५३०). सीझर, अॅलेक्झांडर, हॅनिबॉल, अॅटिला यांच्यासारख्या जगाच्या इतिहासांत गाजलेल्या अतिथोर व्यक्तींच्या पंक्तींत युरोपियन लोकांनीं शिवाजीला बसविलेलें पाहून कोणाच्या हिंदपाशिपाच्या अंगावर मूठभर मांस चढणार नाहीं !

# Dr. Balkrishna's

# Contribution to Historical Research

By **Dr S N SEN**, M A, Ph D, D. Litt (Oxon),

Keeper of the Records of the Government of India,

New Delhi

I do not exactly remember when I first met Dr Balkrishna and where He attended the Modern History Congress held at Poona and read a paper on the Bavada Daftar With his characteristic thoroughness he discussed the vexed question of the relationship between the Bhonsles and the Ranas of Udaipur He had discovered a number of Persian *farmans* which threw a flood of light on the past history of one of the principal branches of the Bhonsla family. Incidentally his paper led to an interesting discussion on another controversial question, namely the literacy of Shivaji Maharaj, in which I took part But I might have met him earlier at Bombay, I am not sure

We had some correspondence on a subject of common interest before the Poona Congress Dr. Balkrishna was then engaged on his well-known work on Shivaji and I was also interested in the subject This common interest in Mahratta History formed a friendly bond that brought us close together, but we seldom came in intimate personal contact We knew each other's work and I learnt to admire Dr Balkrishna both as a man and as a scholar, because there was something in the sparely built, earnest looking, tall man that at once convinced every one that here was a person who was quite different from the rest of us.

We again met at Allahabad in 1938 The scope of the Modern History Congress had been widened. It now embraced the entire History of India and unlike the Poona session the Congress at Allahabad was split up into several sections Dr Balkrishna presided over the Modern History Section and I was called upon to conduct the deliberations of the Early Medieval Section That was the last I saw of him, although our correspondence continued as before

In 1939, I was appointed Keeper of the Records of the Government of India and *ex-officio* Secretary of the Indian Historical Records Commission of which Dr Balkrishna was a corresponding member He took a keen interest in the work of the Commission and was one of its most active members He could not attend the Calcutta session and actually passed away before the Commission met at Baroda But long before his premature death he had decided that the Kolhapur State should be represented by a younger scholar and unhesitatingly made room for Dr Pawar.

Although he could not attend the Calcutta session of the Commission he sent a very important resolution for the members' meeting The resolution called upon the Government of India to make an annual provision for securing typescripts of the manuscript sources of Indian History from different parts of Europe It was an ambitious scheme but about its object there could not be any difference of opinion The Commission referred the question to a Sub-Committee but unfortunately the War broke out and the scheme had to be abandoned as impracticable for the time being. My own sentiments about this resolution were expressed in the following terms in my address to the Modern

Indian Section of the Lahore session of the Indian History Congress —

"We can do nothing better than to emulate the example of a noble son of the Punjab Born in the land of the five rivers, Dr Balkrishna transferred his sphere of activities to far off Maharashtra He started his work in the British archives but later turned his attention to the indigenous records in private custody His was not a solitary quest, for in Maharashtra many sincere scholars have devoted their lives to this noble work Our Muse is an exacting mistress, she demands undivided devotion and the frail physique of Dr Balkrishna could not bear the strain He died in harness Two years back he presided over this section at Allahabad and his voice must be still ringing in your ears Last year, he sent a resolution to the Indian Historical Records Commission calling upon the Government of India to secure transcripts of all contemporary records relating to this country now preserved in lands beyond the seas He passed away before his mission was fulfilled It is for us who survive to take up his unfinished work May his tired soul find peace and consolation in the assurance that his colleagues will do what he left undone, his friends will complete what he left unfinished and his countrymen will achieve his cherished hopes and devout desires "

A man of Dr Balkrishna's ability and character never dies He has passed away but his work abides for ever May his memory remain ever green in the land of his birth and may his life and work prove an unfailing source of inspiration to future generations

# डॉ॰ बाळकृष्णांनीं शिवचरित्रावर टाकलेला नवा प्रकाश

लेखकः—सरदार रा. ब. माधवराव वि. किबे, एम्. ए., इंदूर

गुरुकुल कांगडी येथें असतांना डॉ. बाळकृष्ण हे अर्थ व राजनीति-शास्त्रांचे प्राध्यापक म्हणून प्रख्यात होते. लंडन विश्वविद्यालयाची Ph. D. पदवी त्यांनीं त्याच विषयांत संपादन केली. त्यांचा राष्ट्रीयत्वाकडील कल त्यांच्या लंडनमध्यें प्रसिद्ध झालेल्या 'हिंदुस्थान आणि इंग्लंड यांच्यामधील व्यापारी संबंध' या ग्रंथावरून व त्यांनीं एम्. ए. ची पदवी मिळविल्यानंतर सरकारी नोकरीचा लोभ न धरतां आर्यसमाजास आपली आजन्मसेवा समर्पण केली, यावरून दिसून येतो. पण ही ज्योत त्यांनीं देशी संस्थानांत नोकरी करीत असतांना तेवत ठेवली, यांत त्यांचें देशप्रेमाचें उत्कटत्व दिसून येतें. मराठी राज्यांतच, त्यांतल्यात्यात शिवाजी महाराजांच्या वंशजांच्या राज्यांत, त्यांची नेमणूक झाल्यानें व त्यांतहि एका शैक्षणिक संस्थेचे अधिकारत्व त्यांस प्राप्त झाल्यानें त्यांनीं आपलें लक्ष महाराष्ट्राच्या इतिहासाकडे लावलें.

त्यांनीं दोन खंड व प्रत्येक खंडाचे दोन विभाग यांत शिवाजी महाराजांच्या चरित्राची पार्श्वभूमी म्हणून शहाजी महाराजांचें चरित्र व त्यानंतर प्रत्यक्ष शिवरायांचें चरित्र लिहून फार मोठी कामगिरी केली आहे. इंग्रजीत बहुतेक मुसलमानी आधारावर शिवाजीचें चरित्र सर जदुनाथ सरकार या बंगाल्यांच्या इतिहासाविषयी संशोधन करण्यास उत्सुक असा विद्वानानें लिहून एक हीन चरित्र लिहिलें. पुढेंहि आपलीच त्यांनीं दर्जांच दुरुस्ती केली. तिचें श्रेयहि डॉ. बाळकृष्ण यांस अंशतः तरी दिलें पाहिजे. नंतर डॉ.

सुरेंद्रनाथ सेन यांनीं त्याच भारतेंत मराठ्यांच्या विशिष्ट राज्यकारभारावर त्याचें सत्य व उच रस्थर दाखविणारा प्रकाश पाडला रा. न. गो. स. सरदेसाई यानींहि इंग्रजींत पोर्टेनकृत लिखाण केलें आहे, परंतु डॉ. बाळकृष्ण यानीं देशी (त्यास मराठी थोडफार वाचता येत असल्यानें) व विदेशी कागदपत्राचा अभ्यास करून जें शिवचरित्र रेखाटलें आहे, ती कामगिरी महनीय होय. त्यानीं कागदपत्रांतील छापील माहितीसुद्धा पुरविण्यास जी कसोटी लावली आहे व तिचें जें मूल्यमापन केलें आहे त्याविषयीं मतभेद असू शकेल पण त्यानीं घेतलेले श्रम, माहिति मिळविण्याकरिता केलेला खर्च व सोसलेली झीज, तसेंच ती माहिती जगापुढें आणताना दाखविलेली चिकाटी ही अपूर्व व अतुल्य आहेत कै. राजवाडे यांचे व्यक्तिश: श्रम मोठे व त्यानीं उजेडात आणलेली सामुग्रीही महत्त्वाची, सर जदुनाथ सरकार यानीं जमविलेले साहित्यहि संग्रह करण्यास तितकेंच कठिण व त्यांच्यासारख्या व्यक्तीसच साध्य, रा. व. सरदेसायांचे तुलनेस रोमचा इंग्रज इतिहासकार गिबन, किंवा ग्रीसचा इतिहासकार ग्रोट अथवा इंग्लंडचा तत्कालीन पार्लमेंटचा हॅलम हेच योग्य आहेत पण कै. राजवाड्यांचे परिश्रम जसें मराठींतच झाले आहेत, त्याप्रमाणें त्यांचेहि असल्यानें, ते बहुसंख्य लोकास अज्ञात आहेत पण आजपावेतों जे इंग्रजी भाषेंत शिवकालासंबंधीं लिखाण प्रसिद्ध झालें आहे, त्यात डॉ. बाळकृष्ण यास केवळ आद्यच नव्हे तर विशिष्ट व अव्वल स्थान प्राप्त झालें आहे

ज्या युरोपातील देशाचा संबंध महाराष्ट्राशीं किंबहुना भारतवर्षाशीं प्रथम आला त्यात डचांचा संबंध फार पूर्वी आलेला आहे त्याचें राज्य सीलोन-मध्यें बराच वेळ टिकलें पण हिंदुस्थानात त्याचा पाय स्थला नाहीं, मात्र त्यांचा व्यापार चालूच होता त्यांचें साम्राज्य जावा व मलाया द्वीपकल्पात डच इंडीज येथें असल्यानें त्या ठिकाणीं व खास हॉलंडच्या राजधानींत

महाराष्ट्राच्या अर्वाचीन साम्राज्याच्या आरंभीच्या इतिहासावर प्रकाश टाकणारी माहिती पुष्कळ संग्रहित झाली आहे. तिचा शोध करून ती हस्तगत करण्यात डॉ० बाळकृष्ण यांनी फार मोठी कामगिरी केली आहे.

जरी शहाजी महाराजांस स्वतंत्र साम्राज्याची इच्छा नव्हती तरी आपण मोठ्या राजकुलांत उत्पन्न झालो व आपणास म्लेंच्छांची नोकरी करणें तितकें पर्याप्त नाहीं याची जाणीव, त्यांस निजामशाहीचें रक्षण करण्याकरिता त्यांनी जे आटोकाट प्रयत्न केले, त्या प्रसंगानें पूर्णपणें त्यांच्या मनावर ठसली असली पाहिजे. त्याप्रसंगीं त्यांनीं मनात आणलें असतें तर स्वतंत्र असे मराठ्यांचें राज्य त्यांस करता आलें असतें, पण मनात आणण्याचा तो काळच नव्हता. श्रीकृष्णजन्मापूर्वी यादववंशांत देवकीनी जन्म घेऊन अनुकूल परिस्थिती उत्पन्न केली होती. पण शहाजींच्या वेळी सर्वच परिस्थिति उलट होती. हिंदू सरदारहि आपणास यवनांचे इमानी नोकर समजण्यांत भूषण मानीत होते. अधिक तर हिंदूंचा द्वेषच करीत होते. अलीकडे श्री. वसू याचा 'दस्तुरउल अमल', इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स् कमिशनच्या १७ व्या अहवालात प्रसिद्ध केलेला लेख, वाचला तरी वहामनी राज्याच्या अशोकात विजापुरची हिंदूवर मेहरनजर होती ही कल्पना, (जिला गुरुचरित्रांतील व दामाजी व दासोपंत यांच्या गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत) विपरित ठरते. मोंगलांप्रमाणेंच ते हिंदुद्वेषेच होते.

अशा निरुद्ध परिस्थितीत शहाजीनें 'महाराजाधिराज' ही पदवी व त्यांत अनुस्यूत असलेले विजापुरच्या राज्यांतर्गत डोमिनियन स्टेटस्, कसें प्राप्त करून घेतलें हें पुराव्यानिशी डॉ० बाळकृष्ण यांनी सिद्ध केलें आहे. या स्टेटसास शोभणारे त्यांचे ऐश्वर्य व त्यांचा परिवार कसा होता—व पुढें तर कर्नाटकाचे ते राजेच ठरले—हें सर्व त्यांच्या ग्रंथांतूनच वाचण्यास सापडतें. मराठ्यांचा सुप्रसिद्ध इंग्रज इतिहासकार ग्रँट डफ तर अर्वाचीन

अपुरा इतिहास देतो. वै. राजवाड्यांचे शोध व त्यांनी राधामाधवविलासचंपू यावर लिहिलेली विस्तृत प्रस्तावना, याचाहि पूर्ण उपयोग डॉ० बाळकृष्ण यांनी करून घेतला आहे. विजयनगरचे नष्टप्राय साम्राज्य व मोंगलांचें साम्राज्य याच्या संलग्न इतिहासाचाहि डॉ० बाळकृष्ण यांनी उपयोग करून घेतला आहे. शिवाजीचा वंशवृक्षहि बऱ्याच पुराव्यानिशी त्यांनी उजेडांत आणला आहे.

शिवाजी महाराजांच्या प्रशस्त चरित्राविषयीं तर अधिक बोलावयासच नको. या संबंधानें भारत इतिहास संशोधक मंडळानें केलेली कामगिरी ही महनीय आहे. तींत पूर्वोक्त डच सरकारजवळ युरोपांत हेग येथें व डच ईंडीजमध्यें बटेव्हिया येथें असलेल्या कागदपत्रांच्या भाषांतरासहित नकलांमुळें शिवचरित्राच्या अनेक, पूर्णपणें प्रगट न झालेल्या प्रसंगांवर झगझगीत व उज्वल प्रकाश उपरोक्त सामुग्रीनें पडला आहे. हें महनीय शिवचरित्र प्रत्येक इतिहासाचा अभ्यास करण्याचा अभिमान बाळगणारानें अभ्यासिलेंच पाहिजे.



# "सृष्टि व समाज यासंबंधींचे हिंदु तत्त्वज्ञान्यांचे विचार"

("Hindu Philosophers on Evolution.")

लेखक–प्रो. दे. द. वाडेकर, एम्. ए., विलिंग्डन कॉलेज, सांगली.

कै. प्रि. डॉ. बाळकृष्ण यांच्या पहिल्या पुण्यतिथिदिनीं प्रसिद्ध होणाऱ्या त्यांजविषयींच्या स्मारक–ग्रंथात डॉ. बाळकृष्णांच्या वरील विषयावरील प्रसिद्ध ग्रंथाचा परिचयात्मक परामर्श घेणारा लेख लिहिण्यास मला निमंत्रण केल्याबद्दल मी ग्रंथाच्या संपादकांचे मनःपूर्वक आभार मानतों. या त्यांच्या निमंत्रणानें मला स्वतःला त्या (आतां परलोकवासी) विद्वन्मणीबद्दलचा आदर व्यक्त करण्याची संधी मिळाली हें एक; व दुसरें, या निमित्तानें मला उपर्युक्त ग्रंथाचें पुनः एकदा सलग आणि संपूर्ण अध्ययन घडलें. मी अनेक वर्षांपूर्वी कोल्हापुरास राजाराम कॉलेजमध्यें डॉ. बाळकृष्णांच्या हाताखालीं चारपांच वर्षे उपशिक्षक होतों. त्यावेळीं मला डॉ. बाळकृष्णांचा स्फूर्तिदायक सहवास बराच घडला, आणि त्याचवेळीं त्यांचा प्रस्तुतचा ग्रंथ छापला जात असतांना त्याची कांहीं मुद्रितेंही त्यांनी मजकडून तपासून घेतल्यानें या ग्रंथाचा सामान्य परिचयही मला त्याचवेळीं घडला.

डॉ. बाळकृष्णांच्या सहवासांत माझ्या मनावर त्यांच्या अनेक गुणांपैकीं कोणा एका विशेष गुणाचा संस्कार झाला असेल तर तो त्यांच्या अफाट संशोधक विद्वत्तेचा व विद्वत्ता संपादनांतील दांडिक परिश्रम-शीलतेचा. त्यांचें सबंध आयुष्य म्हणजे विद्वत्ता संपादनाच्या एका प्रदीर्घ प्रयत्नाचा अत्यंत स्फूर्तिदायक इतिहास. सहानवशी अर्थशास्त्रविषयक

कुलक्षणी म्हणून दुर्दैवानी जवळ जवळ टाकून दिलेलें हें मूल येवढें आपल्या बुद्धि व उद्योग यांच्या भांडवलावर देशांतील एक अव्वल दर्जाचें विद्वान म्हणून कीर्ति मिळवितें ही कथाच स्फूर्तिदायक आहे डॉ बाळकृष्णांनीं विद्वत्ता संपादनाशिवाय इतरही अनेक उद्योग केले, किंवा पडेल त्या प्रसंगाप्रमाणें ते त्यांस करावे लागले विद्यार्थिदशेंत विद्यार्थ्यांच्या चळवळींचें वक्तृत्व व संघटन यांद्वारां नेतृत्व, कांगडीच्या गुरुकुलाचें प्रमुखत्व, व नंतर कोल्हापुरास राजाराम कॉलेजचें प्रमुखत्व व यांच्या अनुषंगानें प्राप्त होणारी इतर अनेक कर्माधिक महत्त्वाचीं कर्तव्यें यांची काळजी वाहण्यात त्यांचा बराच वेळ खर्च झाला असल्यास नवल नाहीं याशिवाय आपण स्वत अनेक संस्था काढून त्यांचीही धुरा वाहण्याचाही त्यांस विलक्षण हव्यास होता हीही गोष्ट लक्षांत ठेवण्यास हवी (उदाहरणार्थ, कोल्हापूरचा आर्यसमाज व तदन्तर्गत शाळा, छापखाना, वगैरे अनेक संस्था ) परंतु या सर्व कार्यव्यापृतींत डॉ बाळकृष्णांच्या विद्वत्तासंपादनांत, संशोधनांत व आनुषंगिक ग्रंथ लेखनांत केव्हांही खंड पडला नाहीं फार काय, अखेरीकडे त्यांना क्लिष्ट वर्षे दम्याच्या विकारानें अगत जर्जर केलेलें असतांही त्यांच्या विद्वान्याभोंवतीचें पुस्तकें, कागदपत्रें, टाइप-रायटर इत्यादि वस्तूंच्या अजबखान्याचें दर्शन कधींही नाहींसें झालें नाहीं यावरून त्यांचें हृदय व बुद्धि हीं सरस्वत्युपासनेंत जेवढीं एकतानतेनें रमत असत तेवढीं इतरत्र नसत हें अगदीं स्पष्ट दिसत असे डॉ बाळकृष्ण ऋषितुल्य आणि आदर्श विद्वान् खरे!!

त्यांच्या विद्वत्तेची झापड मोठी सखोल, सर्वव्यापी व विशाल (Encyclopaedic) होती विद्यार्थिदशेंत अभ्यासाव्यतिरिक्त इतर अनेक चळवळी करूनही यांचा आपला परीक्षेंत पहिला नंबर आहेच!

पहिल्या 'विशारद' (B A.) पदवी परीक्षेस, त्यांनी भौतिकशास्त्र (रसायन शास्त्र) विषय घेतला; तर दुसऱ्या 'पारगत' (M. A) परिक्षेस अर्थशास्त्र–इतिहास–राजनीतिशास्त्र हे विषय घेतले. गुरुकुलांतील जीवनक्रमांत प्राचीन संस्कृत धार्मिक व तात्त्विक वाङ्मयाचा उत्तम समाचार घेतला. विद्यापीठीय शिक्षणक्रमांत संशोधनातील प्राविण्य हस्तगत केलें. महाराष्ट्रांत स्थाइक झाल्यानंतर 'महाराष्ट्र–इतिहास' प्रसन्न करून घेतला; आणि शेवटीं तर युरोप-अमेरिकेचा प्रवास करून अखिल आणि अनेकांगी मानवी संसाराचें प्रत्यक्षाधिष्ठित पर्यालोचन केलें! अशा तऱ्हेची एकनिष्ठ ज्ञानोपासना फार क्वचित दृष्टोत्पत्तीस येते. निदान कोल्हापुरांत एवढा जाडा विद्वान् पूर्वी तरी कोणी झाला नाहीं; हल्लींही डॉ. बाळकृष्णानंतर कोणी नाहीं; आणि पुढें कधी होईल हें कोणी सांगावें ? असा हा महापंडित गतवर्षी काळानें आमसात् केला हें कोल्हापुरचें मोठें दुर्दैव होय, आणि त्यामुळें कोल्हापुरच्या हितचिंतकांस फार हळहळ वाटल्यास नवल नाहीं.

डॉ. बाळकृष्णांचें कोल्हापुरास येण्यापूर्वीचें चरित्र मुळचेंच उज्ज्वल होतें यांत शंका नाहीं. परंतु ते कोल्हापुरास आल्यानंतरचें त्यांचें चारित्र लोकहितदृष्ट्या अधिक प्रभावी झालें असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. याचें मुख्य कारण कोल्हापुरास त्यांच्या विविध प्रकारच्या योजनांस व कार्यक्रमांस राजसत्तेचा आधार व पाठिंबा मिळाला हें होय. अशा तऱ्हेनें डॉ. बाळकृष्णांच्या कोल्हापुरांतील इतिहासाचें श्रेय तें बीज केल्याबद्दल कोल्हापूर दरबाराबद्दल कृतज्ञताच व्यक्त करावयास पाहिजे.

डॉ. बाळकृष्णांचें कोल्हापुरांतील कार्य सामान्यतः शैक्षणिक व सामाजिक–धार्मिक असे द्विविध स्वरूपाचें होतें. शैक्षणिक बाबींत केवळ राजाराम कॉलेजमधे प्रमाणी शिक्षक व चालक एवढेंच त्यांचें कार्य

नव्हतें. त्यांनीं कोल्हापूर सरकार व जनता यांचे प्रमुख शैक्षणिक सल्लागार म्हणून कोल्हापुरच्या अलीकडील इतिहासांत उल्लेखनीय कामगिरी करून दाखविली आहे. कोल्हापुरात उच्च शिक्षणाच्या दृष्टीनें एक वेळ काळजी करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली होती. परंतु ते दिवस जाऊन आज कोल्हापूर महाराष्ट्रांत जें एक महत्त्वाचें शैक्षणिक केंद्र बनलें आहे त्या अभिनंदनीय परिस्थितीचें श्रेय ज्या थोड्या व्यक्तींस (कै. राजाराम महाराज छत्रपति, दि. ब. अ. बा. लठ्ठे, व रा. ब. दा. शा. सुर्वे) दिलें पाहिजे त्यातच डॉ. बाळकृष्णांचा समावेश इतिहासकाराला केला पाहिजे यांत शंका नाहीं.

खुद्द राजाराम कॉलेजमधील त्यांचें कार्यही कमी महत्त्वाचें नाहीं. आपल्या विषयांचे विद्वान्, प्रभावी व स्फूर्तिदायक शिक्षक म्हणून त्यांच्या कॉलेजात त्यांची बरोबरी करूं शकणारा शिक्षक (एक तत्त्वज्ञानाचे ज्येष्ठ आचार्य सोडले तर) विरळाच! कॉलेजच्या जीवनक्रमांतील असंख्य सभा–वादविवाद–संमेलनप्रसंगीं डॉ. बाळकृष्ण आपल्या स्वभावगुणांनीं खरोखर शब्दशः अग्रेसर म्हणून चमकत असत. व्याख्याता, अध्यक्ष, वादपटु या तिन्हीं दृष्टींनीं त्यांचें सर्वांगीण ज्ञान, वक्तृत्व, नेतृत्व, हजरजबाबीपणा, समयज्ञता, परगुणग्रहण, वादकौशल्य, इत्यादि अनेकविध गुण प्रतीत होत असत. कॉलेजचे प्रमुख या नात्यानेही त्यांजबद्दल विद्यार्थ्यांस व हाताखालील सहशिक्षकांस एक प्रकारचा आदरयुक्त दबदबा वाटत असे. सहशिक्षकांच्या सभेंतील त्यांचें सहकार्य व मार्गदर्शन अत्यंत उपयुक्त असे. अशा एखाद्या सभेंत कॉलेजच्या कचेरींतील कारकुनाकडून काहीं माहिती मागविण्यासाठीं ते शिपायास "ऑफिसपासून विचार" असा इंग्रजीच्या वळणानरील मराठीत हुकूम देत त्यावेळीं मोठी गम्मत वाटे!

डॉ. बाळकृष्णाचें सामाजिक-धार्मिक कार्य हें त्यांनी मुख्यत. कोल्हापुरच्या 'आर्यसमाज' संस्थेद्वारा केलें. या संस्थेचे ते स्वतः श्रेष्ठ वर्णधार असून त्यांनी तिजकरिता साधनें व सहकारी यांचा संचही चांगला जमविला होता. डॉ. बाळकृष्ण हे कट्टे आर्यसमाजी सामाजिक व धार्मिक सुधारक होते. धर्मप्रचार, शुद्धिकार्य, अस्पृश्यता-निवारण, दलित वर्गांच्या मुलांचें विनामूल्य संगोपन व शिक्षण, इत्यादि अनेक प्रकारची कामें या संस्थेकरितां ते अंगावर घेत. आणि या कामाकरितां प्रवास, याचना, प्रवचनें व भाषणें, मुद्रण संस्था, शिक्षण संस्था, वसतिगृह इत्यादि अनेकविध साधनांची त्यांनी योजना व उपयोग केला. हेंही कार्य कोल्हापुरच्या इतिहासात राहील असा विश्वास वाटतो.

डॉ बाळकृष्णाच्या जीवनक्रमाचे असे विविध पैलू होते तरीसुद्धां मला पुन एकदां म्हणावेंसें वाटतें, त्यांच्या उभ्या आयुष्यांत त्यांना एकाच गोष्टीचा ध्यास होता, व ती म्हणजे विद्वत्तासंपादन! आणि त्यांच्या जीवनांत एकाच गोष्टीची वाण होती, आणि ती म्हणजे विश्रांति!! ईश्वर त्यांच्या आत्म्याला आतां तरी पूर्ण विश्रांति व शांति देवो!!!

× × ×

डॉ० बाळकृष्णांचा प्रस्तुत लेखविषय इंग्रजी ग्रंथ 'Hindu Philosophers on Evolution' हा सन १९३४ साली ग्रंथस्वरूपांत प्रसिद्ध झाला, परंतु त्यापूर्वी निदान ३।४ वर्षे तरी तो त्यांजवळ हस्तलिखित स्वरूपांत तयार होता असा माझा अंदाज आहे. सुमारें १९३० च्या सुमारास तो लिहिला गेला असें धरण्यास हरकत नाहीं. हा ग्रंथ डेमी साईजची सुमारें २०० पृष्ठें असून त्यांत दहा प्रकरणें व दोन परिशिष्टें आहेत.

*ग्रथाचें वर्तीवृत नामाभिधान तितकेंसें अन्वर्थक नाहीं.* ग्रथाच्या नांवावरून त्यात "पाश्चात्त्य विज्ञानातील डार्विनचा विकासवाद (Evolutionism) *आमच्या तत्त्वज्ञानीं केव्हाच सशोधिला होता*" अशा (आर्यसमाजी) आशयाचें स्वाभिमानी विवेचन असावें अशी एखाद्या (*निदान आर्यसमाजाच्या विचारसरणीबद्दल कल्पित पूर्वग्रह* असलेल्या) भावी वाचकाची कल्पना झाल्यास त्यात आश्चर्य नाहीं. परतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, या ग्रथात केवळ डार्विनच्या विकासवादी कल्पनेचीं भारतीय तत्त्वज्ञानीं नमूद करून ठेविलेलीं पूर्वसूचितें (Anticipations) एवढाच विषय नाहीं. तर प्राचीन हिंदी वैज्ञानिक, तात्त्विक व धार्मिक वाङ्मयात निर्जीव व सजीव, नैसर्गिक व मानवी, सृष्टीची उभारणी व सघटन यासबधींचे जे अनेकविध व प्राचीन व अर्वाचीन पाश्चात्य वैज्ञानिक–तात्त्विक शोधाशीं पुष्कळसे जुळते म्हणून, *आश्चर्यजनक सिद्धात सापडतात त्याचें वर्गीकृत,* तुलनात्मक व पुराव्यासहित केलेलें विवेचन या ग्रथात सापडतें. (अर्थात हें प्राचीन हिंदी वाङ्मय, तुलनात्मक कालगणनेबाबतचीं कोणतींही मतें स्वीकारलीं तरी प्राचीन पाश्चात्य तात्त्विक–वैज्ञानिक वाङ्मयापेक्षा निश्चित प्राचीनतर आहे हें ऐतिहासिक पुराव्यानिशीं सिद्ध करतां येण्यासारखें असल्यानें, हिंदी व युरोपीय विचारातील हें स्पष्ट साम्य परस्पर उसनवारीनेंच खुलासवारयाचें म्हटलें तरी ती बाजू युरोपीय पक्षपाती विचारवताच्याच गळ्यांत येईल व उसनवारी असलीच तर भारताकडून–अथवा प्राचीकडून युरोपनें–पश्चिमेनें केली असेंच त्यास मान्य करावें लागेल असा अनाग्रही पण स्पष्ट सूर डॉ. बाळकृष्णांच्या या सबध ग्रंथात ठिकठिकाणीं आहे) म्हणून या ग्रथाचें नाव 'Natural and Social Philosophies of the Ancient Hindus' ('सृष्टि

आणि समाज यासंबंधींचें प्राचीन हिंदु तत्त्वज्ञांचे विचार') असें ठेवि-
ल्यास तें जास्त अन्वर्थक होईल असें मला वाटतें. या लेखात या
ग्रंथातील काही महत्त्वाच्या विषयाचें अत्यंत त्रोटक, टीकारहित व केवळ
प्रतिपादनात्मक (ओळखवजा) विवेचन करणेंच शक्य होईल हें उघड
आहे. जिज्ञासु वाचकांनीं हा ग्रंथ शक्य असल्यास मुळांतूनच वाचावा
हें इष्ट होईल.

**प्रकरण १** ('भारताकडे वळा'): या प्रकरणात युरोपियन इति-
हासातील प्राचीनतम देश जो ग्रीस त्या देशातील वैचारिक प्रवाहावर
व पयावर प्राचीनतर हिंदी तात्त्विक व वैज्ञानिक शोधांची छाया पडलेली
कशी दिसते याचें विवेचन करून शेवटीस हिंदी शोधांची एक मोठी
यादीही दिलेली आहे. या यादीच्या अनुरोधानेंच पुढील सबंध
ग्रंथातील विवेचन करण्यात आलेलें आहे.

**प्रकरणें २–८:** यांमध्यें विश्वसृष्टि, व तींतील अजीव–सजीव,
जड–सचेतन वस्तुजाताच्या विकासाबाबतचें प्राचीन हिंदी सिद्धांतांचें
विवेचन, युरोपीय मताशीं तुलनेसह, केलें आहे. आणि **प्रकरणें ९।१०**
यांमध्यें त्याच तऱ्हेचें विवेचन मानवी सृष्टीतील सामाजिक व राजकीय
विकासाबाबत करण्यांत आलें आहे.

**प्रकरण २** ('हिंदी व ग्रीक तत्त्वज्ञानांतील आदितत्त्व'): जगताच्या
आदिकारणाच्या स्वरूपासंबंधीं प्राचीन भारतीयांनीं ज्या कल्पना केलेल्या
त्या सर्वांस अगदी समांतर अशा कल्पना प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञांनीही
केलेल्या आढळतात. उदाहरणार्थ अथर्ववेद, मैत्र्युपनिषद् अथवा
शांतिपर्व यांमधील 'कालतत्त्व' हेंच विश्वाचें आदिकारण ही कल्पना
पारशी, फिनिशियन अथवा ग्रीक वाङ्मयांत ('क्रोनॉस') सांपडते.
वैदिक 'तमस्' किंवा पौराणिक 'रजनी' हें आदिकारण ही कल्पनाही

होमरच्या व इतर ग्रीक वाङ्मयात सापडले. तसेंच भारतीय वैदिक, औपनिषद्, व इतर वाङ्मयातील 'आकाश' (Ether), 'वायु' (Air), 'तेजस्' (Fire), 'अप्' (Water), 'पृथिवी' (Earth), ही महाभूतें (एकएकटीं) जगताचें आदिकारण असल्याची कल्पनाही फिरोक्रॅटिस् (Ether), ॲनॉक्झिमेनीस (Air), हेरॅक्लिटस् (Fire), थेलिस् (Water), झेनोफेनिस् (Earth), या ग्रीक तत्त्वज्ञानात सापडतात. सांख्याची 'पुरुष' कल्पना अनॅक्झॅगोरसच्या 'नाउस' (Nous) या कल्पनेशीं समरूप आहे. उपनिषदातील 'आत्म'-तत्त्वाचीही ग्रीक आवृत्ति शोधता येईल. 'स्वभावविकासा'ची कल्पना (Spontaneous Evolution) दोहींकडे आढळते. फार काय, कांटची 'Nebular Theory' मृगुऋषींनीं मांडली आहे. आणि मन हें जड-द्रव्योत्पन्न असल्याची कल्पना सांख्य, चार्वाक अगर सुश्रुतामध्यें सापडेल. 'Emanation Theory' ही भारतीयाना उपनिषदानीं सांगितली होती.

प्रकरण ३ ('उपनिषदांतील सांख्यकल्पना'): भारतीयांच्या सृष्टि-विषयक तत्त्वज्ञानाच्या (Philosophy of Nature) दृष्टीनें 'सांख्य दर्शन' हें अत्यंत प्राचीन व अग्रेसर शास्त्र होय. या दर्शनातील सर्व महत्त्वाच्या कल्पना औपनिषद् वाङ्मयात पूर्वसूचित झालेल्या सापडतात.

प्रकरण ४ ('जीव व मूळ द्रव्य यांचें अनाद्यनन्तत्व'): सृष्टीच्या बुडाशी असलेलीं अनाद्यनन्त अशीं सांख्य तत्त्वें, पुरुष व प्रकृति, जीव आणि मूळ जड द्रव्य (Life and Matter) यांचा विचार या प्रकरणात तौलनिक दृष्टीनें चर्चिला आहे. पुरुषाचें अनेकत्व, प्रकृतीचें आदि-कारणत्व, सत्कार्यवाद (Ex nihilo nihil fit), सत् (Being or Plenum), असत् (Non-Being), अणुवाद (Atomism), इत्यादि समरूप कल्पना दोन्ही तात्त्विक वाङ्मयांत सांपडतात.

प्रकरण ५ ('चेतनास्वरूप प्रकृति') : सत्व, रज, तम हे त्रिगुण मूळतत्त्व प्रकृतीचीं केवळ लक्षणें नसून प्रत्यक्ष घटकच होत. त्रिगुणांची साम्यावस्था (Equilibrium) म्हणजेच विश्वाचें विकासपूर्व आदिकारण. या त्रिगुणात्मक प्रकृति किंवा प्रधानतत्त्वाच्या साम्यावस्थेंत विक्षोभ म्हणजे बिघाड होऊन जग व तदंतर्गत वस्तुजात याचा विकास होतो व त्याचे उत्पत्ति–स्थिति–लयाचा देखावा उत्पन्न होतो. हा विकास अगर देखावा म्हणजे सत्व–रज–तम (प्रीति–अप्रीति विषाद) या त्रिगुणांच्या क्रिया–प्रतिक्रियेचा, आकर्षण–विकर्षणाचा खेळ होय. जड आणि अजड यात अंतिम भेद नाही. आणि कार्यापासून कारणस्वरूपाचें अनुमान करावयाचें तर प्रकृतीचें खरें स्वरूप अतिजड, किंबहुना चेतनिक (Energy) समजलें पाहिजे. या मूळ चेतनाशक्तीपासून पुढें जडाजड वस्तुजाताचा व विविध चेतनाशक्तींचा विकास व्हावयाचा. जगतातील या विविध चेतनाशक्ती या परस्पर रूपांतरक्षम (interconvertible) असून सृष्टींत त्यांचा विनिमय सतत चालू असतो. त्या चेतनाशक्तींचा विश्वातील एकंदर निधि स्थिर आहे (Conservation of Energy) असेंही मानलें पाहिजे. सांख्य दर्शनातील हे विचार अर्वाचीन पाश्चात्य विज्ञानातही थोड्याफार भेदानें सांपडतात.

प्रकरण ६ ('विश्वविकास') : सांख्यांचा द्वैती 'प्रकृतिवाद' (त्यांचें 'पुरुषतत्त्व' अकर्ता असल्यानें) हा स्थोगर पाहता हैकेलच्या प्रसिद्ध 'जडाद्वैतवादा'शी समकक्ष आहे. या (त्रिगुणात्मक) प्रकृतीपासूनच कोणत्याही अति–नैसर्गिक अथवा ईश्वरी करणीशिवाय, केवळ स्वभावतः सर्व जडाजड वस्तुजाताचा विकास होत असतो. हा विकास महत् किंवा बुद्धि, अहंकार, अंतःकरण अथवा अस्मिता, मन,

पंच ज्ञानेंद्रियें, पच कर्मेंद्रियें, पच तन्मात्रें, पंच महाभूतें, व शेवटीं वस्तुजात अशा क्रमाचा व स्वरूपाचा असून या प्रक्रियेचें व तींतील तत्त्वांचें सांख्य व इतर तत्सम प्रथातील निरुपण पाहिल्यास त्यांत पुष्कळच अर्वाचीन पाश्चात्य विज्ञानातील कल्पना सांपडतात. किंबहुना, कणाद ऋषींनीं आइन्स्टाइनची 'दिक्काला'ची (Space–Time) संयुक्त कल्पना पूर्वसूचित केली होती, तर कपिलऋषींनीं हेकेलची 'चिदणु' (Live Atoms) ची कल्पना मांडली होती; आणि सांख्याची लिंग शरीराची कल्पनाही ऑलिव्हर लॉजच्या व्यक्तित्वाच्या (Personality) कल्पनेचेंच पूर्वसूचन आहे.

प्रकरण ७ ('जीवसृष्टिविकास'): 'अलिंग जीवोत्पत्ती'ची *(Asexual generation)* कल्पना जशी ग्रीक व इतर प्राचीन युरोपीय वाङ्मयात सांपडते तशी सुश्रुतादि प्राचीन हिंदी ग्रंथातही सांपडते. तसेंच, 'जीव जीवोत्पत्ति' (Biogenesis) व 'अजीव जीवोत्पत्ति' (Abiogenesis) याही कल्पना दोन्हींकडे सांपडतात. किंबहुना, केल्व्हिनची इतर ग्रहावरून जीवाच्या पृथ्वीवरील आगमनाची कल्पना महानारायण उपनिषदात सांपडते. हिंदु तत्त्वज्ञानांत 'संसारा'च्या (Transmigration or Metempsychosis) कल्पनेचें महत्त्व विशेष असून तीप्रमाणें जीवात्मा हा असंख्य जीवयोनींतून प्रवास करून शेवटीं उच्चतम अशा मानवी योनींत येतो अशी उपपत्ति आहे. किंबहुना, अतिमानव योनीची शक्यता हेकेलप्रमाणेंच कपिलऋषींसही मान्य आहे आणि बृहद्विष्णु पुराणातील या योनींचें वर्गीकरण व क्रम पाहिल्यास त्याच्या कर्त्यास डार्विनचा पूर्वसूरि म्हटलें पाहिजे. परंतु हिंदु वैज्ञानिकांस भौतिक इतर परिस्थितीनुरूप प्राणिशरीरात होणारें परिवर्तन मान्य असलें तरी डार्विनची प्राण्याच्या 'जात्यंतरा'ची

('Transmutation of species') कल्पना त्यांस मान्य नसून प्राणिजातींचें स्थिरत्वच (Fixity of species) त्यांनीं प्रतिपादिलें आहे. परंतु डार्विनची कल्पनाही अलीकडील 'स्वपरोत्पत्ती' च्या (Heterogenesis) कल्पनेमुळें मागें पडत चाललेली नाहीं काय? आणि या नवीन कल्पनेंत जीवसृष्टिविकासांत कांहीं तरी गूढ अतिजीव अशा चोदक शक्तीस स्थान द्यावें लागतें.

**प्रकरण ८** ('प्राचीन हिंदु शास्त्रांतील प्राणिविकासासंबंधीं अर्वाचीन कल्पना'): प्राणिविकासांत वंश, परिस्थिति व जीवनक्रम यांचें महत्त्व हिंदु शास्त्रांत मान्य करण्यांत आलें आहे. वाईस्मानच्या संपादित गुणानितरणा-संबंधींच्या (Inheritance of Acquired Characters) सिद्धान्तांचें विवेचनही सुश्रुतांत सांपडतें. गर्भोत्पत्ति व गर्भविकास यासंबंधींच्या हिंदु कल्पना उल्लेखनीय आहेत. भावी अपत्याचें लिंग व वर्ण यांचें नियंत्रण करणारे घटक निश्चित करतां येतात. अन्नाच्या व प्रादेशिक हवामानाच्या मनुष्याच्या शारीरिक व मानसिक प्रकृतीवरील परिणामाचें व सुप्रजननशास्त्र व वंशसुधारणाशास्त्र यासंबंधींचेंही हिंदु शास्त्रज्ञांचें संशोधन या बाबतीं-तील पाश्चात्य संशोधनाशीं तुलनीय असेंच आहे. हिंदूंच्या 'संसार' कल्पनेंतील 'पूर्वजन्म संस्कारा'च्या उपकल्पनेचेंही प्राणिजीवनविवेचनांत साहाय्य घ्यावें लागतें हें इतकें, मॅक्समुल्लर सारखे अर्वाचीन पाश्चात्य वैज्ञानिक मान्य करूं लागले आहेत.

**प्रकरण ९** ('समाजविकासविषयक हिंदु उपपत्ति'): हिंदु पुरा-णांत वर्णिलेल्या मानवी समाजविकासांतील स्थूल अवस्था या अर्वाचीन विकासवाद्यांनी व मानवशास्त्रज्ञांनीं वर्णिलेल्या अवस्थांशीं बऱ्याच जुळतात हें निरूपण असलें तरी सत्य आहे. मात्र विकासाची हिंदु कल्पना अर्वाचीनांप्रमाणें सतत प्रगतीच्या स्वरूपाची नसून प्रगति स्थिति-परागती-

स्वरूपाची, चक्रनेमिक्रम स्वरूपाची किंवा आवर्तनी (Cyclic) स्वरूपाची आहे. आणि विकासाचें प्रत्येक आवर्तन अनुवृत्त (Parabola) या आकृतीनें चित्रित करतां येईल. प्रत्येक आवर्तनाचे चार खंड पडतात. कृतयुग (सत्य किंवा सुवर्णयुग), त्रेतायुग (रौप्ययुग), द्वापरयुग (पित्तळ युग), आणि कलियुग (लोहयुग). या चारी खंडांतील व्यक्ति आणि समाज यांचे स्थूल, परंतु विशिष्ट, उल्लेखनीय आणि समान गुणविशेष असतात: कृत युगातील व्यक्ति आणि समाज निसर्गावस्थेत काम, क्रोध, लोभ, मत्सर इत्यादि मनोविकारांपासून मुक्त असून, मालमत्ता, सरकार, किंबहुना विवाह यासी संस्था या अवस्थेत असून अस्तित्वांत आलेल्या नसतात. त्रेतायुगात त्यावर मनोविकारांचा ताबा सुरूं होतो व मालमत्ता ही संस्थाही अस्तित्वात येते. द्वापर युगांत लोभादि मनोविकारांमुळें परस्पर कलह होऊन त्यातून राजकीय व वैध संघटना उत्पन्न होते व कृषि विद्याही उदयास येते. शेवटीं कलियुगांत मानवी विद्या व कला भौतिक सुधारणाचा उच्चांक गाठतात, परंतु त्याचवेळीं मानवी नीतीचा ऱ्हासही होतो. अशा तऱ्हेनें प्रत्येक आवर्तनांत नैतिक संस्कृति व भौतिक सुधारणा यांचा व्यस्त प्रमाणात विकास होत असतो. ग्रीक कवि हीसिअड व तत्वज्ञ प्लेटो यांनींही अशाच तऱ्हेच्या कल्पना वर्णिलेल्या आहेत. किंबहुना, या कल्पना सामान्यपणें हिंदु, इजिप्शियन, यहूदी, पारशी, ग्रीक व रोमन या सर्वांच्याच प्राचीन ग्रंथांत आढळतात. परंतु हिंदूंनी या त्यांच्या समाजविकासविषयक उपपत्तींसंबंधांत उसनवारी केलेली दिसत नाहीं.

**प्रकरण १०** ('राज्यविकासविषयक हिंदु उपपत्ति') : पाश्चात्य तत्वज्ञांनीं राज्यविकासासंबंधीं प्रति[illegible]लेल्या बहुतेक उपपत्ती प्राचीन हिंदु पूर्वसूरींनी पूर्वसूचित [illegible] [illegible]. (१) प्राथमिक मानव समाजाची मूळ राज्यपूर्व अवस्था काय होती [illegible] आणि (२) या अवस्थेंतून त्यास राजकीय

अवस्था कोणत्या कारणामुळें प्राप्त झाली? या दोन्ही राजनीतिशास्त्रांतील प्रश्नांस भारतीय तत्त्वज्ञानी उत्तररूप उपपत्ति सुचविलेल्या आहेत. (१) (अ) राज्यपूर्व काळात प्राथमिक मानवसमाज हा सुवर्णयुगातल्याप्रमाणें सद्गुणसंपन्न होता; व म्हणून त्यास राज्यसंस्थेची आवश्यकता नव्हती. परंतु नंतर ही सुस्थिति मावळून समाज दुर्गुणी बनल्यामुळें रक्षणासाठीं राज्यसंस्थेची आवश्यकता उत्पन्न झाली व ती देवाच्या विनंतीवरून महादेवानें उत्पन्न केली. अशी राज्यसंस्थेची उपपत्ति भीष्मादिकांनी प्रतिपादिली आहे. प्लेटोचे विचार त्याशीं तुलनीय आहेत. या उपपत्तीप्रमाणें राज्यसंस्था ही एक आवश्यक परंतु अनिष्ट गोष्ट आहे. (आ) उलट-पक्षीं राज्यपूर्व काळात प्राथमिक मानवसमाज हा अराजक युद्धावस्थेंत होता व त्यात मत्स्य न्यायाचेंच प्राबल्य होतें व या स्थितीतून संरक्षणा-साठीं म्हणून राज्यसंस्था उत्पन्न झाली हा हॉब्स व रूसो यांचा सिद्धांतही रामायण व महाभारत या व इतरही ग्रंथात सापडतो. या उपपत्तीप्रमाणें राज्यसंस्था ही एक हितकर अशीच संस्था आहे. (२) (अ) ही राज्यसंस्था परमेश्वरानें उत्पन्न केली असून राजपुरुष हा ईश्वरी पुरुष असतो असा सिद्धांतही दोन्ही तत्त्वज्ञानांत सापडतो. याच सिद्धांतावरून राजपुरुषाचे ईश्वरी अधिकार, श्रेष्ठ व अप्रतिहत्य म्हणजेच अनुत्तरदायी प्रभुत्व, व अप्रमादित्व व अदंड्यत्व या कल्पना उत्पन्न होतात; परंतु भारतीय विचारवंतांनी या कल्पनांस अमर्याद वाव दिलेला नाही. प्रशासनविधि म्हणजे कायदा हा राजपुरुषापेक्षां श्रेष्ठ असून राजा हा ईश्वरास व प्रजेस त्यांचा दास म्हणून उत्तरदायी असतो, व त्याच्या अपराधाबद्दल प्रजेस इष्ट तर त्याविरुद्ध बंड करून त्यास पदच्युत करण्याचाही अधिकार आहे. किंबहुना हिंदु राज्यशास्त्रांत धर्माधीन अगर सनदशीर राजाचेंच प्रशासन येतें असून राजपुरुषाच्या ईश्वरी अधिकारापेक्षां ईश्वरी वर्चस्वाचीच महती विस्तराने वर्णिली आहे.

(आ) राज्यसंस्था ही मानवाच्या समाजशील प्रवृत्तींतून सहजिकरणेंच उत्पन्न होते. म्हणजे समाज अस्तित्वांत आला की त्याच्या संरक्षणाकरितां आवश्यक संघटन म्हणून त्यांतून राज्य स्वभावतःच अस्तित्वांत येतें, हें राज्यसंस्थेचें ॲरिस्टॉटलचें विवरणही वेदांतील राजन्य किंवा विराज् या कल्पनांच्या वर्णनाशीं तुलनीय आहे. (इ) समाजाच्या प्राथमिक अराजक दुरवस्थेंतून राज्यसंस्था जी उत्पन्न झाली तिचें कारण मात्र प्रशासक व्यक्ती व प्रशासित प्रजा यांच्यामधील समय किंवा करार हा होय ही भीष्म आणि चाणक्य यांची कल्पना रूसोच्या प्रसिद्ध करार उपपत्तीशीं (Contract theory) बरीच समरूप आहे.

शेवटीं दिलेल्या दोन परिशिष्टांपैकीं 'समूळप्राणी' या शीर्षकाच्या पहिल्या परिशिष्टांत वनस्पतिजीवनांत प्राणिजीवनाचीं सर्व लक्षणें सांपडत असल्याबद्दलचे प्राचीन हिंदु वैज्ञानिकांनीं शोधिलेले सिद्धांत असें विवेचन आहे आणि अलीकडे जगदीशचंद्र बोसांच्या संशोधनानें प्रयोग सिद्ध केलेले आहेत.

'जगत्कालविषयक हिंदु कल्पना' या शीर्षकाच्या दुसऱ्या परिशिष्टांत विश्वोत्पत्तिकालासंबंधींच्या प्राचीन हिंदु कल्पना या अर्वाचीन पाश्चात्य ज्योतिःशास्त्राच्या तत्संबंधीं कल्पनांशीं कशा तुलनीय आहेत हें दर्शविलें आहे.

डॉ. बाळकृष्णाच्या प्रस्तुत लेखविषय प्रबंधांतील संशोधनाचें एकंदर स्वरूप वरील सारांशावरून वाचकांच्या ध्यानांत येईल असें वाटतें. तें तपासून पाहण्याचें हें स्थळ नाहीं, व तें काम करण्यास प्रस्तुत लेखकाची लायकीही नाहीं. परंतु हें सर्व संशोधन करण्यास डॉ. बाळकृष्ण यांस किती दीर्घ बौद्धिक परिश्रम करावे लागले असतील याची कल्पना मात्र या प्रबंधाच्या वाचनावरून कोणासहि करता येईल. या प्रबंधाच्या रचनाकरितां त्यांनीं उपयोजिलेल्या संदर्भ ग्रंथांची केवळ यादीच पाहिली

तर तिचा विस्तार व तींतील विषयांचें वैविध्य पाहून डॉ. बाळकृष्णाच्या बौद्धिक करामतींचें सानंद आश्चर्य व कौतुक वाटलें.

डॉ. बाळकृष्णाच्या या प्रयत्नांत प्राचीन हिंदु ऋषींनीं कित्येक अर्वाचीन शास्त्रीय व तात्त्विक सिद्धान्तांचें आश्चर्यकारक पूर्वसूचन केलें यासंबंधीची त्यांची सादर अभिमानाची भूमिका ठिकठिकाणीं दिसते असें यापूर्वीच म्हटलें आहे. परंतु हा अभिमान अंधश्रद्धेवर किंवा केवळ भावनेवर अधिष्ठित झालेला नाहीं, हें डॉ. बाळकृष्णांनीं, त्यांनी स्वतः केलेल्या प्रत्येक विधानाला जो सरसकट पुराव्याचा आधार दिला आहे तो पाहिला म्हणजे स्पष्टपणें समजून येतें. शिवाय हिंदु ऋषींनीं प्राचीन काळीं हे जे आश्चर्यकारक शोध लाविले त्यांच्या बळावर केवळ 'वडिलांची कीर्ति' गाइली अगर त्याचा अभिमान बाळगला म्हणजे आपलें कर्तव्य संपलें असेंही डॉ. बाळकृष्ण समजत नाहींत हें लक्ष्यात घेतलें पाहिजे. डॉ. बाळकृष्ण म्हणतात —

"We should remember the fact that the Rishis spoke of the truth as I and you see it, not as this or that saint realized it or as Gautama or Kanada saw it. No doubt, strong light has, in ancient India, been thrown upon many problems of life and death, and our ancestors made wonderful discoveries in many fields of human activity. Still it does not follow that we cannot improve upon their achievements in the regions of science, art, religion, thought and philosophy. We can and must add to the intellectual wealth of our forefathers. If we are satisfied to live upon the inherited patrimony, fame and prestige of our hoary ancestors, we shall soon be bankrupts. Our intellectual bankruptcy like the age-long intellectual sterility of the Hindu society,

will mean senility, decay, death. We must throw off the spirit of intellectual passivity, inactivity, bondage. We must welcome all kinds of bonafide opinions on the Vedas, Brahmanas, and Shastras. Then and only then we will strike at the root of hypocrisy or intellectual slavery, and draw men of intellect for research work. The signs of atrophy and inanition will then give way to those of full-grown life and vigour, and in the time to come the Hindus may again be at the climax of evolution."

या उताऱ्यावरून प्राचीन हिंदु ऋषींचे वंशज जे आम्ही आजचे हिंदी लोक त्यांचें प्रस्तुत कर्तव्य काय आहे याबद्दलची डॉ. बाळकृष्ण यांची कल्पना स्पष्ट होत आहे. केवळ पूर्वसूरींच्या सिद्धांत शोधाची स्तुति गाऊन आपली धडगत लागणार नाहीं. तर त्याच्याही पुढें जाऊन व विद्या, कला, शास्त्रें, तत्त्वज्ञान व धर्म यांच्या आपल्या पूर्वजप्राप्त परंपरागत संपत्तींत अधिकाधिक सुधारणा करून, आपण तींत नवीन भरही घातली पाहिजे असाच डॉ. बाळकृष्णाचा स्पष्ट संदेश या ग्रंथांत त्यांनी आपणास दिला आहे यांत शंका नाहीं !

डॉ. बाळकृष्णास काहीं कामासाठीं भेटण्यास त्यांच्या मृत्यूपूर्वी थोडेच दिवस मी त्यांच्या बंगल्यावर गेलों होतों. क्षेमसमाचार व कामासंबंधींचें बोलणें संपल्यावरोबर त्यांनीं माझ्या वाचनलेखनाची चौकशी केली! त्यावेळीं त्यांचा निरोप घेतांना हा उंचापुरा, मूळचा धिप्पाड परंतु कर्कव्याधीनें दिवसेंदिवस कृश होत चाललेला, रुंद जबड्याचा, दैवीचे वण तोंडावर असलेला, उंच व पातळ नाकाचा, सांवळ्या वर्णाचा, पंजाबी लाला मला पुन्हा दिसणार नाहीं अशी कल्पना मला कशी असणार ? मानवी जीवित भंगुर खरें !

# कै० डॉ. बाळकृष्ण यांचं वक्तृत्व

लेखक:—प्रो. ना. सी. फडके, एम्. ए., राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

मला नक्की वर्ष आठवत नाहीं, परंतु बहुधा १९२८ सालची ती गोष्ट असावी. आमच्या राजाराम कॉलेजच्या वार्षिक संमेलनाच्या वेळीं बळवंत संगीत नाटक मंडळीचा गडकरीकृत 'राजसंन्यास' या नाटकाचा प्रयोग करविण्यांत आला. अर्धा प्रयोग झाल्यावर मधल्या विश्रांतीनंतर प्रयोग पुढें सुरू होण्यापूर्वी नाटक मंडळीचे आभार मानण्यासाठीं डॉ. बाळकृष्ण रंगभूमीवर आले. त्यांनीं प्रयोग दिल्याबद्दल मंडळीस धन्यवाद दिले, आणि मंडळींतील नटांचा अभिनय व गायन यांची प्रशंसा करतां करतां गडकऱ्यांनीं ज्या ऐतिहासिक प्रसंगावर नाट्यरचना केली त्याविषयीं ते सहज उल्लेखानं म्हणून जों बोलूं लागले तों त्याच्या ठिकाणची जातिवंत वक्त्याची प्रतिभा एकदम उचंबळून आली, व नंतर जवळ जवळ वीस मिनिटं ते संभाजी राजाच्या थोरवीबद्दल अशा कांहीं आवेशानं आणि तादात्म्यानं बोलत राहिले कीं, आपण कांहीं वेळापूर्वी एक नाट्यप्रयोग पहात होतों याचं भानच प्रेक्षकांना राहिलं नाहीं!

डॉ. बाळकृष्ण यांचं जाहीर व्याख्यान मी प्रथम ऐकलं तें तेंच. ते स्टेजवरून खालीं उतरून परत आमच्यांत आपल्या जागेवर आले तेव्हां मला राहवेना. त्यांचा हात दोन्ही हातांत घेऊन मी एकदम म्हटलं, "Doctor, Congratulations! Yours was a marvellous speech!"

त्यांच्या डोळ्यांत त्या क्षणीं विलक्षण तेज चमकत होतें, आणि भाषण करतांना अंगांत संचारलेला आवेश अजूनही पुरता ओसरला नसल्यामुळें त्यांचा हात थरथर कांपत होता.

× × × ×

या प्रसंगानतर त्याचीं बरीच भाषणं ऐकण्याची संधी मला मिळाली; व प्रत्येक वेळी त्यांच्या ठिकाणचा वक्तृत्वाचा गुण माझ्या प्रत्ययाला आला.

इंग्रजी भाषेवर त्याच प्रभुत्व होतं असं म्हणतां येणार नाहीं. भाषेच्या शुद्धतेच्या दृष्टीनं त्याच्या बोलण्यांत पुष्कळ प्रमाद होत असत. वाक्य-रचनेकडे त्याच दुर्लक्ष होत असे, त्याचे उच्चार बरेचसे अशुद्ध व कर्णकर्कश असत, आणि एकंदरींत इग्रजी भाषेचा त्याच्या वक्तृत्वशक्तीला अडथळाच होत असे तथापि ते अडथळे फोडून तोडून पुढें जाणाऱ्या त्याच्या वक्तृत्वाचा ओघ पाहिल की तो प्रचड असल्याची कसुली द्यावीच लागे. इग्रजीपेक्षा त्याच हिंदींतल वक्तृत्व अधिक श्रवणीय व श्रोत्याच्या वृत्ती थराऊन टाकण्यासारख होत असे.

× × ×

त्याच्या स्वभावातच विनोदाची बाजू कमी असल्यामुळें त्या गुणाचा विलास त्याच्या भाषणात क्वचितच प्रत्ययाला येई. इतकच नव्हे तर ते एखादे वेळीं जी कोटी करत ती अगदीं सामान्य दर्जाची असे, व तिच्या-मुळें मार्मिक श्रोत्याला रसभग झाल्यासारखच वाटे.

तथापि, जन्मसिद्ध वक्त्याचे कितीतरी गुण डॉ. बाळकृष्ण याच्या ठिकाणीं होते.

एक तर सभेवर एकदम छाप पडावी अशी शरीरयष्टीची देणगी त्याना होती. ते उणेपुरे उंच होते, व त्याची ठेवण जरी सडपातळच होती तरी व्यासपीठावर उभी राहिलेली त्याची आकृति पाहाताच श्रोत्याचीं मनं जिंकलीं जात असत. भाषणास प्रारंभ करण्यापूर्वी ते श्रोत्याकडे प्रसन्न मुद्रेनं पाहात असत, व नंतरही भाषणाच्या ओघात उद्भवणाऱ्या भावनानुसार त्याची मुद्रा बदलत असे. बहुतेक वेळ ते आपले हात मागे पाठीवर धरून दोन्ही पंजे एकमेकात गुनफून धरीत असत. एखादेंच वेळीं ते

हात वर करून अभिनय करीत असत. परंतु भाषण करताना सरळ ताठ उभे राहून व छाती उन्नत करून एखाद्या वीराला शोभेल असा पवित्रा ते ठेवीत, व त्याचा परिणाम श्रोत्यांवर झाल्यावाचून राहात नसे.

अगदीं उत्कृष्ट वक्त्याच्या अंगीं आवाजाची जी चढउतार असावी लागते ती त्यांच्या भाषणात आढळत नसे, किंवा शब्दोच्चारात आर्जव अगर माधुर्य आणण्याचा ते प्रयत्न करीत नसत. तथापि, त्यांना आवाजाची देणगी निसर्गानें दिली होती एवढी खास. मैदानी वक्त्याला आवश्यक अशी त्यांच्या आवाजाची झेंप होती. ते भाषण करावयास उठले कीं, पहिले "Ladies and Gentlemen" हे शब्दच सहज सभास्थानाच्या सीमेपर्यंत पोंचत असत व शांतता निर्माण होत असे. दम्याच्या व्यथेनें जन्मभर त्यांचें शत्रुत्व केलें, व अखेर तिनेंच त्यांचा बळी घेतला. परंतु तिनें त्यांच्यावर एक उपकार केला तो हा कीं, त्यांच्या जन्माच्याच पल्लेदार आवाजाला त्या व्यथेमुळें एक प्रकारची 'गाज' आली. वाजाच्या पेटीवर सगळ्यांत खालचें सप्तक वाजवितांना जो एक गर्जेचा आवाज ऐकूं येतो तसा त्यांच्या बोलण्यांत ऐकूं येई, आणि त्यांचा प्रत्येक शब्द धीरगंभीर वाटे.

× × × ×

या बाह्यगुणांत त्यांच्या अंतरंगाच्या ज्या गुणाची भर पडल्यामुळें त्यांचे वक्तृत्व प्रभावी ठरत असे तो गुण अर्धा बुद्धीचा आणि अर्धा त्यांच्या भावनेचा म्हणावा लागेल.

बुद्धीचा गुण हा कीं त्यांचा व्यासंग दांडगा होता, व कोणत्याही विषयांवरील त्यांची उपस्थिति श्रोत्यांना पटावी अशी त्यांची स्मरणशक्ति सतेज व ताजी होती. इतिहास व अर्थशास्त्र हे तर त्यांचे आवडते विषय होतेच, परंतु यांशिवाय वैदिक वाङ्मय, तुलनात्मक भाषाध्ययन, समाजरचनाशास्त्र, धर्मशास्त्र, राज्यशास्त्र इत्यादि विषयांचें त्यांचें वाचन विस्तृत आणि चिकित्सक

होत त्यामुळें त्यांच्या कोणत्याही भाषणाला जाज्वल्य निष्ठेची बैठक असे.

त्यांच्या भाषणाचा गुण हा कीं त्यांचा राष्ट्राभिमान अत्यंत जागृत होता व स्वदेशाच्या कल्याणाची तीक्ष्ण कळकळ त्यांच्या ठिकाणीं होती विशेषत मराठ्यांचा इतिहास, मराठ्यांचे पराक्रम, मराठ्यांचा देश, आणि मराठ्यांचे भवितव्य यांबद्दलची त्यांची निष्ठा आणि तळमळ अतिशय प्रखर होती, आणि त्यांच्या कोणत्याही भाषणांत एखादी विद्युल्लता मधुनमधून चमकावी त्याप्रमाणे ती पुन पुन्हा आपले तेजस्वी स्वरूप प्रगट करीत असे!

शिवाजीसारखा थोर पुरुष जगात दुसरा झाला नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती, व ती श्रद्धा ते एखाद्या भूषणाप्रमाणें मिरवीत असत शिवाजीबद्दल लिहिताना अगर बोलताना ते सारा संयम झुगारून देत असत १९३५ च्या जून महिन्यात पुण्यास इतिहास–शिक्षणाची जी परिषद भरली होती तिच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना ते म्हणाले,

"History is not impartial, but behind it sits the judge who sees, shapes facts, and decides History is always written with an element of bias National, international, religious, social, political prejudices and interests find their way into its pages The history of the British rule in India written by an Imperialist and by a Congressite would be like poles apart in their view points The history of the Treaty of Versailles, taught in French and German Schools would illustrate the point in abundant measure Real history is not a chronicle or a narrative, and the historian is not a mere tale-teller or a biographer, but a recorder, thinker, and philosopher rolled into one!

× × × ×

हिंदुस्थान देशाच्या सांस्कृतिक उन्नतेविषयीं त्यांना अभिमानच नव्हे तर विलक्षण गर्व होता. हिंदूंचा आर्यधर्म हा तात्त्विक दृष्ट्या पराकोटीचा धर्म असून ख्रिस्ती, महंमदी आणि बुद्ध धर्म म्हणजे आर्यधर्माच्या गंगेतूनच निघालेल्या उपनद्या होत असें त्यांना वाटे; आणि धर्म व संस्कृतीच्या दृष्टीनें हिंदुस्थान देशच जगाच्या गुरुस्थानीं आजपर्यंत होता व पुढेंही राहिला पाहिजे अशी त्यांची खात्री होती. अमेरिकेंतल्या सर्वधर्मपरिषदेस ते १९३४ सालीं गेले, तेव्हां परिषदेपुढील मुख्य भाषणाचा प्रारंभ त्यांनीं केला तो असा कीं,

"The Indo-Aryans have been the colonizers and civilizers of the world,"

आणि त्या भाषणाचा समारोप त्यांनीं पुढील शब्दांत केला,

"India has been the spiritual pastor of the world in the past and it is to be a spiritual guide in the future. Let us create living founts from which the immortal waters of Vedic spirituality will flow forever to quench the intellectual thirst of the American people!"

× × × ×

दुसऱ्याच्या वक्तृत्वाचें कौतुक करण्यास ते नेहमीं तयार असत. मला ते पुष्कळदां म्हणत, "I wish I had your artistry and your sweetness". मी त्यांना म्हणे, "I wish I had your voice—even your Asthma.". कॉलेजांत होणाऱ्या पाहुण्यांच्या व्याख्यानांना ते हजर राहिले नाहींत असें क्वचितच घडे, असेल. स्वतःच्या व्याख्यानांसाठीं व इतरांच्या व्याख्यानांना अध्यक्ष म्हणून त्यांचा पंधरा मिनीं केलें यांचें अस्त्र पाचा हिशोब केला तर पर्वती चगाचा लागेल. वक्तृत्वाची देणगी त्यांना रास्त्र होती व इतरांच्या देणगीचा ते सन्मान करीत असत.

जाहीर सभेंत भाषण करण्याची त्याना मनापासून हौस असे, आणि आपल्या अभ्यासाचा व अवलोकनाचा फायदा व्याख्यानद्वारा लोकाना द्यावयास ते सदा उत्सुक असत १९३४ ३५ साळची युरप अमेरिकेची आपली सफर संपवून ते परत कोल्हापुरला आले तेव्हा लगेच त्यानीं इथें दोन व्याख्यानमाला गुंफल्या एकींत अमेरिकेचे प्रेसिडेंट रूझवेल्ट, इटालियन फाशिस्ट पंथाचे प्रवर्तक मुसोलिनी, व तुर्कस्थानचे उद्धारक मुस्तफा कमालपाशा याच्या प्रभावी राजकारणाचे त्यानीं विवेचन केले; आणि दुसरींत हिटलर व हिटलरिझम, नाझी जर्मनी, जर्मनींतील तरुणांची चळवळ व निःशस्त्रीकरण, असे विषय घेऊन जर्मनीचे पुनरुत्थान घडवून आणण्यासाठीं हिटलर कसकसा विराट पराक्रम करीत आहे त्याचे यथातथ्य चित्र त्यानीं रंगविले

हीं सर्व व्याख्यानें अतिशय उद्बोधक व प्रक्षोभक अशीं झालीं. व्हर्सायच्या तहामुळें जर्मनीवर दोस्त राष्ट्रांनीं केवढा अन्याय केला होता, व त्यातूनही जर्मनराष्ट्र कोणत्या कराराने डोके वर काढीत होते याचे वर्णन तर त्यानीं एका व्याख्यानात इतके भावनावश होऊन केले, व तें करताना ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्याचे दुष्ट डाव असे कांहीं रंगविले कीं त्या वेळीं येथील सरदार हायस्कूलचे प्रिंसिपल मि टॉम्सन याना अगदीं गुदमरल्यासारखे झाले व्याख्यानानंतर उपहाराच्यावेळीं ते डॉ बाळकृष्णाना म्हणाले, "Doctor, you forget how poor France has suffered for hundreds of years."

डॉ बाळकृष्ण स्मित हसले व म्हणाले, "That's no reason why Germany should have been butchered by the Allies."

ते युरपची सफर करून आले त्या वेळीं जर्मनीच्या प्रचंड जागृतीने दिपून आले होते व्हर्सायच्या तहाने अगदीं गाडून टाकलेला जर्मनी ज्या

वसलीनें संघटित व सबल होत होता तिच, धारतच का होईना, परंतु प्रत्यक्ष दृश्य त्याच्या दृष्टीस पडत होत. साहजिकच ते अशी भावना घेऊन परत आले कीं आपल्या हिंदुस्थान देशाचा उद्धार व्हायचा असेल तर हिटलरसारखा महान नेता उदयास आला पाहिजे. शिवाजीवरची त्याची निःसीम निष्ठा लक्ष्यात घेता तीन शतकानंतर पुन्हा शिवाजीचा अवतार होऊन हिंदी राष्ट्राचा उद्धार त्याच्या हातून घडणार अशी श्रद्धा त्याच्या मनात खोल कुठें तरी असेल.

× × ×

आपल्या राष्ट्रपुरुषाची परंपरा तरुण पिढीच्या डोळ्यापुढें सतत राहिली पाहिजे हा विचार ते आपल्या जाहीर भाषणात वारंवार बोलून दाखवीत. याबद्दल ते बोलू लागले कीं बेभान झाल्यासारखे बोलत. आणि त्यांच्या आवेशाच्या लहरी श्रोत्याच्या रोमरोमातून उठतील अशी त्याची वक्तृत्वशैली असे.

मी आजपर्यंत ज्या अनेक नामांकित वक्त्यांचीं भाषणं ऐकलीं त्यांत डॉ. बाळकृष्ण याना मानाचं स्थान मी निःशंकपणें देतों. आमच्या राजाराम कॉलेजच्या हॉलमध्यें आता डॉक्टराच्या पश्चात् ज्या ज्या वेळीं मी प्रवेश करतो, त्या त्या वेळीं डॉ. बाळकृष्ण याची हास्यवदन व धीरोदात्त मूर्ती व्यासपीठावर उभी आहे, समग्र सभागृह एकचित्त प्रेक्षकांनीं भरगदी फुलून गेलेलं आहे, असं चित्र माझ्या डोळ्यांपुढून सर्कन् जातं; डॉक्टराचा तो खोल, गंभीर शब्द ऐकल्याचा स्पष्ट भास मला होतो; माझी मन आदरानें आपोआप खालीं वाकतें; आणि मी मनाशीं म्हणतों, "एक असंच जाज्वल्य राष्ट्रीय वृत्तीचा प्रभावी वक्ता गेला!"



# डॉ. बाळकृष्ण यांचें 'शुक्रनीतिसार.'

लेखक—डॉ. आ. ने. उपाध्ये, एम्. ए., डी. लिट्, कोल्हापूर.

डॉ. बाळकृष्ण यांचा आर्यसंस्कृतीचा अभिमान अत्यंत जाज्वल्य होता. भारतीय संस्कृति, वैदिक धर्म, व आर्यनीति यावर कोणी टीका केली तर ती त्यांना मुळींच सहन होत नसे; आणि अशा टीकेचें ते सप्रमाण खंडन करीत असत. भारतीय संस्कृतीचा उपहास करण्याचा ज्याचा केवळ धंदाच होऊन बसला आहे अशा मिशनरी लोकांवर त्यांचा विशेष कटाक्ष असे. एका मिशनरी वक्त्यावर अध्यक्ष या नात्यानें डॉ. बाळकृष्ण यांनीं केलेली टीका मला अद्याप आठवते. त्या दिवशीं डॉ. बाळकृष्ण यांनीं एक तासभर आपल्या अस्खलित व आवेशपूर्ण भाषणात त्या वक्त्याची अशी कांहीं खरपूस हजेरी घेतली कीं त्यांना टाळ्यावर टाळ्या मिळाल्या, वक्ते तर सर्दच झाले, आणि सभा अत्यंत गंभीर वातावरणात समाप्त झाली. त्यावेळीं प्रत्येक श्रोत्याला त्यांच्या उत्कट देशभक्तीचें व धर्मप्रेमाचें प्रत्यंतर आल्यावाचून राहिलें नाहीं.

आर्यसंस्कृतीच्या या अभिमानामुळेंच डॉ. बाळकृष्ण पुष्कळदा आपल्या मुख्य विषयापलीकडे जाऊन भारतीय संस्कृतीचा अभ्यास करण्यासाठीं निरनिराळ्या प्राचीन ग्रंथाचें अनुशीलन करीत असत. कित्येक वैदिक ऋचाचें त्यांनीं भाषांतर केलें आहे, तसेंच यज्ञाच्या तत्त्वज्ञानावर निबंध लिहिले असून भारतीय व ग्रीक तत्त्वज्ञानाची साम्य तुलनाही केली आहे. या लेखनात त्यांची भारतीय संस्कृतीवरील भक्ति व पक्षाभिनिवेश हे ठिकठिकाणीं दृग्गोचर होतात.

डॉक्टराचे अभ्यासाचे मुख्य विषय अर्थशास्त्र व राजनीतिशास्त्र हे

असून या विषयांवरील पाश्चात्य वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. तथापि भारतीय संस्कृतीकडे त्यांचा ओढा असल्यामुळें, आपल्या प्राचीन वाङ्मयांतील एतद्विषयक ग्रंथांचा अभ्यास आधुनिक दृष्टीनें व्हावा असें त्यांना वाटणें अगदीं स्वाभाविक होतें.

अर्थशास्त्र व राजनीतिशास्त्र यांच्या आधुनिक अर्थाप्रमाणें आपल्या प्राचीन वाङ्मयांत या दोन विषयांवर स्वतंत्र ग्रंथरचना जवळजवळ नाहीं म्हटली तरी चालेल. प्राचीन भारतीय वाङ्मयाच्या प्रत्येक क्षेत्रांशीं धार्मिकता संलग्न झाली असल्यामुळें या विषयावरील ग्रंथही स्वतंत्र स्वरूपांत आढळत नाहींत. शिवाय, पूर्वकालीन राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था विशिष्ट धार्मिक कल्पनांशीं निगडित अशीच होती. या दोन्ही विषयांचीं कांहीं तत्त्वें महाभारतासारख्या पुराणग्रंथांत, मनुस्मृतीसारख्या स्मृति-ग्रंथांत व पंचतंत्रासारख्या कथासंग्रहांत ग्रथित झालेलीं आढळून येतील. अर्थ हा चार पुरुषार्थांपैकीं एक असल्यामुळें धर्मशास्त्र व कामशास्त्राबरोबर अर्थशास्त्रावरही कांहीं स्वतंत्र ग्रंथ आहेत. सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे कौटिल्याचा अर्थशास्त्र हा होय. हा ग्रंथ कौटिल्यानें व्यक्तिशः रचला असें म्हणण्यापेक्षां तो अर्थशास्त्रावरील विविध मतप्रणालींचा सर्वसंग्राहक व प्रातिनिधिक ग्रंथ आहे असेंच म्हणणें सयुक्तिक ठरेल. याच्यापेक्षां पूर्वींचे स्वतंत्र असे या विषयावरील ग्रंथ आज उपलब्ध नाहींत. तथापि याच ग्रंथाच्या अभ्यासावरून असें दिसून येतें कीं हा ग्रंथ लिहितेवेळीं पूर्वींच्या कित्येक ग्रंथांचा उपयोग केला गेला असला पाहिजे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रानंतर याच विषयावर अनेक ग्रंथ झाले आहेत. उदाहरणार्थ–कामन्दकि याचा नीतिसार, शुक्राचा नीतिसार, सोमदेवकृत नीतिवाक्यामृत, हेमचंद्रप्रणीत अर्हन्नीति, भोज याचा युक्तिकल्पतरु, आणि चंडेश्वर याचा नीतिरत्नाकर हे ग्रंथ होत.

आधुनिक दृष्टीनें प्राचीन भारतीय राजनीतीचा अभ्यास करण्या-पासून आजच्या समाजव्यवस्थेला जो फायदा होईल तो करून घेण्याच्या हेतूनें डॉक्टर बाळकृष्ण यांनीं शुक्रनीतिसाराचें हिंदी भाषांतर हातीं घेतलें होतें, आणि तें आज अप्रकाशित असेंच राहिलें आहे.

शुक्रनीतिसार हा ग्रंथ इ. सन १८८२ सालीं गुस्तव ऑपर्ट यांनीं पाठांतर वगैरे देऊन उत्तम रीतीनें संपादित केला आहे. त्यानंतर बी. के. सरकार, कुमार नरेंद्रनाथ ला इत्यादिकांनीं या ग्रंथाचीं इंग्रजी भाषांतरें वगैरे केलीं आहेत. या ग्रंथात सुमारें २५०० श्लोक असून त्याचे पांच अध्याय आहेत. पहिल्या अध्यायात राजाचें स्वरूप, प्रजेबरोबर त्याचे संबंध, राजधानीची रचना, राजाचें दैनंदिन कार्य व कार्याची व्यवस्था इत्यादि विषय आले आहेत दुसऱ्या अध्यायात युवराजाचें कर्तव्य, सचिव-मंत्री इत्यादिकांचें लक्षण, कागदपत्रांची व्यवस्था, वजनमाप इत्यादि विषयाची चर्चा आहे. तिसऱ्यात, राजानें दूरदर्शीपणानें कसें वागावें, लोकांचे गुणदोष कसे समजून घ्यावेत, व त्याच्याबरोबर कसे संबंध ठेवावेत, प्रवासाचे काय फायदे आहेत, संपत्ति व आपत्ति हीं कशीं उत्पन्न होतात इत्यादि विषय आले आहेत. चौथा अध्याय मोठा असून त्यात सात प्रकरणें आहेत. मित्र–शत्रू ओळखून सामदामदंडभेद याचा योग्य उपयोग करणें, जाति व वर्णव्यवस्था हीं कशीं असावीत, बत्तीस विद्या व चौसष्ट कला कोणत्या, कारागिरांना आश्रय देणें, बागाईत उत्तमरीतीनें ठेवणें, देवालयें बांधणें, न्यायदानाची योग्य व्यवस्था राखणें, तटबंदीचे किल्ले वगैरे बांधणें, सैन्याची व्यवस्था व निरनिराळ्या आयु-धांचे उपयोग इत्यादि विषय आहेत पांचव्या अध्यायातील विषय साधारणपणें संग्रहात्मक आहेत हा अध्याय कदाचित् मुख्य ग्रंथाला नंतर जोडला गेला असावा.

या ग्रंथाची प्राचीनता, प्रामाणिकता, एककर्तृत्व इत्यादि विषयांवर विद्वानांत बरेच मतभेद आहेत. विशेषतः चौथ्या अध्यायांत आलेलें बंदुका तोफांचें (नालिक) व दारू (अग्निचूर्ण) तयार करण्याचें वर्णन यावरून या ग्रंथाचे कांहीं भाग इ. स. १४०० नंतर लिहिले गेले असावेत असें म्हणतात. आपल्या पुष्कळ ग्रंथांची हीच स्थिति झाली आहे. सदर ग्रंथाचीही वेळोवेळीं वाढ होत गेलेली आहे, हें खरें असलें तरी त्यांतील कांहीं भाग बरेच जुने असणें अगदीं स्वाभाविक आहे. म्हणूनच डॉ० बाळकृष्ण यांनी या ग्रंथाचें नुसतेंच भाषांतर न करता आपल्या प्रस्तावनेंत या ग्रंथाचा तुलनात्मक अभ्यास पण केला आहे. या प्रस्तावनेंत पुराणादिक ग्रंथांत विशेषतः महाभारतांत शुक्र यांच्यासंबंधीं उपलब्ध असलेली माहिती गोळा केली आहे, व वैदिक वाङ्मयातील सूक्त लिहिणारे शुक्र यांजबरोबर त्यांचा संबंध कसा पोंचतो, तें दाखविलें आहे. तसेंच नीतिशास्त्राच्या उगमाविषयीं चर्चा करून शुक्र यांच्या काळनिर्णयासाठीं पुरावा गोळा केला आहे. डॉ० बाळकृष्ण यांच्या मतें शुक्राचार्य ही व्यक्ति फारच प्राचीन आहे, त्यांच्या तोंडांतून बाहेर पडलेल्या वाक्यांवरूनच पुढें शुक्रनीतिसार बनत गेला, आणि आज उपलब्ध असलेल्या ग्रंथाचा काळ इ. स. पूर्वी ३०० हा धरणें समुचित दिसतें. हा काल निर्णय करतांना या ग्रंथाची तुलना कौटिल्य-अर्थशास्त्र, व्यासकृत महाभारत, आपस्तंब स्मृति, मनुस्मृति इत्यादि ग्रंथांबरोबर त्यांनी केलेली आहे. कोणत्याही प्राचीन भारतीय ग्रंथाचा कालनिर्णय हा केव्हांही मतभेदाचाच प्रश्न राहाणार तरि पण कोणत्याही विषयावर गोळा केलेले पुरावे पुढच्या कार्यास फारच उपयोगी पडतात. डॉ. बाळकृष्ण यांचें शुक्रनीतिसाराचें हिंदी भाषांतर व हिंदी प्रस्तावना शुक्रनीतिसाराचा अभ्यास करणाऱ्यास पुष्कळसी उपयोगी पडण्यासारखी आहे.

शुक्रनीतिसार या ग्रंथाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि खालील शब्दांत व्यक्त केली गेली आहे.

"प्राचीन हिंदूंची राजनीतिप्रवीणता (the political genius) कौटिल्य, शुक्र, कामन्दक, मनु, यांच्या ग्रंथांवरून स्पष्ट होण्यासारखी आहे. पूर्वीचे किती तरी ग्रंथ नष्ट झालेले आहेत. विदुर व भीष्म यांचे राजनीतिवरील विचार महाभारतात पहावयास मिळतात. राजनीती-वरील भारतीय वाङ्मय अगदींच दरिद्री आहे, असें कोणीही समजूं नये. शुक्र आणि कौटिल्य यांचे ग्रंथ श्रेष्ठ दर्जाचे असून त्यांची तुलना ॲरिस्टॉटल् व प्लेटो यांच्या ग्रंथांबरोबर होऊं शकेल."

"शुक्रनीति (सार) हा ग्रंथ उपलब्ध वाङ्मयांत अत्यंत महत्त्वाचा असून भारतीय राजनीति व समाजव्यवस्थेवर उत्तम प्रकाश पाडणारा आहे. ज्या समाजात सार्वत्रिक शिक्षणाचा प्रसार होता, प्रजा प्रगमनशील, स्वयंशासित, राष्ट्रैकतापर होती, राजा पापभीरु आणि प्रजेला जबाबदार होता—असें दर्शविणारें सुंदर चित्रण शुक्रनीतिसारांत पहावयास मिळतें. शुक्रनीतीचा अभ्यास आधुनिक काळातसुद्धां राजा व प्रजा या दोघानाही उपयोगी होण्यासारखा आहे."

"आज आपण समाजातील कांहीं दोष काढून टाकून नवीन समाजव्यवस्था स्थापन करण्याच्या मार्गावर आहोंत. अशावेळीं शुक्रनीतीसारख्या प्राचीन ग्रंथातील माहितीचा आपण उपयोग करून घेतला पाहिजे. रशिया, जर्मनी व इटली या देशात जे प्रयोग चाळले आहेत त्याजकडे शुक्रनीति (सार) या ग्रंथातील विचारांच्या अनुरोधानें पहावयास आपण शिकलें पाहिजे."

# Dr. Balkrishna
# And Ancient Sanskrit Literature.

By Prof. S S SUKHATANKAR M A

Rajaram College, Kolhapur

Dr. Balkrishna, with the versatile genius that was his, always took a keen interest in our cherished heritage—our ancient Sanskrit Literature This interest could, in a way, be said to be the outcome also of the lively days that he must have spent in the inspiring surroundings of the Gurukul with its emphasis on our cultural heritage. There might be a smack of missionary fervour about the life at Gurukul But then who but an evangelist can make us aware of truths and also home truths?

It was typical of his ever undiminished love for our ancient literature that in all the worries, particularly physical, the learned Doctor never for once allowed his interest in it to flag. And I am not indulging in any Boswellism when I say that I have felt a thrill pass through me at the sight of the Doctor, even during an acute asthmatic spasm, fingering this Sanskrit book or that

"Don't you think the Rig Veda Selections for B A are not chosen properly, that they fail to give the would be graduate a correct perspective of that eminent work," asked the Doctor once I nodded my assent and went on to say that hymns like the 'Gambler's'

ought to have been included in the selection. Apt came the retort: "Do you regard that hymn as *typical* of our Vedic society?" I had forgotten that I was talking to one to whom the Veda was the most sacred treasure!

In 1914, while working as a Professor of Economics at the Gurukul, Haridwar, Dr. Balkrishna published a brochure in Hindi 'वेदोक्त राज्य तथा प्राचीन भारत की राज्यप्रणाली'. Every page of it bears testimony to the profound scholarship of the author. Dr. Balkrishna is as much at home in elucidating the whole range of Vedic Literature as he was famed to be while expounding History or Constitution to the College students. The central thesis of the book is that the most ancient form of Government in India was perfectly democratic in complexion, that the ruler was chosen by the people; that despotic rule was a later phase, due to the exigencies of the times, in the development of our indigenous political institutions, that hereditary kingship was subsequent to the development of the caste-system

Says the Doctor in the sequel (p 134):— "वेद के (इस मंत्र से) विस्पष्ट पता लगता है कि ईश्वर की आज्ञा है कि संसार में Sovereignty of the People—प्रजा, जनता, जातीकर राज हो—राष्ट्र में प्रजा की शक्ति अबाधित, निरङ्कुश, निर्गल होवे; प्रजा ही वास्तविक राजा है; वही राजाओं की स्वामिनी मालिक है न कि राजागण प्रजा के स्वामी हैं ... ......"

To prove this thesis, the author has laid under contribution the four Vedas, the Brahmanas, and Sanskrit works on politics and others Here was a full-blooded vindication of our democratic ideals

Varied were Dr Balkrishna s interests in the Vedic Literature To him, as to any rational reader, the Veda was as much the fountain-head of our religion as it was an unperverted record of our life covering thousands of years As I rummage his numerous manuscripts, I come across the Doctor s gleanings made from all the four corners of the Vedic literature, bearing on such diverse topics as Hospitality, National Prayer, Mesmerising away Diseases, Hypnotism, Auto suggestion, Wooing of the Woman, Astronomy Noble conception of Sin Clothing, Colours, Medicine, Fumigation, – to mention only a few Occasionally he contributed to journals and periodicals

It is a great pity that Dr Balkrishna did not live to complete his book, the Vedic Psalms which was just in press at the time of his death From the few pages that have been in print one can get a fairly correct idea of the author s way of approach to the Veda The printed portion covering some 64 pages embraces the topics Veda, the Word of God, the Merits of Vedic Study, the Nature of God, the Glory of God, Vedic Cosmogonies, Prayers for Peace, the Control of Breath

Under these heads the Doctor has culled together

passages from the different Vedas and Upanisads and attempted to give us a synthetic picture of the different aspects of Vedic thought.

In his interpretation of the Vedic texts, Dr. Balkrishna, like Swami Dayanand, wanted to be rationalistic "Logic is our preceptor and our saint," said Swami Dayanand, though "he started with the age-long belief that the Vedas were revealed books" The net result of Dayanand s rationalistic approach is thus outlined by the Doctor —

"Every verse was to fulfil the two fold test of conforming with logic and science This hypothesis excluded territorialism communalism, ritualism, mythology, iconography, history, legends, even good or bad stories of men and gods from the Vedas They were not a historical record of the ancestors of the Aryans, they did not present a social, political and ethical picture of the ancient Aryan Society, but they were beyond the limitations of space and time as eternal verities'

The earlier schools of Vedic exegesis, whether indigenous or Western, had failed to give us, thought the Doctor, a correct interpretation of the Veda. Sayanacharya imported Pauranik Mythology in his interpretations The Western Scholars had erred, so the Doctor thought, in attaching conventional meanings to Vedic words, which must have been in fact sufficiently fluid in their connotations Dr Balkrishna's sympa-

thies seem to lie with one school of Vedic exegesis the school of the नैरुक्तs or etymologists When यास्क gives as many as five etymologies of the word जातवेदस्, he brings out, so thought the Doctor, the fluidity of the meaning of the word in question The Vedic language must have been sufficiently flexible, according to him I remain content merely with an objective statement of facts This is not the place either to vindicate the particular view or to animadvert upon it One fact stands undisputed and that is the supreme value of *correct* etymology in throwing light on the obscure portions of the Veda

Carlyle, in one place, complains that ideals that inspire an institution at its inception are, in course of time lost sight of and thus lapse into decadence. Dayanand revolted against orthodoxy and superstition But, alas! Shades of Dayanand! Dr Balkrishna felt it necessary to give a note of warning to the Arya Samaj

"The Arya Samaj has begun to suffer from conservatism and fanaticism Some of its leaders are not ready to give freedom of thought to its scholars. Every word of Swami Dayanand is taken to be the truth None is permitted to differ from the Swamiji in the interpretation of a Vedic verse

Dr Balkrishna s varied interests made him probe into our ancient philosophy also His work on the philosophy of evolution, whether one agrees with its central thesis or not, bears unimpeachable testimony

to this He had written certain tracts like अग्निहोत्र व्याख्या, आर्यों की वैज्ञानिक उन्नति, क्या वेद ईश्वरीय ज्ञान है ?, which, in one way or another were valuable contributions to the cause he espoused—I mean the आर्यसमाज

Finally, I take this occasion to thank the editor of the Commemoration Volume for having given me an opportunity to pay my humble tribute to one under whom I worked for well nigh fifteen years On a few occasions more unacademical than otherwise I have taken pride in differing from him But, on occasions far more numerous I have felt prouder still for his academical attainments to which I shall always take my hat off!

---

## Dr. BALKRISHNA

Like a rainbow with seven rays he charmed the world around,

Every ray striving to excel the rest

Like a rainbow this genius vanished after a time

Leaving behind a pure white beam—

A guide to many a faltering forlorn soul

Kolhapur 15 8-41 —*J R Parasnavis*

# डॉ. बाळकृष्णांचें अर्थशास्त्र

लेखकः–श्रीकृष्ण रामचंद्र पोतनीस, एम्. ए., एल्एल्. बी., कोल्हापूर

कै. गु. डॉ. बाळकृष्णांनीं अर्थशास्त्रविषयक पुस्तकें एकंदर तीन लिहिलीं; आणि तीं सर्व वैशिष्ट्यपूर्ण आहेत. हिंदुस्थानच्या सुवर्णभूमीचें वैभव पाश्चात्यांनीं लुटून नेलें अशा मताचे डॉक्टरसाहेब होते. त्यांच्या तीन पुस्तकांत लंडन स्कूल ऑफ् इकॉनॉमिक्समध्यें डॉक्टरेट पदवीसाठीं त्यांनीं सादर केलेल्या प्रबंधास म्हणजे 'Commercial Relations between India and England' नामक ग्रंथास अग्रस्थान देणें भाग आहे.

हिंदुस्थानचें राज्य कमावण्यापूर्वी आपल्या हातांतील तागडी जाऊन तलवार केव्हां व कशी आली, ते आपणास ठाऊक नसल्याची बढाई इंग्लीश नेहमी मारीत असतात. पण याच तागडीचा प्रताप एकंदर किती होता आणि त्यानें किती अलोट संपत्ति हिंदुस्थानांतून नेली, याचा हा सुंदरसा इतिहास आहे. सतराव्या शतकांत हिंदुस्थानांत औद्योगिक, आर्थिक व व्यापारी परिस्थिति किती भरभराटीची होती व त्यानंतर पाश्चात्यांनीं आपआपसांत स्पर्धा करून ती परिस्थिति कशी बिघडविली, याचें हें उत्कृष्ट चित्र इंग्लीश वाचकांना मोठें आश्चर्यक व आल्हाददायक वाटलें, तथापि हिंदी वाचकांना उद्वेगजनक वाटल्याविना रहाणार नाहीं. प्रस्तुत पुस्तकांतील प्रतिपाद्य विषयाचा थोडक्यांत गोषवारा सांगितला म्हणजे वरील म्हणण्याची सत्यता पटेल. इ. स. १६०१ पासून १७६० पर्यंतच्या सुमारें १५० वर्षांच्या काळांतील अँग्लो-हिंदी व्यापारी संबंधांचा हा संशोधनात्मक निबंध आहे. विशेषतः इ. स. १६२५ ते १६७०, पर्यंत ५० वर्षांतील माहिती फोटेंच

उपलब्ध नसल्यानें, त्याबाबतींत डॉक्टरसाहेबांना विशेष परिश्रम घ्यावे लागले. तत्कालीन पुस्तकांवर केवळ न विसंबिता, त्यांनीं स्वतः इंडिया ऑफिस, ब्रिटिश म्यूझियम, पब्लिक रेकॉर्ड ऑफिस, बोर्ड ऑफ् कस्टम्स् लायब्ररी इ. रेकॉर्डमधील कसरीनें अर्धवट खाल्लेल्या कागदपत्रांत शिरून, त्यांतील आंकड्यांची बेरीजवजाबाकी वगैरे गणिती संस्कार करून, स्वतःची बनविलेलीं मतें म्हणून त्यांनीं पुस्तकांत मांडलीं हें एक विशेष आहे. त्यामध्यें त्याचे कांहीं गणीती आंकडे या बेरीजवजाबाकींचे अवशेष चुकले असले, तर डॉक्टरसाहेबांचे गणित कच्चें होतें एवढें म्हणता येईल. पण त्या ताळेबंद हिशेबावरून जी त्यांनीं ठाम मतें व अनुमानें म्हणून मांडलीं त्यास कोणताच बाध येत नाहीं.

हिंदुस्थानांत मँचेस्टरः—पुस्तकाचीं एकंदर दहा प्रकरणें आहेत. पहिल्या प्रकरणात सतराव्या शतकाचा अरुणोदय होण्यापूर्वीच्या सर्व आशिया खंडाची पाहणी केली असून, त्यामध्यें हिंदुस्थानचें स्थान कसें महत्त्वाचें व नाक्याचें होतें हें दाखविलें आहे. हिंदुस्थानच्या तत्कालीन दीव, दमण, खंबायत, सुरत, गोवा, कालिकत वगैरे बंदरांतून केवढ्या मोठाल्या व्यापारी उलाढाली होत, यांची आकडेवारी त्यांनीं दिली असून हिंदुस्थानकडे सर्व मुस्लीम व ख्रिश्चन जगाला कापड पुरविण्याचा मक्ता असल्याचें त्यांनीं सोदाहरण दाखविलें आहे. हिंदुस्थानांतील सुती, रेशमी व लोकरी कापड किती सुंदर, तलम, गुळगुळीत व पातळ निघत असे त्याचें वर्णन त्यांनीं "वर्फाइतकें धुवट, जणु कोळ्याचें जाळें, वहातें पाणी, सकाळचें दव," इत्यादि उपमानीं केलें आहे. गुजराथला त्यांनीं मँचेस्टर म्हणून संबोधिलें असून, त्याकाळीं जगांतील प्रत्येक स्त्रीपुरुषांचीं शरीरें हिंदी कापडांनीं झाकलीं जात होतीं, असें विधान केलें आहे. हिंदी कापडाबरोबर इतर उद्योगधंदे, व्यापार, सौदे,

हस्तव्यवसाय, कला इत्यादिकांचीहि माहिती त्यांनी दिली आहे. डॉक्टरसाहेबांच्या शब्दांत बोलावयाचें म्हणजे तत्कालिन व्यापारी जगांत हिंदुस्थानास हृदयाचें स्थान होतें किंवा हिंदुस्थान म्हणजे एक अफाट समुद्र कीं ज्यामध्यें सर्व जगांतील संपत्तीच्या व उद्योगधंद्यांच्या नद्या येऊन विलीन पावत असत. ("India was the respiratory organ for the circulation and distribution of moneys and commodities of the commercial system of the world; it was the sea; wherein all the rivers of trade and industry flowed and these profusely enriched its inhabitants.")

यापुढील आठ प्रकरणांत अँग्लो-हिंदी व्यापाराची भाकडेवारी त्यांनी दिली आहे. यामध्यें अनेक उद्बोधक गोष्टी आपल्या नजरेस येतात त्या अशा: १६०१ ते १६५७ च्या दरम्यान इंग्लिशांचा व्यापार डचांच्या निम्यानें होता, व डचांनी या व्यापारांत खूपच पैसा कमावला. डच कंपन्यांनी वरील मुदतींत शेंकडा ११०६ इतका फायदा भागीदारांना वांटला. हिंदुस्थानांत पांचसहा वर्षे वास्तव्य करणारा इंग्लीश मनुष्य परत स्वदेशीं जातांना दहापांच हजार पौंडांची कमाई करून, तिथपर्यंत एखाद्या नबाबाप्रमाणें राही. यावेळेस हिंदुस्थानांतून मसाल्याचे पदार्थ, नीळ, कापड, कच्चें रेशीम, सोरा यांची निर्गत होई, तर इंग्लिश लोक इकडे लोंकरीचें कापड, धातु, पारा, हस्तिदंत वगैरे जिन्नस आणीत. इराणच्या आखाताकडील व्यापार अरबांच्या हातून इंग्लिशांनी कसा बळकावून घेतला त्याचीहि सांग माहिती इथें मिळते.

**ईस्ट इंडिया कंपनीची प्रौढावस्था:**—यानंतर १६५८ ते १७०७ च्या काळांत ईस्ट इंडिया कंपनीचा हिंदुस्थानांतील व्यापार बाल्यावस्था संपवून, प्रौढावस्थेत पदार्पण करीत असल्याचें भासूं लागतें.

ईस्ट इंडिया कंपनीच्या पूर्वेकडील व्यापारामुळें कच्च्या मालाची आयात होते, पक्क्या मालाची उठावणी होते, जकातींचें उत्पन्न वाढतें, इंग्लीश नौकांना व नाखव्यांना एक व्यवसाय मिळून, नाविक सामर्थ्यांत दिवसेंदिवस भर पडते वगैरे गोष्टींची जाणीव इंग्लीश लोकांना होऊं लागल्याचें स्पष्ट दिसतें. विलायतेहून निघालेल्या जहाजांपैकीं शेंकडा ७० हिंदुस्थानसरितां माल घेऊन येतात व बाकीचीं शेंकडा ३० आशियांतील इतर देशांकरितां, अशी नोंदणी त्यांनीं केली आहे; व सदर कालांतील इंग्लिशांचा व्यापार पूर्वीपेक्षा नऊपट झाला असें त्यांनीं आंकडेवारीनें शाबीत केलें आहे. पूर्वेकडील कंपनीच्या अधिकृत व्यापाराबरोबरीनें कंपनीचे नोकर खासगी व्यापारहि मोठ्या प्रमाणावर करीत असत, पण त्याचें आंकडे कोठेंच उपलब्ध नाहींत. खासगी व्यापार एवढा मोठा झाला का १६८० मध्यें त्यावर कंपनीला नियंत्रण बसविणें भाग पडलें. कंपनीच्या नोकरांना ठराविक किंमतींच्या मालाचाच व्यापार करण्याचे परवाने यापेलेपासून देण्यांत येऊं लागले. पूर्वेकडील मसाल्याच्या व्यंटांत डचांनीं केवढी मोठी मक्तेदारी मिळविली याचें मोठें सुंदर चित्र त्यांनीं वाचकांना सादर केलें असून, आपल्या मक्तेदारीच्या आड कोणी येऊं नये, व किंमती उतरूं नयेत, म्हणून केवढाले मोठे उपद्व्याप व रानटी वर्तन डचांनीं केलें याचें वर्णन वाचावयास मिळतें हिंदुस्थानांतील कुशल विणकऱ्यांच्या हाताचीं बोटें तोडलीं गेलीं, तसेंच डचांनीं मसाल्याचीं हजारों झाडें पेटवून दिल्याचीं उदाहरणें सांपडतात. याच मक्तेदारीच्या जोरावर डच कंपन्यांनी १७३१–३२ मध्यें शेंकडा २४०० इतका फायदा मिळविला. प्लासीच्या लढाईपूर्वीच्या ५० वर्षांतील व्यापाराचा आढावा घेऊन, त्यांनीं एक गोष्ट निर्विवाद शाबीत केली कीं, वरील कालांत हिंदुस्थानचा व्यापार हिंदुस्थानच्या दृष्टीनें किफायतशीर.

(Favourable Balance of Trade) होता. पाश्चात्य राष्ट्रें इतकी संपत्ति येथून नेत असेल, तथापि हिंदुस्थान ही अशी एक फार मोठी मौल्यवान् गंगाजळी होती कीं, त्यामध्यें दरसाल सुवर्ण, चांदी, हिरेमाणिकें वगैरे बहुमोल गोष्टींचा सतत ओघ भरच घालीत होता. तोच फायदेशीर व्यापार पुढें कसा आतबट्याचा होऊं लागतो हें समजण्यास हीं प्रकरणें अवश्य वाचणें भाग आहे. फ्रेंचांचा पाडाव केल्यावर, तर इंग्लिशांना *हिंदुस्थानच्या व्यापारांत कोणी प्रतिस्पर्धी राहिला* नाहीं, त्यांच्या व्यापाराचा संसार अफाट वाढला असल्यास त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

साधारणपणें जेवढें जहाजाचें वजन असे, तेवढ्याच टनांचा माल तें नेत, असा त्यावेळेचा प्रघात होता. यादीनें निरनिराळ्या किती जहाजें हिंदुस्थानांत आलीं, इकडून तिकडे परत किती गेलीं, त्यांचा त्यांच्या टनेजशीं गुणाकार करून, बरींच अनुमानें आकडेवारीनें डॉक्टर-साहेबांनी मांडलीं आहेत. इतर युरोपियन राष्ट्रांचा पाडाव इंग्लीश जहाजें व नाखवी यांनीं आपल्या कौशल्यावर केला, इतकेंच समुद्रा-वरील वर्चस्व शस्त्रयुक्त वेगवान इंग्लीश जहाजांनीं कसें मिळविलें हेंहि त्यांनीं सिद्ध करून दाखविलें आहे.

**हिंदी कापडावर नियंत्रणः**—शेवटच्या प्रकरणांत हिंदुस्थानच्या कापडापासून राष्ट्रीय धंद्यांना संरक्षण इंग्लीश लोकांनीं कसें दिलें याबद्दल मोठी मनोरंजक माहिती मिळते. राष्ट्रीय उद्योगधंद्यांना संरक्षण देण्याच्या नांवासाठीं, इंग्लंडनें आपल्याभोंवतीं कसे जकातीचे तट उंचच उंच उभारले, आणि हिंदी विणकऱ्यांचा धंदा सफाई कसा बुडविला, याचा इतिहास १६६० पासून मिळतो. दुसऱ्या चार्लसच्या कारकिर्दीत टनेज व पौंडेजच्या कायद्यानें हिंदी कापडावर जकात बसविण्यांत आली.

१६७० नंतर हिंदी रेशिमाविरुद्ध लोकजागृति विलायतेंत अनेक लेख व जाहिरातींद्वारें करण्यात आली. १६८५ मध्यें शेंकडा दहा पौंडाची जादा जकात हिंदी कापडावर बसविण्यांत याची परिणति झाली. या सर्वांचें कारण असें कीं कॅथोलिकांच्या छळास कंटाळून युरोपातील हजारों निराश्रित प्रजाजन व फ्रँडर्समधील हजारों विणकरी इंग्लंडात वास्तव्यास आले, त्यांच्या पोटापाण्याची सोय करण्यासाठीं हें संरक्षणाचें धोरण स्वीकारण्यात आलें. १७०१ मध्यें हिंदी कापडाची आयात करणाऱ्या जहाजांना २०० पौंडापर्यंत दंड करण्याचें जाहीर केलें गेलें. १७२० मध्यें हिंदी रंगीत कापड, रेशमाचें व लोंकरीचें कापड वापरणाऱ्यांना पांच पौंड व ते विकणाऱ्यांना वीस पौंड दंड ठोठावले जाऊं लागले. इंग्लंडातील चैनी व गुल्हौशी लोकांच्या फॅशनच्या कल्पनांना अशी उत्दी कलाटणी देण्यासाठीं सरकारनें अविश्रांत परिश्रम घेऊन अनेक कायदे घडविले १७२० सालीं इंग्लीश व्यापाराबद्दल सूचनावजा जे अनेक विनंती अर्ज सरकारला लोकांनीं सादर केले आहेत त्यांतून "जर अमे कपडे वापरणाऱ्यांवर कडक नियंत्रण बसलें, तर इंग्लीश स्त्रियांनीं काय पार्लमेंटच्या कायद्यानीं लाज झाकावी आणि सरकारच्या वटहुकुमाच्या कागदाचे कपडे शिवावेत?" असे त्यांनीं सरकारला सवाल टाकले आहेत. हिंदी चित्रविचित्र फॅन्सी पातळ, तलम कापडावर केवढें मोठें प्रेम विलायतेंतील स्त्रियाचें होतें, हें यावरून दिसून येईल. सुमारें एक शतकभर हिंदी कापडाचा व्यापार मारण्याचे पद्धतशीर प्रयत्न इंग्लीश लोकांनीं केले व ते नाविक सामर्थ्याच्या सहाय्यानें शक्य झाले, त्यातच यांत्रिक युगांतील नवनवीन शोधांनीं भर घातली व अखेर जो हिंदुस्थान सर्व जगाला कापड मक्त्यानें पुरवीत असे, त्याच हिंदी लोकांना परदेशी कापडावर विसंबण्याची पाळी आली वगैरे गोष्टी मग निराळ्या सांगावयास पाहिजेत?

**ग्रंथाचें महत्त्वः**—पुस्तकाच्या शेवटीं सुमारें ८० पानांचीं परिशिष्टें जोडण्यांत आलीं असून, पुस्तकांतील प्रतिपाद्य विषयास अनुकूल व जरूर तेवढी माहिती त्यामध्यें संकलित केलेली आढळते. त्यावरून डॉक्टरसाहेबांनीं वरील माहिती किती प्रयासानें व व्यासंगानें जमा केली, हें उघड दिसून येते.

प्रस्तुत ग्रंथ केवळ अर्थशास्त्रविषयक आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण त्यामध्यें तत्कालीन हिंदुस्थानांतील अंतःस्थिति, भौगोलिक, धार्मिक, सामाजिक, नैतिक चालीरीती इत्यादि परिस्थितीचें वर्णन, लोकसंख्या, उत्पादन, व्यापार, अरण्यें, खनिज द्रव्यें, शेतकी, रस्ते, कारखाने, वहातुकीचीं साधनें, उद्योगधंदे इ. इ. सर्व बाबींचा खुलासेवार वृत्तान्त डॉक्टरसाहेबांनीं दिला असल्यानें, तत्कालीन हिंदुस्थानांतील व्यापाराचा इतिहास असें संबोधणेंच अधिक इष्ट वाटतें. ग्रंथावर अनेक देशी परदेशी वृत्तपत्रांनीं चांगले अभिप्राय प्रगट केले असून, सर्वांनीं डॉक्टरसाहेबांच्या व्यासंगाची तारीफ केली आहे. त्यामध्यें, मँचेस्टर गार्डीयन, अमेरिकन इकॉनॉमिक रिव्यू, बर्नस् इंजिनियरिंग मॅगेझीन, हिंदु, इकॉनॉमिक रिव्ह्यू, पायोनियर, इकॉनॉमिक जर्नल, टाईम्स ऑफ् इंडिया इ. चे अभिप्राय विवेचक व गुणग्राहक असल्यानें त्यांचा उल्लेख केला आहे. एक गोष्ट मात्र अवश्य सांगितली पाहिजे की पुस्तकांत आंकड्यांचा इतका गोंधळ झाला आहे की, त्या गिचमिड आंकड्यांतून डॉक्टरसाहेबांची मतेंच केवळ वाचणाऱ्या सर्वसामान्य वाचकांची निराशा झाल्याशिवाय राहात नाहीं. पुस्तकाचें परीक्षण संबंधिनांना त्यांतील पायोनियर पत्रानें मोठें मार्मिक वाक्य लिहिलें आहे. "सर्व जगाला दचकून, दैवशः देत पोटावरून हात फिरवीत राष्ट्रसंघ, आंतरराष्ट्रीय कायदा, जागतिक शांतता इ. गप्पा झोडणाऱ्या पाश्चात्यांच्या दुर्दैवानें गूर

मिसळण्यास लुबाटले गेलेले परतत्र लोक का तयार होत नाहींत !" यांचें हें पुस्तक उत्तर होय

**हिंदी अर्थशास्त्रः**—आता त्यांच्या दुसऱ्या दोन पुस्तकांकडे वळू. यांपैकी एक हिंदी असून, त्यामध्यें अर्थशास्त्राचीं मूलभूत तत्त्वें अगदी सोप्या भाषेंत व सुगम पद्धतीनें सांगितलीं असल्यानें, हिंदी भाषेंतील शास्त्रीय पुस्तकांत डॉक्टरसाहेबांनीं एक अमूल्य भर घातली आहे. पुस्तकाविषयीं 'सरस्वती' नामक प्रसिद्ध हिंदी मासिकाचा अभिप्राय थोडक्यांत सांगितला म्हणजे त्यासंबंधीं अधिक लिहिण्याची आवश्यकता उरत नाहीं. तें म्हणतें "इस शास्त्र के सिद्धान्तादि के ज्ञान और प्रचार की, इस समय, इस देश में, बड़ी ही आवश्यकता है। अतएव ऐसी समयोपयोगी पुस्तक लिखने के लिए प्रोफेसर महाशय को बहुत बहुत साधुवाद' . ऐसी अच्छी और समयोचित पुस्तक लेकर हमें उससे अवश्य लाभ उठाना चाहिए!"

याशिवाय 'भारत' 'सद्धर्म प्रचारक' वगैरे वृत्तपत्रांनीं याबद्दल प्रशंसोद्गार काढले आहेत

**Industrial Decline in India:**—शेवटीं डॉक्टर महाशयांचें १९१७ सालीं प्रसिद्ध झालेल्या "Industrial Decline in India" नामक इंग्रजी पुस्तकाचें परीक्षण करूं. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं आणि विसाव्या शतकाच्या पहिल्या पंधरावीस वर्षांच्या अवधींत, हिंदुस्थानांत दैन्याची कशी साक्षात् नांदत होती, याचें हें करुणास्पद चित्र आहे याचीं प्रामुख्यानें दोन कारणें सांगता येतील. आधिभौतिक शास्त्राच्या युगांत यांत्रिक सुधारणांनीं, हिंदुस्थानसारख्या हस्तकलेवर जगणाऱ्या असंख्य कलावानांच्या पोटावर पाय आणलें, हें सर्वश्रुत आहे त्यांत हिंदुस्थानांत ब्रिटिशांनीं स्वीकारलेल्या खुल्या व्यापाराच्या

धोरणानें भर घातली. हीं तीं दोन कारणें होत. म्हणून डॉक्टर-साहेबांनीं पुस्तकाच्या उपोद्घातांत "हिंदी स्वातंत्र्याच्या अगोदर, हिंदी लोकांना सरकारी तिजोरीवरील सत्ता (Fiscal Autonomy) मिळणें अतिशय जरूरीचें आहे" असे उद्गार काढले आहेत. आणि तत्कालीन राजकारणाकडे व्यापक दृष्टीनें नजर टाकणाऱ्यास हे अर्थपूर्ण उद्गार असत मननीय वाटल्याविना त्यास राहणार नाहींत. यानंतर पुस्तकांतील विषयाचें महत्त्व आणि विवेचन वाचतांना सारांश रूपानें समजण्यास अवघड जाणार नाहींत.

हिंदुस्थानांत लोकसंख्येची वाढ किती झाली व यांपैकी खेडे-गांवचीच लोकसंख्या कशी बेसुमार वाढली हे यांनी शिरगणती अहवालावरून दाखवून, हिंदुस्थान हा अधिकाधिक कृषिप्रधान देश होऊं लागला, हिंदी लोकांच्या कला. हस्तव्यवसाय यांचा दिवसेंदिवस लोप होऊं लागल्यानें लोक बेकार झाले, मजुरांची संख्या प्रचंड वाढली, आणि शेतकीशिवाय अन्य पोटाचा व्यवसाय लोकांना न राहिल्यानें, शेतकी हाच प्रधान धंदा कसा झाला याचें विवेचन पहिल्या दोन प्रकरणांत आढळतें. या सर्वांचें कारण सरकारनें अवलंबिलेलें खुल्या व्यापाराचें धोरण आणि देशी उद्योगधंद्यांना संरक्षण न देण्याची सरकारची प्रवृत्ति हें होय. बरें या धोरणामुळें शेतकरी तरी सुखी झाला काय? त्याचेंहि उत्तर नकारात्मकच मिळतें. खरें म्हटलें तर उद्योगधंद्यांची आद्य जननी शेतकी आहे. कारण शेतकऱ्यानें कच्चा माल उत्पादन केला तर त्याचें रूपांतर पक्क्या मालांत करणारे कारखाने अहोरात्र चालणार? पण हिंदुस्थानांतील शेतकीची निकृष्टावस्था आणि शेत-कऱ्यांची दैना यांचें मूर्तिमंत चित्र डॉक्टरसाहेबांनीं रेखाटलें आहे. तें वाचून कोणाहि सहृदय माणसाचें मन द्रवल्याविना स्वस्थ राहणार नाहीं.

दुष्काळानें गांजलेल्या, दारिद्र्याच्या पंकांत रुतलेल्या आणि बाराहि महिने अहोरात्र काबाडकष्ट करणाऱ्या हिंदी शेतकऱ्याचें वार्षिक सरासरी उत्पन्न किती आहे याबद्दलचे नामांकित लेखकांचे संशोधनात्मक आंकडे डॉक्टरसाहेबांनीं सादर केले आहेत.

खुल्या व्यापाराचें खूळ:—यानंतर डॉक्टर महाशयांनीं पंजाब, संयुक्त प्रांत, बंगाल, ब्रम्हदेश, मद्रास, मुंबई, देशी संस्थानें याविषयीं प्रांतनिहाय वैयक्तिक प्रकरणें लिहिलीं असून, प्रत्येक प्रांतांतील उद्योग धंदे कसे सफाईदार बुडाले यांची साद्य माहिती वाचकांच्यासाठीं संकलित केली आहे. त्यावरून हिंदुस्थानांतील एकवेळेस उर्जितावस्थेत असलेले लोंकर, सुती कापड, नीळ, कातडीं कमावणें, लोहार, तांबट आदि उद्योगधंदे पार कसे लयाला गेले हें समजून येते. शेवटच्या प्रकरणांत युरोप खंडांतील इंग्लंड, जर्मनी, डेनूमार्क आदि राष्ट्रांतील शेतकी, हस्तकला, लहान लहान उद्योगधंदे सुधारण्यासाठीं त्या त्या सरकारनें काय काय प्रयत्न केले याचा वृत्तान्त देऊन, यंत्रानें माणसाला कसें मनुष्य-पणांतून उठविले ते सांगितले आहे. दोन सारख्या पातळीवर असणाऱ्या बलवान राष्ट्रांना खुल्या व्यापाराचें तत्त्व उपकारक ठरतें, पण ज्याप्रमाणें दगड आणि कांचेचे पदार्थ एकेठिकाणी नांदणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें यांत्रिक उद्योगधंद्यांत प्राविण्य मिळविलेल्या राष्ट्राबरोबरीनें मागासलेल्या हिंदुस्थानास 'खुल्या व्यापारां'त स्पर्धा करावयास लावण्यांत ब्रिटिशांनीं जाणून बुजून हिंदुस्थानचे अपरिमित नुकसान केले. एरव्हीं मोठ्या कच्च्या मालाचें आगर असलेला देश आणि कष्टमशागत, बुद्धिमत्ता, महत्त्वाकांक्षा, चातुर्य इ. गुणांनी युक्त असे कलावान हिंदी लोक, जगाच्या दृष्टीनें कधींहि मागासलेले राहिले नसते. जपानी लोकांप्रमाणें पौर्वात्य त्यांत त्यांनीं आपलें वैशिष्ट्य याहि क्षेत्रांत खालीनें राखलें असतें,

असा निष्कर्ष डॉक्टरसाहेबांनी काढला आहे. तो किती युक्त व यथायोग्य आहे, हें निराळें सांगावयास हवें काय ?

पुस्तकांतील विषयाचें विवेचन शक्य तितके साधार व विस्तृत असल्यानें, वाचकांना पुष्कळशी एकत्र केलेली ही महत्त्वपूर्ण माहिती मिळण्याची सोय झालेली आहे. पण डॉक्टरसाहेबांच्या विद्वत्तेबद्दल व संशोधनात्मक चिकाटीबद्दल योग्य आदर ठेवून, एक गोष्ट या पुस्तकाविषयीं स्पष्टच सांगावीशी वाटते. पुस्तकास धर्मीआर्थिक स्वरूप संकलित वर्तमानपत्रांतील कात्रणांचें आलेलें आहे. निरनिराळ्या पुस्तकांतील अवतरणांतील उतारे, वृत्तपत्रांतील कात्रणवजा मजकूर, मोठाली कोष्टकें यांनी पुष्कळशी पानें पुस्तकांत अडविल्यानें, डॉक्टरसाहेबांच्या मनाचे मधून मधून उठणारे पडसाद ऐकण्याची उत्सुकता वाचकाच्या जवळ राहूं शकत नाहीं हें मात्र खरें. 'इंडियन जर्नल ऑफ् इकॉनॉमिक्स' सारख्या प्रख्यात मासिकानें सुद्धां पुस्तकांतील विषय प्रतिपादण्याची आवेशयुक्त पद्धत आणि कोष्टकांतील आकड्यांची घसरत, यावरून टीका केली आहे. अभिप्राय देणाऱ्यांतील अहंमन्यपूर्ण अतिशयोक्तीचा भाग थोडासा बाजूस ठेवला, तरी डॉक्टरसाहेबांनी परिश्रमपूर्वक संकलित केलेल्या माहितीचा तितका चांगलासा उपयोग केला नाहीं, एरव्हीं एवढ्या माहितीवर ते एखादा सुंदर सुसंगत प्रबंध खास लिहूं शकले असते, असें कष्टानें म्हणणें भाग पडतें.

**डॉक्टरसाहेबांचा अभिमानः**—एकंदरीत डॉक्टरसाहेबांचीं अर्थशास्त्रविषयक तीनही पुस्तकें मौल्यवान व महत्त्वपूर्ण आहेत यांत मुळीच शंका नाहीं. हिंदी कला, संस्कृति, इतिहास, भाषा, धर्म इ. विषयीं डॉक्टरसाहेबांचा अभिमान किती ज्वलंत होता, हें सर्वांना ठाऊक होतें. त्याचेंच प्रत्यंतर या तीन पुस्तकांत पुरेपूर पाहावयास मिळतें.

विशेषत. पहिल्या ग्रंथातील संशोधनात्मक माहिती मोठ्या कौशल्यपूर्ण व समतोल विचारसरणीचा अवलंब करून मांडली गेली आहे. या ग्रंथांतील इंग्रजी भाषासुद्धा सुंदर, सफाईदार व प्रशंसास योग्य अशी आहे. त्यातहि हिंदुस्थानला पाश्चात्य देशांनी कसें लुबाडलें याचें वर्णन येतांच, डॉक्टरसाहेबांच्या विचाराचा समतोलपणा स्वाभिमानामुळें नष्ट झालेला दिसेल. पण हिंदुस्थानच्या दु:स्थितीचें हें साधार संशोधनपर यथार्थ दर्शन एका हिंदी सद्गृहस्थानें केलें आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. हिंदुस्थानास आपल्या गतवैभवाची व चालू दु:सह स्थितीची जाणीव देऊन जागा करणाऱ्या हिंदी लेखकांत डॉक्टरसाहेबांना खात्रीनें मानाचें स्थान देणें भाग आहे, आणि म्हणूनच मी म्हणतों कीं डॉक्टरसाहेबांचीं तिन्हीं पुस्तकें वैशिष्टयपूर्ण आहेत.



# डॉ. बाळकृष्णांची सामाजिक कामगिरी.

लेखक—महादेवशास्त्री दिवेकर, मिरज.

कोल्हापूर आर्यसमाजाचे कर्तृत्ववान अध्यक्ष, राजाराम कॉलेजचे विद्वान प्रिन्सिपॉल, इतिहास संशोधक, विविध धर्मांचे तुलनात्मक अभ्यासी, हिंदुत्वनिष्ठ, आदरातिथ्यशील, सत्पात्रीं दान करणारे व आपल्या इष्ट कार्याकरितां पाण्यासारखा पैसा खर्च करणारे थोर गृहस्थ डॉ. बाळकृष्ण यांना दिवंगत होऊन एक वर्ष झालें. त्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं मला या थोर गृहस्थासंबंधीं जो आदर वाटतो तो व्यक्त करण्याकरितां व दक्षिण महाराष्ट्रांत त्यांनीं जें हिंदुधर्माचें कार्य केलें त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याकरितां ही शब्दसुमनांजली मी अर्पण करीत आहे.

कै० शाहू छत्रपतींनीं कोल्हापुरांत आर्यसमाजाला आश्रय दिला त्यावेळीं त्यांच्या ध्यानींमनींहि नसेल इतकी कामगिरी डॉ. बाळकृष्णांच्या अध्यक्षत्वामुळें आर्यसमाजाकडून झालेली आहे. डॉ. बाळकृष्ण १९२२ सालीं कोल्हापुरांत आले. त्यापूर्वीचें कोल्हापुरांतील वातावरण कसें होतें, सबंध दक्षिण महाराष्ट्रांत व महाराष्ट्रांत कोणत्या तऱ्हेचे विचारप्रवाह त्यावेळेस वाहत होते, ही पार्श्वभूमिका ध्यानांत घेतली म्हणजे डॉ. बाळकृष्णांचें कार्य किती उठावदार झालें याची कल्पना येईल.

डॉ. बाळकृष्णांची कामगिरी अनेकविध आहे. तिची थोडी माहिती मी पुढें देईनच. पण मला त्यांची कामगिरी विशेषत्वानें या प्रकारें जी दिसते ती म्हटली म्हणजे विशिष्ट विचारसरणीनें दूषित झालेलें अंतःकरण कसें शुद्ध करून समंजस लोकांना योग्य तऱ्हेनें विचार करण्यास शिकविलें हें होय!

डॉ बाळकृष्णाचा व माझा प्रथम परिचय ज्या प्रसगानें झाला तो कोल्हापुरच्या इतिहासात रोमाचकारी व अद्भुत असाच आहे. श्रीमत सरदार भाऊमहाराज पडित याच्या निमत्रणावरून मी श्री सिद्धेश्वर महाराजाच्या पुण्यतिथीनिमित्त प्रवचनास गेलों होतों. डॉ. बाळकृष्ण प्रवचनास आले होते, त्याना हें प्रवचन आवडलें. मे महिना असल्यामुळे आर्यसमाजातर्फे रामाचे पारावर व्याख्यानमाला चालू होती त्या मालेंतच त्यानीं माझीं व्याख्यानें करण्याचें ठरविलें. कोल्हापुरास आर्यसमाजी पुढाऱ्याचीं व्याख्यानें वरचेवर होतच असत परतु कोणाहि ब्राह्मण वक्त्याचीं व्याख्यानें त्या काळात तेथें न होऊ देण्याचा चग विशिष्ट वर्गानें बाधलेला होता १९२८ सालापूर्वी एका प्रसिद्ध प्रवचनकाराचा व प्रसिद्ध आहिताग्नीचा उपमर्द त्या वर्गानें करून त्याना पळवून लावलें होतें अशा परिस्थितींत डॉ बाळकृष्णानीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें मनोधैर्य दाखविल्यावर सबध कोल्हापुरचें वातावरणच उत्साही झालें. माझ्या व्याख्यानात हिंदु समाजाच्या दौर्बल्याची मीमासा मी करीत होतो व त्याला समर्थ होण्याकरिता शुद्धि, सघटना, अस्पृश्यतानिवारण, पोटजातींचें एकीकरण वगैरे विषय मी परिणामकारक तऱ्हेनें माडीत होतो. मी त्यावेळीं वाईस राहात होतो वाई–पुण्याकडील ब्राह्मण कोल्हापुरास येतो काय, रामाच्या पारावर व्याख्यानें देतो काय, तेथें गर्दी जमते ती काय, हें सर्वच विपरीत पाहून काहीं व्यक्तींनीं माझ्या व्याख्यानात व्यत्यय आणण्याचा चग बाधला उपवक्ते म्हणून जे भरमसाट बोलत, त्याचा यथास्थित परामर्श मी घेत असे त्याचा परिणाम श्रोत्यावर उत्तम होई व दररोज गर्दी वाढत असे व्याख्यानात व्यत्यय आणण्याकरिता त्यानीं पुष्कळ प्रयत्न केले रोज नव्यानव्या अफवा उठूं लागल्या, पण मी एका सरदाराचा पाहुणा होतो म्हणून व डॉ. बाळकृष्ण हे माझ्या व्याख्यानास रोज अध्यक्ष होते म्हणून प्रतिपक्षाचीं

मात्रा कांहीं चालली नाहीं. पहिल्या दिवशींच समाज पांच हजार होता, तो शेवटच्या दिवसापर्यंत फारच वाढला. सर्व पटांगण, दार, धर्मशाळेच्या गॅलऱ्या तर भरल्याच पण देवालयाच्या शिखरावरहि लोक चढून बसत. अस्पृश्यता निवारणावर मी परिणामकारक भाषण आदल्या दिवशीं केलें त्याचे वारा नाहनाने म्हणून भर सभेंत अस्पृश्याचें पाणी आणून देऊन तें पिण्यास मला सांगावयाचें व न प्यालों तर हा लुच्चा बामण म्हणून फजीती करावयाची असा प्रतिपक्षाचा थाट होता. डॉ. बाळकृष्णांनीं हें सर्व मला आगाऊच सांगितलें होतें व आम्हीहि योजना तयारीच होती. भर सभेंत त्यांच्या पुढाऱ्यानें आव्हान दिल्यावर ज्यानें पाणी आणलें त्याला मी विचारलें "तूं कोण आहेस?" तो म्हणाला, "मी अस्पृश्य आहे." मी म्हटलें, "जो स्वतःला अस्पृश्य समजतो त्याच्या हातचें पाणी आपत्ति असेल तरच प्यावें, ती नसेल तर पिऊं नये. पण जो पूर्वास्पृश्य हा स्वतःला स्पृश्य समजत असेल, जो सुसंस्कृत असेल व जो स्वतःला आर्य समजत असेल त्याच्या हातचें पाणी तो माझ्या संस्कृतीचा व बरोबरीचा असें समजून मी या क्षणास पिण्यास तयार आहे." असें म्हणताच गुरुकुलांतील एक पूर्वास्पृश्य तरुण एकदम पुढें आला, त्याला विचारताच तो म्हणाला, "मी वैदिक आहे, मी आर्य आहे, मी सुसंस्कृत आहे, माझे आईबाप अस्पृश्य होते, पण मी आर्यसमाजाच्या शिक्षणानें आर्य झालों आहे." असें म्हणताच टाळ्यांचा कडकडाट झाला व मी त्याच्या हातचें पाणी प्याल्याबरोबर 'आर्य धर्म की जय' म्हणून सर्वत्र जयघोष झाला. हा डाव परतून प्रतिपक्षावर उलटा केल्यामुळें जिकडे तिकडे डॉक्टरांचें नांव निघूं लागलें. कारण ही युक्ति त्यांची होती व तसें मनोधैर्य होतेंच. त्यानंतर फिरोजपुरास मोठी जनरल लायब्ररीमध्यें आणि अन्यत्र व्याख्यानें झालीं. तेथेंहि प्रो. घोष व डॉ. बाळकृष्ण हे येत होते. मी त्यांतही धर्म व स्वराज्याचा अन्योन्य, सामाजिक

विचाराचा प्रवचनकार याच नात्यानें गेलों होतो. पण विरोधी पक्षाच्या चळवळीमुळें आणि विशेषत. डॉ. बाळकृष्ण व सरदार पंडित याच्या सहाय्यामुळें मला एका मोठ्या पुढाऱ्याचा मान मिळाला आणि लोकजागृतीहि उत्तम झाली. ब्राह्मणसभेच्या वतीनें श्रीमत जोशीराव याचे वाड्यात मोठी सभा झाली. त्या सभेस कऱ्हाडचे कै. आप्पासाहेब आळतेकर हे उपस्थित होते ते म्हणाले, "पूर्वी कै. विजापुरकर व आम्ही असताना येथें अशा सभा होत. त्यानतर गेल्या तीस वर्षात अशा सभा झालेल्या नव्हत्या." या सर्व लोकजागृतीचें व प्रतिपक्षास चीत करण्याचें श्रेय डॉ. बाळकृष्ण यानाच आहे. तेव्हापासून बहुतेक दरसाल आर्य समाजाच्या वार्षिक उत्सवास मी व्याख्यानाकरिता जात आहे. आज मात्र कोल्हापुरातील सर्व मडळी माझी मित्र बनली आहेत. श्री. माधवराव बागल आणि इतर प्रागतिक विचाराचे लोक याचा आमचा परिचय झाला. हिंदुधर्मपरिषदेची पडशी कोल्हापुरास जो मी घेऊन गेलों ती याच सर्व मडळींच्या आधारावर होय! डॉ बाळकृष्ण त्यावेळी तेथें उपस्थित नव्हते, पण आर्यसमाजाचे साहा श्री. दाभोळकर प्रभृति कार्यकर्त्यांना झालें हें नमूद करावेंसें वाटते. त्यावेळीहि विघ्नाचे ढग उठलेले होते पण ते सर्व करवीर दरबारच्या चतुराईमुळे मावळले.

डॉ बाळकृष्ण हे पावसाळ्यात मिरजेस दोन महिने राहाण्यास येत. त्याचा दम्याचा उपद्रव पावसाळ्यांत वाढत असे. येथें मी त्याच्या भेटीस एकदोन वेळा जात असे स्वभाव गोड, आदरातिथ्यशील आणि प्रेमळ असा असल्यामुळें त्याचे चळवळीचे हिंदुधर्मासबंधीचे विचार ऐकण्यात व चर्चा करण्यात जो वेळ जाई तो फार मोलाचा वाटत असे. डॉ. बाळकृष्ण याचें घरींहि मी भोजनास उतरण्यास व त्याचे बरोबर एकदोन ठिकाणीं शुद्धिकार्य करण्यास व अस्पृश्यता निवारणास गेलो होतो. माणसाच्या

स्वभावाचे पैलू त्यांच्या निरनिराळ्या नात्यांच्या सहवासामध्यें कळून येतात. एकदा त्यांच्या मोटारींतून श्री. मादक, मी, ते स्वतः असे रेंदाळ व इतर दोनतीन खेड्यांत गेलों होतो. महारवाडे व मांगवाडे यांत मोटार जातांच लोकांना आपला कोणी त्राता आला असें वाटे. एका ठिकाणीं भोजनास वेळ नव्हता म्हणून आम्ही अस्पृश्याच्या हातचा चहा घेतला. त्यामुळें त्या लोकांना फार बरें वाटलें. दुसऱ्या गांवीं जाऊन उघड्या जागेंत व्याख्यान देऊन फराळ भोजन उरकून कोल्हापुरास येण्यास रात्रीं एक वाजला. डॉ. बाळकृष्णांना आपली प्रकृति काम करूं देत नाहीं म्हणून फार वाईट वाटे. ते मोटारींत म्हणत कीं रोज सायंकाळीं एक दोन गॅलन पेट्रोल खर्चून मी शुद्धि व अस्पृश्यता निवारणाचें कार्य करण्यास सिद्ध आहे. पण माझी प्रकृति मला तें काम करूं देत नाहीं व मी असा बाहेर रोज जाऊं लागलों तर माझी सौभाग्यवती मला घरांतहि येणार नाहीं. ते म्हणत, सौ. राधाबाई या सारख्या जपतात म्हणून इतकी माझी प्रकृति आहे. भर थंडीच्या दिवसांत रात्रीं एक वाजतां घरीं गेल्यावर भीतभीतच ते बंगल्याच्या दाराशीं गेले व पत्नीला म्हणाले, "तुम्ही आतां मला घरांत घेणार नाहीं, पण मला उशीर का झाला हे शास्त्री महाराज सांगतील." नंतर आम्ही दोघे येऊन येऊन झोपीं गेलों, पण डॉक्टर पहाटे उठून आपल्या कॉलेजच्या कामास लागलेलेच होते !

डॉ. बाळकृष्णांची प्रकृति बेतानाची असतांना त्यांच्याकडून विविध तऱ्हेची जी भरीव कामगिरी झाली, तिचें श्रेय पुष्कळ अंशीं त्यांच्या कर्तव्यदक्ष पत्नी राधाबाई यांजकडे आहे. सुगृहिणी आणि दक्ष सहधर्मचारिणी असली म्हणजे संसार कसा सुखाचा होतो, याचें उदाहरण म्हणजे डॉक्टर बाळकृष्ण होत.

डॉ. बाळकृष्ण हे आर्यसमाजाचे सभासद झाल्यापासून त्यांच्या कारकिर्दीत जवळ जवळ पांच हजार लोकांची शुद्धि झालेली आहे. ही

शुद्धि नुसती झाली असेंच नसून ती पचनिलीहि गेलेली आहे. कोल्हापूर, सांगली, मिरज, बेळगाव, रत्नागिरी, सातारा अशा या सर्व दक्षिण महाराष्ट्राचे टापूंत स्वामी श्रद्धानंदाप्रमाणें धडाडीनें जर शुद्धिकार्य कोणी केलें असेल तर तें खचीत आर्यसमाजानेंच होय! शिकलेल्या लोकांत न आढळणारे सद्गुण म्हणजे धडाडी आणि जाज्वल्य धर्मनिष्ठा हे होत डॉक्टरसाहेब या गुणांनीं युक्त होते म्हणूनच त्यांच्या हातून शुद्धीचें कार्य झालें व तें करीत असताना खुनाच्या धमकीचीं पत्रेंहि त्यांना वाचावीं लागलीं प्रथम प्रथम ते खिशात रिव्हॉल्वर ठेवून हिंडत असत माझ्या व्याख्यानास ते जेव्हा अध्यक्ष होते, तेव्हा रोज त्यांच्या खिशात रिव्हॉल्वर असे पण पुढें पुढें त्यांना या धमकी पत्रांचें काहींच वाटेनासें झालें अर्थात् ते शस्त्र जवळ ठेवण्याबद्दलहि दुर्लक्ष करू लागले. डॉक्टर महाशयानीं दक्षिण महाराष्ट्रात आर्यसमाजाचें द्वारें जें शुद्धिकार्य केलें त्यास श्रीमन् क्षात्रजगद्गुरु, श्री. दाभोळकर, श्री. दामुअण्णा जोशी प्रभृतींचें बरेंच साह्य झालेलें आहे हें विसरता कामा नये. कोणतेंहि कार्य एक व्यक्ति करू शकत नाहीं. या कार्यास अनेकांचें साह्य लागतेंच. हें ध्यानीं घेऊनहि डॉ बाळकृष्णाची कामगिरी उल्लेखनीय आहे.

कोल्हापूर दरबारनें अस्पृश्यता निवारणाचा कायदा केला, तथापि लोकांकडून अस्पृश्यांना त्रास होई म्हणून डॉ. बाळकृष्ण यानीं ठिकठिकाणीं जाऊन स्पृश्य लोकांचें मतपरिवर्तन केलेलें आहे.

डॉ बाळकृष्ण हे आर्यसमाजी होते, पण त्यांचे विचार केवळ सत्यार्थप्रकाश वाचूनच निश्चित झालेले नव्हते त्यानीं हिंदुधर्माचे मूलग्रंथ मूलग्राही दृष्टीनें वाचलेले होते तत्त्वज्ञानाचा व धर्माचा त्यानीं तुलनात्मक अभ्यास केलेला होता जागतिक वक्ता डॉ. जोन्स हा हिंदुस्थानात आल्यावेळी त्याचें एक व्याख्यान डॉ. बाळकृष्ण याचें अध्यक्षतेखालीं झालें.

त्यावेळीं बायबलांतील वचनें हीं वेदवचनांशीं कशीं सदृश आहेत, तीं वेदोच्छिष्ट कशीं आहेत, हें त्यांनीं अनेक वेदवचनें मांडून सिद्ध केलें. वैदिक धर्म फार उज्ज्वल आहे व त्यांतील तत्त्वें लोकांना पटून तीं व्यवहारांत उतरविलीं पाहिजेत असें ते म्हणत.

म. गांधींच्या उपोषण प्रसंगीं महालक्ष्मीचें देवालय अखिल हिंदूंना दर्शनाकरितां मोकळें व्हावें म्हणून डॉक्टरसाहेबांनीं प्रामुख्यानें खटपट केलेली होती.

डॉक्टरसाहेब अमेरिकेंत असतानाच मिस् मेयोच्या विषारी पूर्वग्रहाचें पुस्तक बाहेर पडलें. डॉक्टरांनीं तेथेंच व्याख्यानामध्यें निरनिराळ्या तऱ्हेनें बाईंच्या विधानांचा खरपूस समाचार घेतला हें सांगावयास नकोच. डॉ. बाळकृष्ण हे चांगले वक्ते होते. त्यांचीं व्हाऊ वृत्तीचीं दोन तीन इंग्रजी भाषणें मी ऐकलेलीं आहेत. विद्वत्ता, आवेश व निश्चर कोटिक्रम यामुळें त्यांचीं व्याख्यानें परिणामकारक होत असत.

संशोधक म्हणून, इतिहास लेखक म्हणून, परीक्षक म्हणून, शिक्षण शास्त्रज्ञ म्हणून डॉक्टरांची कामगिरी विविध तऱ्हेची आहे. त्या सर्व कामगिरीवर प्रकाश पाडणारे अधिकारी लेखक आहेतच. मी कोल्हापुरचा रहिवासीहि नाहीं आणि इतर नात्यानें त्यांचा माझा संबंधहि आलेला नाहीं. एक हिंदुत्वनिष्ठ, परिवर्तनवादी प्रचारक व व्याख्याता या नात्यानें त्यांचा व माझा संबंध आला. त्या नात्यानें बोलावयाचें म्हणजे महाराष्ट्रांत आर्यसमाजाचें हें भरीव कामगिरी करणारा हा पहिला थोर पुरुष होय, असें मला वाटतें. महाराष्ट्रांत आर्यसमाजाबद्दल विशेष अपसमज पूर्वी होता हें निबंधमालेंतील टीकेवरून दिसतें. पण आज हिंदुत्वनिष्ठ हिंदुसमाज दयानंदप्रणीत मार्गावरच चाललेला आहे व तो मार्गच हिंदु समाजाला परिणामीं हितकर आहे हें दाखविण्याचें कार्य डॉ. बाळकृष्ण या थोर गृहस्थानें केलें याबद्दल आदर वाटतो.

---

# चित्रकलेचे भोक्ते 'डॉ॰ बाळकृष्ण'

लेखक –रा. ब. एम्. व्ही. धुरंधर, ए. एम्., एफ्. आर्. एस्. ए., मुंबई.

राजाराम कॉलेजमध्ये स्थापन झालेल्या 'आर्ट सर्कल' चें पहिलें प्रदर्शन इ. स. १९३९ च्या जानेवारी महिन्यात ७ तारखेस उद्‌घाटन करण्याचें ठरलें होतें. त्याप्रमाणें त्या प्रदर्शनाचे चिटणीस श्रीमत कु॰ इंदुताई राजे पंडित यांचेकडून मला त्या उद्‌घाटन समारंभास हजर राहण्यास लिहून आलें होतें. श्रीमत इंदुताई पंडित यांचे वडील श्रीमत बाळामहाराज पंडित चित्रकार, हे माझे परम स्नेही असल्याकारणानें मला तें आमंत्रण नाकारतां येईना. म्हणून प्रदर्शनांतील चित्रें व इतर कलाकुसरीचीं कामें तपासून बक्षिसें ठरविण्याचें काम व प्रदर्शन उद्‌घाटन करण्याचें मी कबूल केलें. (त्यावेळीं मजजवळ कांहीं वॉटरकलरचीं चित्रें असल्यास बरोबर आणावीं असा श्रीमत इंदुताई यांचा आग्रह पडला. कारण अशीं चित्रें इकडे विद्यार्थी वर्गास सहज पहाण्यास मिळाली तर तीं त्यांच्या पुढील कार्यक्रमास मार्गदर्शक होतील अशी मागणी आल्यामुळें व त्यांची ती कल्पना मला योग्य वाटल्यावरून मी कोल्हापुरास जातेवेळीं चाळीस वॉटर कलरचीं चित्रें बरोबर घेऊन गेलें आणि तीं प्रदर्शन व्यवस्थापकांच्या स्वाधीन केलीं. ज्या दिवाणखान्यात प्रदर्शन भरविलें होतें तेथेंच एका भिंतीवर माझीं चित्रें एकत्र टांगलीं गेल्यामुळें तीं सर्व शोभून दिसत होतीं, व प्रेक्षकांचें लक्ष वेधून घेत होती.)

ता. ७ जानेवारीचा सकाळचा कार्यक्रम बक्षिसें ठरविण्यात गेला व प्रदर्शनाचें उद्‌घाटन सायंकाळीं होणार होतें.

इतका वेळ मला असें वाटत होतें कीं हा प्रदर्शनाचें कार्यकर्तृत्व कॉलेजचे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांनीच जुळवून आणलें असावें.

कारण डॉ. बोस यांच्याखेरीज कोणीही अध्यापक मंडळींपैकीं प्रदर्शनाचें दिवाणखान्यांत दिसले नाहींत. तेव्हां विद्यार्थिवर्गांनीं सुरू केलेला हा नूतन उपक्रम प्रशंसनीयच वाटला. पण कॉलेजांतील विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांच्या मागें त्यांना चित्रकलेच्या अभ्यासाची अभिरुचि प्रगट करणारी आणि उत्तेजन देणारी श्रेष्ठ विभूति स्वतः कै. प्रिन्सिपॉल डॉक्टर बाळकृष्ण हेच होत असें लवकरच समजून आलें. सायंकाळीं राजाराम कॉलेजहॉलमध्यें जेव्हां माझें स्वागत करण्यासाठीं प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण आणि डॉ. बोस हे कॉलेजच्या पायऱ्यांवर उभे राहिलेले दिसले आणि त्यांनीं अत्यादरानें मला व्यासपीठावर नेऊन बसविलें तेव्हां डॉक्टर बाळकृष्णांस पाहण्याचा व भेटण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. त्यांची ती भव्य सडसडीत मूर्ती, पंजाबी फेटा, रुबाबदार प्रे सूट आणि विद्वत्तापूर्ण चेहरा पाहून आनंदच वाटला.

त्यांनीं राजाराम कॉलेजसंबंधीं त्रोटक माहिती, आर्ट सर्कलबद्दल उद्भवलेली कल्पना आणि आपल्या विद्यार्थ्यांनीं केलेला प्रयत्न मोकळ्या मनानें मला सांगितला. आर्ट सर्कलचे प्रेसिडेंट डॉ. बोस यांनीं प्रदर्शनासंबंधीं माहिती, प्रिन्सिपॉल आणि प्रोफेसर यांनीं चित्रकलेच्या अभ्यासास दिलेलें प्रोत्साहन आणि उत्तेजन यांचें वर्णन करून आपलें भाषण आटोपून मला प्रदर्शन उद्घाटन करण्यास सांगितलें. माझ्या भाषणांत पन्नास वर्षांपूर्वीचें राजाराम कॉलेज आणि हायस्कूल यांचा निकट संबंध आणि त्यावेळचे प्रिन्सिपॉल क्यांडी यांनीं हायस्कुलास लावून दिलेली शिक्षण पद्धत आणि ड्रॉइंग शिक्षणाची सुरुवात वगैरे माहिती मी सांगितली होती; आणि हल्लींचे प्रिन्सिपॉल डॉक्टर बाळकृष्ण यांच्या सहानुभूतीनें आणि उत्तेजनानें प्रस्थापित झालेलें जें 'आर्ट सर्कल' त्याचें अभिनंदन करण्याचें म्हणजेच प्रिन्सिपॉल

डॉक्टरसाहेबांचा गौरव केला पाहिजे असें मी सांगितलें. आर्टस् कॉलेजशीं फाईन आर्टची जोड करावी ही उच्च कल्पना डॉक्टरसाहेबांच्या औदार्यसंपन्न अंतःकरणानें जी पुढें आणली व विद्यार्थ्यांस जें प्रोत्साहन दिलें त्याचें कौतुक जितकें करावें तितकें थोडेंच असें मला वाटलें. माझें भाषण आटोपल्यानंतर प्रिन्सिपॉल डॉक्टरसाहेबांनीं प्रदर्शनांत यशस्वी झालेले विद्यार्थी आणि विद्यार्थिनी ह्यांना बक्षिसें वाटावयाचीं तीहि माझी कन्या कुमारी अंबिका धुरंधर जी. डी. (आर्ट) एफ्. आर. एस्. ए. हिजकडून देवविलीं. बक्षिसें वांटून झाल्यावर प्रिन्सिपॉल डॉक्टरसाहेबांचें भाषण फारच मार्मिक आणि प्रशंसनीय झालें. चित्रकलेबद्दल अत्यंत आवड आणि आपल्या विद्यार्थ्यांनीं फुरसतीचे वेळीं निसर्गावरून चित्रकलेचा अभ्यास सदोदित करावा ह्या हेतूनें त्यांच्या चित्रांचें प्रदर्शन कोल्हापुरांतील जनतेपुढें मांडून त्यावद्दल तज्ञांचें काय मत आहे हें दर्शविण्यासाठीं आजच्या प्रसंगीं मला आमंत्रित केलें होतें असें सांगितलें. राजाराम कॉलेजचें हें पहिलेंच प्रदर्शन आणि माझी निवड करण्याचा उद्देश असा होता कीं, मी एक जुना राजारामियन व सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट मधील विद्यार्थी, अध्यापक, इनस्पेक्टर ऑफ ड्रॉइंग अँड क्राफ्ट वर्क, प्रोफेसर ऑफ पेंटिंग आणि डायरेक्टर ऑफ सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट म्हणूनच तज्ज्ञ असें सांगून त्यांनीं माझा गौरव केला. माझी चित्रकला राजाराम कॉलेजांतील विद्यार्थ्यांस नेहमीं आदर्शवत ठेवण्यासाठीं प्रदर्शनांत ठेवलेलीं माझीं सर्व चित्रें राजाराम कॉलेजास अर्पण करावी अशी मागणी केली. माझ्या चित्रांची अत्यंत प्रशंसा करून तीं राजाराम कॉलेजास मिळाल्यास एका दालनांत रीतीनें व्यवस्थित टांगून त्याला 'धुरंधर ग्यालरी' अशी संज्ञा देण्याचें आपण निश्चित केलें आहे असेंहि सांगितलें. राजाराम कॉलेजच्या उत्कर्षाबद्दल

आणि चित्रकलेबद्दल डॉक्टर साहेबांच्या मनांत वसत असलेली कळकळ आणि म्हणून प्रेमळ अंतःकरणानें सांगितलेला हा उद्देश ऐकून डॉक्टर साहेबांस खुष करण्याकरितां त्यांची मागणी मला नाकारतां येईना. म्हणून मीं तीं सर्व चित्रें राजाराम कॉलेजला समर्पण केलीं. मजकडून आश्वासन मिळाल्यावर डॉक्टरसाहेबांस फार आनंद झाला. आणि कोल्हापुरांतील माझ्या चार दिवसांचे मुक्कामांत डॉक्टरसाहेबांनीं माझा बराच सन्मान केला. राजाराम कॉलेजमध्यें, आर्ट सर्कलमध्यें आणि खतः डॉक्टरसाहेबांनीं आपल्या बंगल्यांत आमंत्रित करून जे समारंभ घडवून आणले ते सर्व चिरस्मरणीय झाले आहेत. त्यांचे बंगल्यावरील समारंभाचे वेळीं त्यांनीं आपल्या कन्येकडून गायनाच्या दोन तीन सुस्वर चिजा म्हणवून दाखविल्या. ह्यावरून डॉक्टरसाहेबांची गायनकलेकडे आवड किती होती हेंही कळून आलें. गायन व चित्रकला ह्याविषयीं त्यांना एवढी आवड असेल ही मला कल्पनाही नव्हती. पण कोल्हापुरांतील माझ्या एका मित्रानें डॉक्टरसाहेबांबद्दल जी विस्तृत माहिती दिली त्यावरून त्यांचें लक्ष प्रत्येक बाबतींत पराकाष्ठेचें होतें असें कळून आलें. धार्मिक आणि शैक्षणिक बाबतींत त्यांनीं उत्कृष्ट तन्हेनें केलेल्या प्रगतीची संपूर्ण माहिती मला सांगितली. शिक्षण-प्रसाराबद्दल उत्कट इच्छा व संशोधक वृत्ती ह्यांबद्दल डॉक्टरसाहेबांनीं जी तीव्र तपश्चर्या स्वीकारली होती त्यामुळें कोल्हापूर ऐश्वर्यसंपन्न होऊन मुंबई इत्यादींतील सर्व शिक्षणसंस्थेंत अग्रगण्य होऊन राहिलें.

आपल्या विद्यार्थ्यांच्या हलचालीबद्दल कळकळ आणि प्रेम किती होतें ह्याबद्दल माझे अनुभवास आलेली एक गोष्ट मला येथे नमूद करण्यासारखी वाटते ती अशी:—आर्ट सर्कलच्या प्रदर्शनानंतर मी मुंबईस परत आल्यावर कोल्हापुरांतील माझ्या एका मित्रानें आपला मुलगा

राजाराम कॉलेजमध्यें शिक्षण घेत असून पुढील टर्ममध्यें त्याचे फीमध्यें सूट होण्यास जर मजकडून एखादें शिफारसपत्र मिळेल तर बरेंच कार्य होईल असें लिहून आल्यामुळें मी त्यास एक शिफारसपत्र लिहून पाठविलें. तें त्या विद्यार्थ्यानें डॉक्टरसाहेबांस सादर करतांच त्याची फी माफ झाली. केवढें औदार्य आणि मनाचा चांगुलपणा!! माझे चार दिवसाचे सहवासानें माझ्या शब्दास मान मिळेल असें जरी वाटलें नव्हतें तरी आपल्या शिफारसपत्राचा सर्वोत्कृष्ट उपयोग झाला असें माझे मित्रानें लिहून कळविल्यावर मला संतोषच वाटला.

डॉक्टरसाहेबांचे बंगल्यावर मला, मिसेस धुरंधर आणि माझी बन्धी अविरा यांना चहास बोलावलें असतां मिसेस बाळकृष्ण यांनी आम्हां त्रिवर्गांचा जो अगत्यपूर्वक पाहुणचार केला, त्यामुळें त्यांचेबद्दल आम्हां त्रिवर्गांस आपुलकी वाटू लागली. त्यानंतर एक वर्षानें डॉक्टरसाहेब मिसेस हवा पालटण्याकरितां आले असतां आम्हां त्रिवर्गांचा मुक्काम मिरजेसच होता त्यांच्या समाचारास जाण्याचा आम्ही निश्चय केल्यावर असें कळलें की, डॉक्टरसाहेबांस कुणाबरोबर बोलूं देत नाहींत, त्यांनी स्वस्थ निजून रहावें असें तज्ञाकडून सांगणें होतें. पण बाहेरूनच एखादें दर्शन घेऊन तसेंच परतावें अशाच निश्चयानें गेलों होतो. त्यांच्या खोलीच्या दारांत आम्हांस उभें पाहून डॉक्टरसाहेब एकदम उठून बसले आणि आमचें स्वागत करून सुमारें एक तास आमच्याबरोबर एकसारख्या गोष्टी करीत बसले. प्रकृतीच्या अशा स्थितींतसुद्धां त्यांच्या चर्येवरील तेज राजाराम कॉलेज दिसत असून त्यांच्या अविश्रांत उत्साहाबद्दल किंचित जाणीवही पाहून मलाही मोठें आश्चर्य वाटे. आमचे फार वेळ बसण्यानें डॉक्टरसाहेबांस त्रास होईल म्हणून आम्ही उठून परतावें असा प्रयत्न करेपर्यंत वेळ तरी डॉक्टरसाहेबांचे सूचनेवरून

'मिसेस बाळकृष्ण यांनीं आम्हांला चहा दिल्याशिवाय सोडलें नाहीं. तीच आमची शेवटची भेट! तरी त्यांची प्रकृती लवकर सुधारून पूर्ववत् सर्व झाळचाली करूं शकतील असें त्यावेळेस आम्हांस खात्रीनें वाटलें होतें.

पण २३ आक्टोबर, १९४० चे टाईम्समध्यें डॉक्टरसाहेबांच्या दुःखदायक निधनाची वार्ता वाचून आम्हां त्रिवर्गाच्या मनास धक्का बसून नेत्रांवाटें अश्रू आले आणि कोल्हापुरांतील एक प्रेम करणारी श्रेष्ठ विभूति एकदम नष्ट झाली असें वाटून त्यांनीं आणि मिसेस बाळकृष्ण यांनीं केलेला परामर्श आमचे दृष्टीसमोर उभा राहिला. कोल्हापुरचें आणि राजाराम कॉलेजचें मोठें दुर्भाग्य की असें सर्वोत्कृष्ट विद्वत्‌रत्न आणि दयाळु प्रिन्सिपॉल नाहींसे झाले.

आर्ट सर्कलनें योग आणून कै० डॉक्टरसाहेब आणि मिसेस बाळकृष्ण यांच्या भेटी करवून दिल्या आणि त्यांच्या सानिध्यांत जो अल्प काळ आम्हांस सुखमय वाटला तो स्वप्नवत् भासूं लागला. पण कै० डॉक्टर-साहेब व मिसेस बाळकृष्ण यांच्या प्रेमळ आणि उदात्त स्वभावांची आठवण आम्हां त्रिवर्गास नेहमीं होत असते.



# डॉ. बाळकृष्णांचें शैक्षणिक कार्य

लेखक—श्री. कृ. ना. देशपांडे, बी. ए., एल्एल्. बी.,
एस्. टी. सी., बी. टी., सातारा.

सुमारें दीड वर्षांपूर्वी मी पुण्याहून कोल्हापुरास आगगाडीनें येत होतो. मी ज्या डब्यांत बसलो होतो त्याच डब्यांत उत्तर हिंदुस्थानांतील दोन तरुण बसलेले होते. त्यांच्या हिंदुस्थानी बोलण्यावरून ते कोल्हापुरसंबंधीं बोलत असावेत असें मला वाटलें. तेव्हां मी त्यांना सहजच इंग्रजींत विचारलें, "काय, तुम्हांस कोल्हापुरास जावयाचें आहे वाटतें?" हा प्रश्न विचारतांच साहजिकच त्यांनीं मी कोल्हापुरकडचा असावा असें ताडलें आणि उत्तर दिलें, "होय".

"तुम्ही इतक्या लांब कोल्हापुरास कां जात आहां?" मी त्या दोघां पाणिदार गौरकाय युवकांस विचारिलें.

"ट्रेनिंग कॉलेजसाठी."

"तुमच्या इकडे सोय नाहीं काय?"

"तशी असती तर मग इकडे येण्याची आवश्यकता का भासली असती?"

त्याचे मागें कोल्हापूर येईपर्यंत गाडींत कोल्हापुरसंबंधीं पुष्कळ बोलणें झालें. आणि कोल्हापुरच्या महाराणी ताराबाई टीचर्स ट्रेनिंग कॉलेज, लॉ कॉलेज व राजाराम कॉलेज इत्यादि उच्च शिक्षणसंस्थांची माहिती त्यांना दिली आणि मलाही कोल्हापुराकडे पाहण्याची नवी दृष्टि प्राप्त झाली. स्टेशनवर उतरतांच पुनः भेटण्याचें वचन देऊन मी त्यांचा निरोप घेतला आणि टांग्यांतून घरीं निघालों. माझ्या मनांत एकच विचार सारखा घोळत

होता. 'काश्मीरसारख्या हिंदुस्थानच्या उत्तर टोंकाहून कोल्हापुरसारख्या दूरच्या ठिकाणीं लोक शिक्षणासाठीं यावेत, त्याअर्थी कोल्हापूर हें प्रमुख शिक्षणकेंद्र करण्यास कोणत्या प्रमुख व्यक्तीचें कर्तृत्व कारणीभूत झालें असावें ?'

आणि मग विचार करतांना सहजच माझ्या डोळ्यापुढें एक महान् व्यक्ति उभी राहिली. ज्या महाव्यक्तीच्या–विभूतीच्या हाताखालीं शिक्षणाचा सहस्रों विद्यार्थ्यांना लाभ झाला, जिला कॉलेजमध्यें असतांना रोज पहात होतों, कित्येक प्रसंगीं घरीं भेटण्याचा प्रसंग आला, जिच्या अगाध ज्ञानमय वक्तृत्वाचा हिमालयीन प्रपात वारंवार ऐकला, आणि जिनें कोल्हापूर प्रजाजनांना, दक्षिण महाराष्ट्राला, नव्हे निखिल महाराष्ट्राला शिक्षित करून सोडलें आणि महाराष्ट्रांत कोल्हापुरची विशिष्ट शिक्षणपरंपरा सुरू केली ती विभूति म्हणजे डॉ. बाळकृष्ण होय हें मला सांगायला पाहिजे !

महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाचें प्रमुख शिक्षणकेंद्र असें नामाभिधान कोल्हापुरास प्राप्त होण्यास डॉ. बाळकृष्णांचे अविश्रांत परिश्रम, आस्था, तळमळ इ. कारणीभूत कसे झाले हें कळण्यास कोल्हापुरचा थोडा पूर्वीचा इतिहास पाहिला पाहिजे.

स. १९१८ सालीं कोल्हापुरच्या सरकारी गॅझेटमध्यें असें प्रसिद्ध झालें कीं, "राजाराम कॉलेज हें दीड वर्षाच्या आंत सरकारकडून बंद केलें जाईल." अर्थात् कोल्हापुरची शैक्षणिक प्रगतीच बंद होणार असा पेच येऊन पडला. यास कारणेंही तशीच होतीं. राजाराम कॉलेज म्हणजे प्रीव्हियस व इंटरचे वर्ग शिकविणारें दुय्यम दर्जाचें कॉलेज, विद्यार्थ्यांची संख्याही कमी. एकंदरीत निरुत्साहाचें वातावरण. स. १८८० सालापासून १९१८ पर्यंत ३८ वर्षांत कॉलेजची विशेष प्रगति होऊं शकली नाहीं. कै. शाहू छत्रपति महाराजांनीं हें कॉलेज मिशनरीस

आलेलें पाहिलें तेव्हां त्यांचा विचार तें बंद तरी करावें किंवा दुसऱ्या एखाद्या संस्थेच्या ताब्यांत तरी द्यावें असा होता. सुदैवाची गोष्ट अशी कीं, कै. शाहू महाराजांनीं मोठ्या दूरदर्शी विचारानें राजाराम हायस्कूल आणि राजाराम कॉलेज या दोनही संस्था संयुक्तप्रांतीय आर्यप्रतिनिधिसभेच्या ताब्यांत दिल्या; आणि या वेळेपासून आर्यसमाजाच्या आधिपत्याखालीं कोल्हापुरच्या शैक्षणिक नौकेचें सुकाणूं राजाराम कॉलेज प्रिन्सिपॉलच्या हातीं आलें. आणि याच वेळेपासून कोल्हापुरच्या शिक्षण प्रगतीच्या नौकेला निराळी दिशा लागली आणि खरी सुधारणा व प्रगति होण्यास सुरवात झाली.

१८८० सालीं प्रीव्हियसच्या वर्गानें राजाराम कॉलेजची स्थापना आणि सुरवात झाली. १८८३ सालीं इंटर आर्टस् वर्ग उघडण्यांत आला. यावेळीं विद्यार्थ्यांची संख्या पाव शतकाच्या आंतबाहेर होती, त्यानतर दिल्ली दरबारच्या वेळीं सवा शतकापर्यंत गेली. आर्यसमाजाच्या ताब्यांत राजाराम कॉलेज गेलें त्यावेळेस १७० इतकीच विद्यार्थ्यांची संख्या होती. १९२० सालीं बी.ए.चे वर्ग सुरू करण्यांत आले. १९२२ पासून ऑनर्स कोर्स सुरू करण्यात आला. या वर्षी आर्यसमाजातर्फे डॉ. बाळकृष्णाची राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून नेमणूक झाली आणि याच वर्षी कै० सर राजाराम महाराज हे कोल्हापुरच्या सिंहासनावर आरूढ होऊन त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं. याच डॉ. बाळकृष्ण व सर राजाराम महाराज या चंद्रसूर्यांच्या कारकिर्दीत कोल्हापुरचा शिक्षणवृक्ष फोंफावला आणि त्यापासून उच्च शिक्षणाचीं अमृतफळें हिंदवासियांस चाखावयास मिळूं लागलीं आहेत.

यावेळीं राजाराम कॉलेजमध्यें नुकताच बी. ए. चा शिक्षणक्रम सुरू करण्यांत आला होता. उच्च शिक्षणास अद्यापि विद्यार्थी पुण्यासच जात होते; राजाराम हायस्कूल, प्रायव्हेट व सिटी हायस्कूल आणि विद्यापीठ याच काय त्या इंग्रजी शाळा होत्या. एकंदरीत कोल्हापुरचा शिक्षणदीप

मंद तेवत होता. इतक्यांत डॉ. बाळकृष्णांचें आगमन झालें. त्यांनीं सर्व परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन आणि अभ्यास केला आणि भावी कार्याची दिशा ठरविली. हा काळ म्हणजे अव्यवस्थेचा, संशयास्पद मनोभूमिकेचा, कोल्हापुरच्या राजकीय घडामोडीचा व शैक्षणिक अस्थिरतेचा होता. त्यावेळीं डॉ. बाळकृष्णांना दरबाराशिवाय सहाय्य कोणाचेंच नव्हतें. स्वतः पंजाबी, आर्यसमाज परकीय, त्याचीं मतें त्यावेळीं न पटण्यासारखीं; सर्वत्र निराशेचें व असहकारितेचें वातावरण. या अंधःकारांतून डॉ. बाळकृष्णांनीं धैर्यानें मार्ग काढण्याचें ठरविलें आणि राजाराम कॉलेजच्या प्रिन्सिपॉलपदाचीं सूत्रें हातीं घेतलीं.

१९२२ सालीं सन्मान्य शिक्षणक्रम ( ऑनर्स कोर्स ) सुरू करून त्याची आनुषंगिक सिद्धता केली. अभ्यासविषय वाढविण्यांत आले, नवीन विद्वान प्राध्यापक नेमण्यांत आले. १९२७सालीं, इंटर सायन्सचा, १९३० सालीं बी. एस्सी.चा अभ्यासक्रम सुरू करण्यांत आला. सध्यां कॉलेजमध्यें एम्. ए., एम्. एस्सी. पर्यंत बहुतेक सर्व अभ्यासविषयांचें शिक्षण देण्यांत येत आहे. १९३१ सालीं सुवर्ण महोत्सवाचे वेळीं राजाराम कॉलेज स्वयंपूर्ण झालें. आणि राजाराम कॉलेजची आणि एकंदर कोल्हापुरची शैक्षणिक प्रगति एकदम झपाट्यानें व्हावयास सुरवात झाली कीं, डोंगर पर्वताच्या कड्यावरून पाण्याचे प्रपात जोरानें पडावेत आणि ते दौडत जाऊन पुढें नदीस मिळतात त्याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या संख्येंत, अभ्यासक्रमांत, प्राध्यापकांत, इमारतींत वाढ होऊन राजाराम कॉलेजच्या सुवर्ण महोत्सवाच्या वेळीं कोल्हापुरच्या शिक्षणप्रगतीच्या गंगेस प्रशांत आणि आनंददायक प्रवाहाचें स्वरूप प्राप्त झालें. आणि हजारों विद्यार्थी मनोमुक्त ज्ञानगंगेत डुंबूं लागले.

स्थापनेपासून ४० वर्षे राजाराम कॉलेज दुय्यम दर्जाचें ( इंटर आर्टस् पर्यंत ) होतें तें आज दहा वर्षांत डॉ. बाळकृष्णांचे नेतृत्वाखालीं

शहरात एक मुलींचें स्वतंत्र हायस्कूल, मुलांचीं नऊ हायस्कुलें व तीन मिडलस्कुलें अशीं भरभराटीस आलीं या व्यतिरिक्त गडहिंग्लजास एक सरकारनें हायस्कूल बनविलें. वडगाव, जयसिंगपूर, कोडोली इत्यादि ठिकाणीं मिडलस्कूल्स निर्माण होऊन वाढत्या विद्यार्थी संख्येमुळें नवीन वर्ग निघत आहेत तसेंच ब्रिटिश मुलखात संकेश्वर येथें एक मिडल स्कूल आर्यसमाजातर्फे डॉ बाळकृष्णा या नेतृत्वाखालीं चालू आहे आणि वेंगुर्ल्याचें हायस्कूल ताब्यात घेऊन चालविण्याचा डॉ बाळकृष्णाचा विचार होता व सर राजाराम महाराज यांच्या उदार धोरणाचा व डॉ बाळकृष्णाच्या शैक्षणिक कार्यधडाडीचा परिणाम कोल्हापुरच्या जहागिरीवर व दक्षिण महाराष्ट्रावर होऊन तेथें देखील शैक्षणिक प्रगति बरीच झाली आहे.

माध्यमिक शिक्षणाचा व उच्च शिक्षणाचा प्रसार वाढत गेला. प्रवेश परीक्षा, इटर आर्टस्, इंटर सायन्स या परीक्षांचीं केंद्रें डॉ बाळकृष्णांनीं कोल्हापुरास आणलीं कोल्हापूर बी ए परीक्षा केंद्र व्हावें म्हणून त्यांनीं पुष्कळ खटपट केली आणि ते अधिक जगते तर ही गोष्ट त्याच्या इतर कार्याप्रमाणें सफल झाली असती ते मुंबई विद्यापिठाच्या निवडून आलेले सभासद असल्यामुळें त्यांच्याकडून विद्यापिठामध्यें राजाराम कॉलेजची प्रतिष्ठा वाढविण्याचें कार्य झालें आहे ते बी ए, एम् ए चे पुष्कळ वेळा परीक्षक होते त्यांच्या सीनेट सभासदत्वाचा फायदा कोल्हापुरच्या शैक्षणिक प्रगतीस निःसशय झाला आहे

राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून त्यांची कामगिरी जशी संस्मरणीय झाली तशीच माध्यमिक शिक्षणाचे इन्स्पेक्टर म्हणूनही झाली सेकंडरी टीचर्स असोसिएशनच्या विद्यमानें कोल्हापूर माध्यमिक शिक्षकांची परिषदही प्रथमच भरली आणि एकदरीत माध्यमिक शिक्षणाचा गाडा बैलगाडीच्या वेगानें चालण्याच्या ऐवजीं मोटारगाडीच्या वेगानें धांवू लागा-

या परिषदेचा परिणाम प्राथमिक शिक्षणावर होऊन प्राथमिक शिक्षकांची संमेलनें पेटानिहाय भरू लागलीं. वर्षादोनवर्षांच्या अंतरानें रिमेशरवरही प्राथमिक शिक्षणोन्नतीसाठी उघडण्यास येऊ लागलें. चांगल्याचा परिणाम चांगलाच होतो म्हणतात तो असा. आणि एकंदरीत कोल्हापूर संस्थानांत खालपासून वरपर्यंत—प्राथमिक शिक्षणापासून विश्वविद्यालयीन शिक्षणापर्यंत—नवीन युग डॉ. बाळकृष्णांनीं सुरू केलें असें म्हणणें वावगें होणार नाहीं. सर राजाराम महाराज व डॉ. बाळकृष्ण यांचा १८ वर्षांचा काळ म्हणजे कोल्हापूरच्या शैक्षणिक वैभवाचा काळ होय.

डॉ. बाळकृष्णांची शैक्षणिक कार्याची उडी प्राथमिक, माध्यमिक शिक्षण किंवा राजाराम कॉलेज एवढीच राहिली नसून कोल्हापूरची सर्वांगीण शैक्षणिक प्रगति व्हावी, कोल्हापूर हें महाराष्ट्रांतील पहिल्या प्रतीचें शैक्षणिक केंद्र व्हावें इतकी मोठी होती. महाराजांच्या उदार धोरणाचा व मुख्य प्रधानांचा त्यांना पाठिंबा होता म्हणून ते जें जें कार्य हातीं घेऊ लागले त्यांत त्यांना यश येऊ लागलें. कोल्हापूर संस्थान व दक्षिण महाराष्ट्र यांच्या वाढत्या गरजा लक्षांत घेता कोल्हापुरास लॉ कॉलेज, टीचर्स कॉलेज स्थापन होणें आणि ही आणि इतर कॉलेजें मिळून कोल्हापुरास रेसिडेन्शियल युनिव्हर्सिटी विश्वविद्यालय स्थापन व्हावें ही त्यांची मोठी मनीषा होती. यासंबंधीं विचार त्यांचे मनांत सारखे घोळू लागले आणि ते त्यांनीं १९३१-३२ सालच्या राजाराम कॉलेजच्या वार्षिक संमेलनप्रसंगीं प्रगट केले. मनांत विचार करीत डॉक्टर स्वस्थ बसले नाहींत तर ते त्याच्या उद्योगास लागून त्यांच्या अविश्रांत परिश्रमानें आणि चिकाटीनें १९३३ जूनमध्यें लॉ कॉलेज व १९३४ जूनमध्यें टीचर्स कॉलेज कोल्हापुरास स्थापन झालें. अशा रीतीनें कला, भौतिकशास्त्र, कायदा अध्यापन इत्यादि शिक्षणाची सोय आणि प्रगति दास्तनतर केन्द्रापर्यंत-

'दक्षिण काशी' अशा करवीर क्षेत्रांत–शिवाजी विश्वविद्यालय स्थापन व्हावें म्हणून डॉ बाळकृष्णानीं जोराचा प्रयत्न आणि पुरस्कार प्रत्येक वर्षी चालू केला त्याप्रमाणें सर्व कॉलेजें एकत्र बांधण्यासाठीं टेंबलाईच्या माळाकडे कै० महाराजांनीं एक स्वतंत्र जागाही पण दिली होती; त्याकरिता सात लक्ष रुपये १९३६–३७ साली मंजूर केले. ही गोष्ट म्हणजे शिवाजी विश्वविद्यालयाची मुहूर्तमेढच होय पण ईश्वरी योगायोग निराळा होता!

गेल्या वीस वर्षांचा कोल्हापूरच्या व्यापक शैक्षणिक प्रगतीचा इतिहास म्हणजे डॉ बाळकृष्णाच्या शैक्षणिक कार्याचा इतिहास होय कोल्हापुरचे उदारधी शिक्षणप्रेमी कै सर राजाराम महाराज व शिक्षणप्रसारकर्ते डॉ. बाळकृष्ण हे सूर्य आणि चंद्र कोल्हापुरच्या कार्यक्षितिजावर एकाच वेळीं उदय पावून अष्टादशाध्यायी कार्य करून १८ वर्षांच्या काळांत देदिप्यमान तळपून अस्तंगत झाले ही दैवी घटना अघटित होय. त्यांचें कार्य ही त्यांची चिरंतन स्मृति होय

डॉ बाळकृष्णानीं मागें एकदाच संदेश ठेवला आहे —

Young men, rise, awake and follow the lead of the progressive nations of the world in the building up of the destiny of your great and glorious motherland





शिक्षण परिषदेस जाण्यापूर्वी राजाराम कॉलेज स्टाफनें दिलेला निरोप (१९३३)

# Dr. Balkrishna,

## a Lover of Art and Archaeology.

By:—M. D. KARKHANIS, Ex-Curator, Karla Caves.

Commanding the audience with his majestic flow of oratory, piling argument upon argument like wave upon wave, deep in knowledge, wide in experience, with his peculiar smile, serene and unfathomable, Dr. Balkrishna appeared to me like a great ocean lashing the shores of the East and the West and giving out from his bosom many a sparkling gem to the world. In him one saw a happy blending of cultures. With a slight change in the following lines:

> "East is East and the West is West
> And the twain shall never meet."

I may say,

> "East is East and the West is West
> And the twain in an embrace meet"

Yes, we find them meeting hand in hand in Sir S. Radhakrishnan, Sir Jagadish Chandra Bose, Dr. Tagore, Mahatma Gandhi, Pandit Jawaharlal, Dr. Raman, Sir P. C. Ray, Dr. Bhise, Dr. Balkrishna and a host of other renowned sons of India.

Descending from the Punjab to this historic Deccan city, in which he created a welcome resort, home and a centre of international fame, this true Aryan carried the torch of Vedic religion, art and culture to the most distant lands of England and America. In return, he

brought back to us the most modern ways of democratic study and everything that would fit in with our environment and culture.

My object in writing this article is to provide a glimpse of his views on art and archaeology with a special reference to his visit to Karla Caves.

The late Doctor liked that art as the best which faithfully represented the life, culture and *spirit of the* times in which the particular piece of art existed. It is a well-known fact that he hunted out every place for a reliable portrait of Shivaji for his book on the hero that came nearest to him in life and spirit.

To understand his views on art and architecture of ancient India, we will have to go to his book—'Architectural Achievements of the Hindus.' In the very opening lines he says —

"The art of architecture represents the thoughts, feelings, passions of the people, as well as their love of the beautiful, the *grotesque or the sublime.* It reflects their material prosperity, their spiritual ideas and their religious rites. It is an index of their civilization, their manners, customs and costumes. It is the mistress of arts, industries and commerce. A historic survey of the Indian architecture will exhibit the 'achievements of our fore fathers and the contributions they made to the cultures of other nations."

"Some 3500 years before the Christian era flourished the city of Mohenjo Daro; this buried city has relics of massive foundations of temples, administrative buildings and treasures of the obviously rich and the thriving state..............

"The houses were furnished with bath-rooms and latrines. Drains were laid beneath the floors for the effluent from the latrines and the overflow of rain water... Hence it has been remarked by Sir Arthur Keith that no city claiming to be 5000 years old so nearly approached our modern standard of sanitation as does Mohenjo-Daro."

Further, he informs us of the firmly built hundred iron forts of Vangidra referred to in Rig Veda; of Pataliputra adorned with white-washed houses with statues at the front; of a tope that could be shaken by a finger touch at Nagar near Jalalabad; of a Buddhist monastery frequented by 5000 Brethren; of the remains of 1000 monasteries in Kapilvastu; of the huge idols suspended in the air by means of the magnet at Somanath, Madura and Kashmir, of Naland University, the New York of India covered with sky scrapers of sculptured stone, housing 3500 to 5000 students at a time."

"Thus the Naland University," he goes on describing, "can very well vie with modern Universities of Haward, Oxford, Cambridge, Paris, Berlin, in its endowments, international reputation and vast scholarship."

Against this back ground, I would like to touch upon his visit to Karla Caves in May 1929 I met him at the foot of the Caves The sun slowly sank behind our backs Facing us stood the sun lit hill 600 ft high, carefully concealing the inimitable art from a vandal's pernicious touch into its bosom The evening breeze was highly refreshing More refreshing, however, was the pleasant company of the distinguished visitors—Dr Balkrishna, his wife and her sister His aquiline nose, penetrating eyes, and charming smile spreading over his face as he cracked a joke made his tall figure outstanding. Intermittent cough hampered his pace but not his indomitable spirit As I scaled the heights with him, I felt myself lifted to a higher spiritual plane

We stood at last in front of the massive Ashokan pillar They bowed low before they entered the chaitya hall He remarked to his wife pointing to the bas relief figures,

"Mark the robust queens in contrast to the fragile present-day ladies"

"How exquisite are the dancing poses," he exclaimed turning to me

"I may tell you that Madame Pavlova found these lessons very useful in improving her dancing steps," was my rejoinder

His wife and her sister sportingly played with big-size elephants who did them no harm since they lived

in stone only. They scrutinized the miniature of the cave inscribed on a pillar, the age long wooden arches and the semicircular dome.

The Doctor put me questions on (1) the life led by monks, (2) the sums spent by the Govt on repairs (3) visitors and their remarks, (4) the economic condition of the villages round about and so on

He compared Karla Caves with Ajanta and Ellora, telling us how the former belonged to the Hinayan and the latter to the Mahayan style He gave us glowing accounts of the places he visited and the curios he had collected in his travels By this time the light faded. But the Doctor would not leave the spot "Please, get me a torch," he said smiling, patting me on the shoulder.

"Doctor, you are the first visitor to whom I am showing these parts in torch light," I replied, holding up the torch on a prominent symbol of the rising sun

This is how he paved his way to greatness, mastering the smallest details in darkness and one day succeeding in bringing these achievements to the light of the world

Yes, he did bring these ancient glories to the notice of the Americans in May, 1934 His second lecture out of the three delivered on behalf of the County Club was based on the exhibition of slides of Ajanta, Ellora, Karla and such other wonders of India He waxed eloquent at the end of his lecture

with these impressive words "The influence of the civilization worked out thousands of years ago in India is around and about us every day of our lives It pervades every corner of the civilized world Here in America, as in Europe, is the influence of that civilization which came originally *from* the banks of the Ganges '.

" In short, India has been the spiritual pastor of the world in the past and it is to be a spiritual guide in the future

Dead is the ringing voice Yet the *very silence is* eloquent, inspiring every throbbing, feeling heart to noble deeds The East and the West will have to bow in gratitude to his message of true art, noble culture and the great spiritual force of India

To day, the warring nations are heedless to this inspiring message yet the day will come when they will have to turn to these great men of India for her Spiritual Light, as the Western Civilization tainted by lust, brute force and imperialistic motives crumbles to the ground

---

# आचार्य डॉ० बाळकृष्ण

लेखक:—श्री. विश्वनाथ वामन पत्की, एम्. ए. कोल्हापूर.

कांहीं कांहीं संस्था आणि कांहीं कांहीं व्यक्ती किंवा कांहीं कांहीं गुण आणि कांहीं कांहीं व्यक्ती यांचें साहचर्य इतकें अभिन्न आणि एकजीव झालेलें असतें, कीं एकावांचून दुसऱ्याचें अस्तित्वच अशक्य वाटावें! काँग्रेस म्हटली, कीं महात्मा गांधींचें नांव अपरिहार्य वाटावें, 'केसरी' म्हटला, कीं लोकमान्य टिळकांचें पुण्यस्मरण व्हावें, वक्रोक्ति म्हटली, कीं शिवरामपंत परांजप्यांचीच आठवण झाल्यावांचून राहू नये आणि स्थितिप्रियता (Conservatism) म्हटली, कीं इंग्रजांची मनोवृत्ति सूचित व्हावी, हें जणूं काय अगदीं ठरलेलें!

राजाराम कॉलेजविषयी बोलायचें म्हटलें तरी सुद्धां एका नांवाचा उल्लेख अपरिहार्य वाटेल, इतकें अभिन्नत्व त्या दोन नांवांत निर्माण झालें आहे. डॉ. बाळकृष्णांचें नांव राजाराम कॉलेजशीं किती निगडित झालें आहे, हें कांहीं आतां नव्यानें सांगायला नको. ही दोन नांवें नेहमीं एकत्र उच्चारलीं जावीं इतकें लोकोत्तर कार्य खरोखरच डॉ. बाळकृष्ण यांच्या हातून झालें आहे. त्यांच्या कार्याचा पसारा आणि व्याप लक्षांत घेतां राजाराम कॉलेज या एकाच संस्थेशीं त्यांचें नांव निगडित झालेलें आहे, असें म्हणणें कदाचित् अन्यायाचें असलें तरी राजाराम कॉलेजचें जें पितृतुल्य संगोपन त्यांनी अठरा वर्षे केलें त्यामुळें या दोन नांवांचें साहचर्य निरपवाद आहे, असेंच म्हटलें पाहिजे. कारण सतत अठरा वर्षे परिश्रमपूर्वक झटणारा डॉ. बाळकृष्णांसारखा निरलस कार्यकर्ता लाभला नसता तर राजाराम कॉलेजला आजची प्रतिष्ठा किंवा आजचें भव्य स्वरूप लाभलें असतें किंवा नाहीं याची शंकाच आहे. निदान राजाराम कॉलेजला

आज लाभलेल्या महदैश्वर्यांत कर्तृत्वाचा सर्वांत मोठा वाटा (Lion's share) डॉ. बाळकृष्ण यांचा आहे, यांत तिळप्रायहि शंका नाहीं.

माणूस विद्वान् आहे असें ऐकलें, कीं त्याच्याविषयीं आपल्या मनांत एक प्रकारची विलक्षण श्रद्धा निर्माण होते असें सकृद्दर्शनी काहींसें चमत्कारिक वाटणारें विधान अनातोल फ्रान्स यानें एके ठिकाणीं केलें आहे. अनातोल फ्रान्सनें ज्या खोल अभिप्रायानें हें विधान केलें आहे, तिकडे आपण क्षणभर दुर्लक्ष केलें, तरीहि आपणाला असें खचित म्हणावें लागेल, कीं केवळ आपल्या विद्वत्तेच्या प्रखर दीप्तीनें आपणाकडे सामान्य माणसांना आकृष्ट करून घेणारी जी थोडीशार माणसें प्रत्येक कालखंडांत होऊन जातात त्यांपैकीं डॉ. बाळकृष्ण हे एक खचित होते. त्यांच्या विद्वत्तेच्या परिमळानें मोहित झालेलीं माणसें त्यांच्या अधिकच निकट झालीं, कीं आदरावाचून दुसरी कोणतीहि भावना त्यांच्या मनांत शिल्लक राहात नसे. विकासशील आणि संवेदनक्षम अशा तरुण विद्यार्थ्यांच्या बाबतींत तर हें अधिकच खरें होतें. म्हणूनच उण्यापुऱ्या सहा फूट उंचीची, अध्ययन अध्यापनादि तपोबलानें अधिकच कांतिमान् दिसणारी ती गंभीर पण प्रसन्न, शांत आणि हसरी मूर्ति जेव्हा पोर्चमध्यें उभ्या असलेल्या आपल्या मोटारमधून उतरून सपपणानें पावलें टाकीत कॉलेजच्या मुख्य हॉलमध्यें प्रवेश करीत असे तेव्हा 'नमस्ते' असे परम आदराचे उद्गार नकळतच विद्यार्थ्यांच्या मुखांतून बाहेर पडल्यावाचून राहात नसत. डॉ. बाळकृष्ण दरवाजांतून आंत आले, त्यांनीं आपली चौकस दृष्टि चौफेर फेंकली, कीं सगळीकडे कसें सामसूम होऊन जात असे. किंबहुना त्यांच्या आगमनाबरोबर आणि दृष्टिक्षेपाबरोबर निर्माण होणारी ती स्तब्धता पाहिली, कीं He came, he saw, he conquered हे शब्द डॉ. बाळकृष्णांचें

वर्णन करण्यासाठींच तर कवीनें लिहून ठेवले नसतील ना, अशी मधुर शंका चटकन् मनात आल्यावांचून राहात नसे।

बाह्यदर्शनानें मनांत निर्माण होणारी आदराची भावना त्यांच्या अंतःकरणांतील शुचित्व आणि सहृदयता यांचें दर्शन घडलें, की दृढमूल झाल्यावांचून मुळींच राहात नसे. राजाराम कॉलेजांत येणारा विद्यार्थी हा प्रायः मध्यम वर्गातला किंवा खालच्या शेतकरी, दलित इत्यादि वर्गांतला असायचा हें तर ठरलेलेंच आहे. बाहेर गांवाहून राजाराम कॉलेजात शिकायला येणारा विद्यार्थी हाहि असाच. अशा विद्यार्थ्यांचा शिक्षणक्रम पुरा करण्याची नैतिक जबाबदारी आपण स्वीकारली आहे, याचें भरभान डॉ. बाळकृष्णांनीं कधीं सोडलें नव्हतें, अशीच ग्वाही या त्यांच्या दयाशील वृत्तीमुळें शिक्षणक्रम पुरा करून गेलेले शेंकडों विद्यार्थी देतील. कुणाला कॉलेजची फी देण्याची शक्ति नाहीं, कुणाचे पालक अक्षरशः मुकेकंगाल शेतकरी व निरक्षर, कुणाला पुस्तकें विकत घ्यायला पैसे नाहींत, कुणाला वेळेवर फीचा हप्ता देतां येत नाहीं, तर कुणाची खोली घेऊन राहण्याइतकी आर्थिक परिस्थिति चांगली नाहीं—अशा असंख्य विद्यार्थ्यांचें गार्‍हाणें शक्य तेवढ्या कमी व्हावेत, दगदगीत अन् कष्टात व्हावें, ज्या दुर्दैवी परिस्थितीत आपण जन्माला आलों त्या परिस्थितीची आंच भारगाडा क्षणोक्षणीं बसते आहे असें विद्यार्थ्याला वाटून व त्याचा तारुण्यसुलभ आशावाद करपून जाऊन त्याचें मनःपुष्प कोमेजून जाऊं नये—सारांश निर्भय, आशावादी तरुणपिढी आपल्याला समोंवतालच्या या विद्यार्थिवृंदामधून निर्माण करायची आहे ही जाणीव सतत होल्यांपुढें ठेवून तरुण पिढीचें जें पालनपोषण डॉ. बाळकृष्णांनीं केलें त्यामुळेंच त्यांच्या हातांखालून गेलेल्या विद्यार्थ्यांना त्यांची विस्मृति होणें अशक्य आहे. कधींहि डॉ.

बाळकृष्णांच्या घरीं जा, याचक विद्यार्थ्यांची गर्दी तिथें नाहीं असें व्हायचेंच नाहीं आणि कळकळ तरी किती! प्रसंगीं वेड पाहुणे, युनिव्हर्सिटीचे निरनिराळे पदाधिकारी घरीं आलेले असोत, स्वतः लेखन–वाचनांत गुतलेले असोत, सकाळ असो–दुपार असो–नव्हे रात्रहि असो, विद्यार्थी भेटायला आला आहे असें शिपायानें जाऊन सांगितलें किंवा बाहेर तो आला आहे अशी त्यांना चाहूल लागली, कीं बाहेर येऊन त्याची चौकशी करतील, त्याचें म्हणणें ऐकून घेतील त्याला पाहिजे असलेली मदत शक्य असेल तर स्वत देतील, नसेल तर कुणाला जरूर तर एखादें पत्र देतील, विद्यार्थी इतकेंही करून आणखी कांहीं सांगू लागला आणि स्वतःचा खरोखरच कांहीं घाई असेल तर त्याच्याकडे पाहून थोडेसेंच हसतील आणि आपल्या किंचित् घोगऱ्या आवाजात त्याला म्हणतील, "See me in the office" आणि तो विद्यार्थी निघाला, कीं प्रेमभरानें त्याच्या पाठीवर थोपटल्यासारखेंहि करतील! विद्यार्थी निराश, किंकर्तव्यमूढ उदास होऊन त्यांना भेटायला आलेला असायचा आणि परत जायचा तो उल्हासाचीं किरणें अंतःकरणांत प्रकाशलीं आहेत अशा प्रसन्न चित्तानें! आपल्या विद्यार्थ्यांविषयीं इतकी आपुलकी आणि इतका जिव्हाळा दाखविणारा आचार्य प्राय दुर्मिळच!

विद्यार्थी–वर्गाचा आणि पर्यायानें तरुण पिढीचा सर्वांगीण विकास घडवून आणणें, त्यांना जागृत करणें, त्यांची ज्ञानदृष्टि अधिक तीक्ष्ण करणें किती आवश्यक आहे, हें त्यांनीं ओळखलें होतें शिवाय ज्ञानोपासनेवरहि त्यांची अव्यभिचारी अशी भक्ति होती किंबहुना 'ज्ञान' या शब्दाचा अर्थ (Connotation) किती व्यापक आहे याची जाणीव त्यांना पूर्णांशानें झाली होती म्हणूनच कॉलेजांतील निरनिराळ्या ज्ञानशाखांचें संवर्धन त्यांनीं केलें. कॉलेजांतील निरनिराळ्या

अभ्यासमंडळांना उत्तेजन दिलें एवढेंच नव्हे तर, या अभ्यास मंडळांच्या कक्षेंत न येणाऱ्या विषयाचा परामर्शहि त्यांनीं स्वतः घेतला, दुसरा कुणी घेत असला तर त्याला अंतःकरणपूर्वक सक्रिय साहाय्य केलें. नाट्य, संगीत, अभिनय, नृत्य या कलांचा अंतर्भाव कॉलेजच्या अभ्यासक्रमांत थोडाच होतो! पण 'ज्ञान' म्हटलें, की या कलांनाहि त्यांत स्थान आहे हें ओळखून या कलांचें संवर्धन आणि अभ्यास करणारी, त्यांच्याविषयीं उच्च दर्जाची अभिरुची निर्माण व्हावी म्हणून प्रयत्न करणारी संस्था कॉलेजांत निघाली तेव्हां तिला त्यांनीं हरप्रकारें सहाय्यच केलें. येवढेंच नव्हे, या संस्थेच्या कार्याविषयीं कुजबुज सुरू झाली आणि तिचे पडसाद त्यांच्या कानापर्यंत गेले तेव्हां प्रसंगविशेषीं त्या संस्थेच्या कार्यक्रमांना प्रकृतीचें अस्वास्थ्य असतांहि ते हजर राहिले आणि या ज्ञानलवदुर्विदग्ध आक्षेपकांना त्यांनीं सक्रिय उत्तर दिलें!

प्रचलित विषयांचा परामर्श घेऊन विद्यार्थ्यांना त्यासंबंधी योग्य माहिती पुरविणें किती जरूर आहे हें ओळखून Extension Lectures Series तर त्यांनीच सर्व कार्यक्षम केली. काँग्रेसच्या वर्किंग कमीटीचे ठराव असोत, व्हाइसरॉयची घोषणा असो, इंग्लडनें सुवर्णपरिमाण सोडणें म्हणून आंतरराष्ट्रीय राजकारणांत उडालेली खळबळ असो, की जागतिक युद्धाची युरोपांत भडकणारी ज्वाला असो, तिचें सम्यक् दर्शन विद्यार्थ्यांना घडावें, ही त्यांची तळमळ आणि प्रामाणिक इच्छा. फोगतीहि एक खळबळ उडविणारी गोष्ट घडली, की विद्यार्थ्यांतील सुरस भाष्य डॉ. बाळकृष्णांच्या तोंडून ऐकायला मिळावयाचें ही गोष्ट इतकी ठसून गेलेली होती की विद्यार्थीच नव्हेत गांवांतले इतर ज्ञानलोलुपहि "डॉ. बाळकृष्णांचें भाषण कधीं हो आहे?" अशी पृच्छा केल्यावांचून राहात नसत. गंमतीनें या ज्ञानलोलुपांना कॉलेजांत नेहमींच मुक्तद्वार असे.

किंबहुना प्रचलित विषयांवरील डॉ. बाळकृष्णांची हीं भाषणें म्हणजे सामान्य शिक्षणक्रमांमधील भागच आहे असेंच प्रायः विद्यार्थीहि समजत. आंतरराष्ट्रीय राजकारणांतील मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्यांनाहि न उलगडणारी गुंतागुंत डॉ. बाळकृष्ण येवढ्या कौशल्यानें उकलून दाखवीत, कीं अंधारांत चांचपडणाऱ्या माणसाला आपल्यावर एकदम प्रकाशाचा झोत पडला आहेसें वाटावें! या व्याख्यानांतहि कोणकोणते विषय येतील याला नियम नाहीं. अर्थशास्त्र हा तर त्यांचा हातखंडा विषयच, पण धर्म, इतिहास, तत्त्वज्ञान, कला या विषयांवरहि त्यांनी येवढीं विद्वत्ताप्रचुर व्याख्यानें दिलीं, कीं ऐकणाराला आदर आणि विस्मय याचा धक्काच बसावा! 'न खलु धीमतां कश्चिदविषयो नाम' ही शार्ङ्गरवाच्या मुखानें कालिदासानें प्रसृत केलेली उक्ति किती सार्थ आहे, याचें प्रत्यंतर या क्षणीं आल्यावाचून खचित राहात नसे. त्यांच्या बुद्धीला खरोखरच अविषय नव्हता; त्यामुळेंच त्यांच्या बुद्धीचा भोंवरा ठराविक विषयांच्या परिघात कधीं भ्रमण करीत राहिला नाहीं. श्रोतृवर्ग रसिक आणि जाणता असला म्हणजे तर त्यांच्या वक्तृत्वाला असामान्य बहरच येई आणि त्यांत त्यांना कुणी विरोध केला म्हणजे तर विचारूंच नका! विरोध झाला कीं त्यांचा मनोदधि जणूं काय घुसळून निघे आणि चाटूक्तिपूर्ण ( highly epigrammatic ) सूक्तिरत्नांचा वर्षावच श्रोत्यांवर होई. आश्चर्य असें, कीं अगोदर क्वचित् नीरस वाटणारें त्यांचें वक्तृत्व विरोधानंतर येवढें अमोघ आणि परिणामकारक वाटे, कीं श्रोते मंत्रमुग्ध झाल्यावांचून राहात नसत. अशा विरोधानेंच त्यांच्या बुद्धीचें असामान्य तेज कितीतरी अधीक पटीनीं प्रगट होई. हा विरोध करणारा मग एखादा जगद्विख्यात स्टॅन्ले जोन्स असो कीं सातान्याचे कै. दादासाहेब करंदीकर असोत, तो खिश्चन धर्माची महती गाऊन पौर्वात्य संस्कृतीवर दुगाण्या झाडो कीं चलनपद्धतीवर अशास्त्रीय टीका करो!

अशा विरोधामुळेंच त्यांच्या अंतःकरणांत येरव्हीं सुप्तावस्थेंत असलेलें कडवें राष्ट्रीयत्व अचानक रीतीनें प्रगट होई आणि त्यांच्या परिणत-प्रज्ञतेचीं सुमधुर फळें शिष्यवृंदाला आकंठ सेवन करतां येत.

'शिक्षक' या शब्दाचा अर्थ त्यांनीं किती व्यापक केला होता हें तर यावरून दिसतेंच पण शिक्षणाच्या कक्षेंत परिक्षेसाठीं नेमलेल्या पाठ्य पुस्तकांचा अभ्यास तेवढाच येतो असेंहि त्यांनीं कधी मानलें नाहीं. राष्ट्राभिमानाची जी प्रखर ज्योत त्यांच्या अंतःकरणांत उजळली होती तिला प्रगट व्हायला फारसा कुठें अवकाश मिळाला नाहीं त्यामुळेंच असेल कदाचित्, त्यांचीं वर्गांतलीं दररोजचीं व्याख्यानें सुद्धां एखाद्या वेळेस अगदीं आवेशपूर्ण होत. इंटरच्या वर्गांना ते अनेक वर्षें शासन-पद्धति (Administration) शिकवीत, त्यामुळें प्रचलित राजकारणाचे उल्लेख आपोआपच येत. संयुक्त विरुद्ध स्वतंत्र मतदार संघ येवो, द्विदल राज्यपद्धतीचें विवरण येवो, मंत्र्यांच्या संयुक्त जबाबदारीचा विषय निघो, डॉ. बाळकृष्ण या विषयांची एखाद्या पुराण शास्त्रवेत्त्याच्या कौश-ल्यानें चिरफाड तर करीतच पण सरकारचें धरसोडी धोरण, जनतेची क्षुद्र वृत्ति, पुढाऱ्यांचे स्वार्थ इत्यादि प्रकारांवर येवढी विदारक टीका करीत, कीं सारा विद्यार्थीवृंद कसा अगदीं तटस्थ अन् शांत व्हावा! हीं व्याख्यानें ऐकत असतां आपण कॉलेजमधल्या एका प्रोफेसरचें व्याख्यान ऐकत नसून राष्ट्रप्रेमानें प्रदीप्त झालेल्या एखाद्या थोर देशभक्त पुरुषाचें अंतःकरण हलवून सोडणारें व्याख्यानच ऐकत आहों असा भास होई! त्यांत एखाद्या वेळेस विरस झाला, कीं विनोद घडे तें कांहीं विचारूं नका. व्हाईसरॉयच्या Power of Certification (व्हेटो अधिकार) वर डॉ. बाळकृष्ण ऐन आवेशानें बोलत असतांना, पुढील वाक्य मागल्या वाक्याहून अधिक जोरदार येत असे, त्यांच्या

मनातला त्वेष अधिकाधिक वाढत जावा आणि दुर्दैवानें त्यांना बोलतां बोलता नेमकी याचवेळीं दम्याची एकदम उबळ यावी! विद्यार्थ्यांबरोबर डॉ. बाळकृष्णाचाहि विरस झाला असेंच सर्वांना वाटे. मग थोडा वेळ थांबून ते शिकवू लागत पण पहिला आवेश आणि जोर यांचा मग पत्ताहि नसे सुंदर, मोहक, प्रसन्न रसवंती मग येवढ्या वेळा अडखळे कीं थोड्या वेळापूर्वी वक्तृत्वपूर्ण बोलणारे डॉ. बाळकृष्ण ते हेच कां अशी भ्रांत पडावी!

ते ऐन रंगांत येऊन शिकवू लागावे आणि विद्यार्थी एकमेकांत कांहीं तरी बोलू लागावे असेंहि कधीं कधीं घडे. अशा गोष्टीकडे ते प्राय दुर्लक्ष करीत हें खरें, पण मनांत आलें तर तिथेंच थांबत आणि त्या विद्यार्थ्यांकडे आपली दृष्टि वळवीत. विद्यार्थी घाबरून गेला, कीं मग त्याला Dyarchy चें स्पेलिंगसुद्धा विचारतील आणि तो विद्यार्थी पक्षांत राहिला तर " What is the nature of Home-rule you enjoy? Is it dyarchy or monarchy? " असें नर्मविनोदात्मक वाक्य विचारून वर्गांत हशा पिकवितील! सामान्यत गंभीर प्रकृतीचे असणारे आमचे हे प्राचार्य मग " What is meant by Diwani? Is it the wife of a Diwan?" असला सामान्य विनोदहि मग करतील! असले अपवाद सोडले तर नेहमीं त्यांचीं व्याख्यानें गंभीर आणि उदात्तच होत. राष्ट्रीय भावनांचा दुर्दम्य असा खळखळाट त्यांत काय असेल तेवढाच.

पण विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत जागृत केलेल्या या राष्ट्रप्रेमाचा उच्छृंखलपणाहि त्यांना मधुनमधून अनुभवावा लागे आणि या उच्छृंखलपणाला विवेकाचा लगाम घालून त्याला विकृत स्वरूप न येऊं देण्याची दक्षता त्यांना घ्यावी लागे १९३० व १९३२ सालीं कायदेभंगाची जी देशव्यापी चळवळ महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं देशानें केली

रतिचे पडसाद कॉलेजच्या छोट्या विश्रांतीतहि उमटल्याशिवाय राहात नसत. धरपकड, शिक्षा हे प्रकार नेहमीं चालूच होते, पण एखाद्या थोर पुढाऱ्याला पकडल्याची बातमी आली, की विद्यार्थ्यांचें तरुण, उष्ण रक्त स्वस्थ राहात नसे. ते हरताळाच्या गोष्टी बोलायला लागत, डॉ. बाळकृष्णांनी कॉलेज बंद ठेवावें असें म्हणूं लागत, निदेशाची सभा भरविण्याची कल्पना निघे आणि एकदां तर कॉलेजवर तिरंगी राष्ट्रीय निशाण लागलेंच पाहिजे असा हट्ट धरण्यापर्यंत विद्यार्थ्यांची मजल गेली! तरुणांच्या उचंबळलेल्या मनोवृत्तींतून असले प्रकार जन्माला येणें अपरिहार्य आहे हें डॉ. बाळकृष्णांना कळत का नव्हतें? पण विद्यार्थ्यांना मर्यादेत ठेवणें किती आवश्यक आहे हेंहि त्यांना दिसे. ते विद्यार्थ्यांची कशी तरी समजूत घालीत, नेहमींप्रमाणेंच आपला वर्ग घेत आणि या प्रक्षोभक बातम्यांचा निर्देशहि वर्गात करीत. मुद्दामच वर्गात बसण्यासाठीच की काय एखाद्या कंपन्यांतल्या विद्यार्थ्याला उठवून "Do you read newspapers?" असें विचारीत आणि त्यानें कांहीच उत्तर दिलें नाहीं किंवा 'No' म्हटलें, की मग ते खरोखरच रागावत! 'Do you expect the farmers and the merchants to read them?' असें त्या विद्यार्थ्याला त्यांनी विचारलें, की वर्तमानपत्रें नियमानें न वाचणाऱ्या विद्यार्थ्यांना पर मान वरण्याची सोयच उरलेली नसे! त्या निमित्तानें मग जें बाचताडन होई त्यामुळें अपराधी रडकुंडीसच येई. पण या वाक्ताडनामागें केवढी पराकाष्ठेची तळमळ, जिव्हाळा आणि कर्तव्यतत्परता होती! परजू विद्यार्थ्याला वाटेल ती मदत करणाऱ्या डॉ. बाळकृष्णांच्या अंतःकरणात कठोरताहि होती आणि प्रेमळ शब्दांनी उत्तेजन देणाऱ्या त्यांच्या शब्दांत कटुताहि होती, पण ती साधी नव्हे! त्यांच्या वृत्तीत कठोरता होती, पण ती

स्वतःच्या तेजानें दिपविणाऱ्या हिऱ्याची; त्यांच्या शब्दांत कटुताहि होती, पण ती स्वतःच्या परिमलानें मोहित करणाऱ्या केशराची!

न फिटणाऱ्या ऋणांत आचार्य-ऋणाचीहि गणना करण्याचा प्रघात आहे; तो केवळ उपचार म्हणून नव्हे हें ज्या आचार्यांच्या उदाहरणावरून आपणाला पटतें अशा थोर आचार्यांच्या पंक्तींतच डॉ. बाळकृष्णांचें स्थान आहे. आपल्या विद्यार्थ्याविषयीं असीम कळकळ, ज्ञानारील अढळ निष्ठा आणि याचकाला वाटेल ती मदत करण्याची तत्परता या गुणांची प्रतिकृतीच डॉ. बाळकृष्णाच्या रूपानें जगात वावरत होती. No man is indispensable (जगांत कुणावाचूनहि अडत नाहीं) हें खरें असलें तरी किती मर्यादित अर्थानें! जगात कुणावाचून अडतें कीं नाहीं हें दुसरें कोण सांगणार? फीचा हप्ता द्यायला पैसे नाहींत म्हणून प्रिन्सिपलच्या खोलीच्यावाहेर भीतियुक्त अंतःकरणानें रेंगाळणाऱ्या विद्यार्थ्याला आज डॉ. बाळकृष्ण त्या खोलींत नाहींत म्हणून भडभडून आल्यावाचून राहणें नाहीं! पूर्वी त्याला 'म्हातारा' (अरेरे! या शब्दामागील विद्यार्थ्यांच्या मनातील परम आदर आणि कल्लोळ लोकांना सांगून का कळणार आहे?) प्रेमळ स्वरांत म्हणाला असता, 'आज नसले पैसे, तर पधरा दिवसानीं भर.' पण आज--? आज ते एकदां उच्चारलेले शब्द त्याच्या कानांत घुमत तेवढे राहतील!

दुर्दैव असें, कीं आमचा हा पितृतुल्य आचार्य खऱ्या अर्थानें 'म्हातारा' होण्यापूर्वीच आमच्यांतून निघून गेला. पण आम्ही काळावरहि विजय मिळवूं! कारण, ते अमृतोपम वाङ्माधुर्य आतां वातावरणांत विरून गेलें असलें तरी त्याचे निनाद आमच्या स्मृतिकोशांत अनंत काळपर्यंत खचित निनादत राहतील!

# राष्ट्रीय शिक्षक 'डॉ० बाळकृष्ण'

लेखकः—**श्री. गुरुनाथ नारायण गवाळे,** एल्एल्. बी. कोल्हापूर.

डॉ. बाळकृष्ण यांच्या कार्याची विविध अंगें होतीं. थोर पुरुष हे निरनिराळ्या कारणांनीं थोर असतात. कांहीं विद्वान असतात तर कांहीं बुद्धिमान असतात. कांहीं, लोकांना शिक्षण देण्यांत चतुर असतात. तर कांहीं स्वतः प्रतिपादणारी तत्त्वें कृतींत उतरविणारे असतात. डॉ. बाळकृष्ण अष्टपैलू होते. ते विद्वान तर होतेच पण तसेच ते कार्यकर्तेही होते. त्यांची विद्वत्ता ही जशी त्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांत व इतिहास या विषयावरील व्याख्यानांत दिसून येते तशीच त्यांची प्रत्यक्ष कार्य करण्याची प्रचंड शक्तीही त्यांनीं हातीं घेतलेल्या आर्यसमाजाच्या व तदनुषंगिक प्रत्यक्ष कार्यांत दिसून येते. विद्वत्ता व कार्य करण्याची शक्ति ही त्यांच्यामध्यें एकाच वेळीं दिसून येत होती.

डॉ. बाळकृष्ण आर्यसमाजपंथी होते हें सर्वश्रुतच आहे. त्यांना आर्यसंस्कृतीचा अतिशय अभिमान होता. त्यांच्या प्रत्येक शब्दांत आर्यसंस्कृतीबद्दलच्या प्रेमाचें प्रतीक दिसून येत होतें. डॉ. बाळकृष्ण ही व्यक्ती डोळ्यापुढें उभी राहिली कीं आमच्या मनांत एक विचारप्रवाह सुरू होई. आणि तो म्हणजे —— आम्ही नादान नाहीं. आम्ही कोणत्याही कार्यांत असमर्थ नाहीं. आमची संस्कृति उज्ज्वल आहे. तिचा इतिहास अधिकच उज्ज्वल आहे. आमची संस्कृति जगांतील कोणत्याही संस्कृतीपेक्षां कमी-प्रतीची तर नाहींच नाहीं, उलट ती सर्वश्रेष्ठ आहे. आमच्यांत सर्व जगास आत्यंतिक व चिरकाल सुख देण्याचें सामर्थ्य आहे. आम्ही गुलाम नाहीं. आम्ही आमच्या संस्कृतीचें रक्षण करण्याचीही पर्वा न करतां केलें आहे व अजूनही करूं आणि इतकें करून आमच्या संस्कृतीचें विशेष हे

आहे कीं तिच्यांत आत्यंतिक सहिष्णुता (toleration) आहे. १९३९ सालीं त्यांनी 'On the Myth of India's Political Bondage' या विषयावरील आपल्या व्याख्यानांत हेंच निक्षून सांगितलें होतें कीं, आतांपर्यंत आर्यसंस्कृतीवर इस्लामख्रिश्चनादि संस्कृतींचें आक्रमण झालें तरी आमचा संस्कृतीचा अभिमान बिलकुल नष्ट होऊं शकला नाहीं. जगांत कित्येक संस्कृती निर्माण झाल्या; विलीन झाल्या व होत आहेत. इजिप्शिअन्, रोमन, ग्रीशन वगैरे संस्कृती नाहींशा पावल्या पण आपली सर्वांत जुनी आर्यसंस्कृति ही निरनिराळ्या आक्रमणांशीं झगडून अजूनही जिवंत राहूं शकली आहे. इतकेंच काय पण कदाचित् शेवटीं तीच जगाला मार्गदर्शक होईल. आम्हां विद्यार्थ्यांना ते नेहमीं सांगत असत कीं आर्यसंस्कृतींत आज पुष्कळ दोष आढळतील. पण एकदम तिला कुचकामाची ठरवूं नका. आज तुम्ही — आजची तरुण पिढी — धमरल होत आहात. बलवान व्हा आणि 'Be worthy sons and daughters of your great forefathers.'

व्यवहारधर्माचा असा एक सिद्धांत आहे कीं कोणताही मनुष्य एखाद्या पक्षाचा जर का नुसता चहाता जरी असला तरी तो इतर पक्षांना अगदीं मूर्खपणाचे मार्ग समजतो. पण अशी भावना डॉ. बाळकृष्ण यांची मुळींच नव्हती. लोकांची एक सहाजीकच अशी कल्पना असण्याचा संभव आहे कीं, डॉ. बाळकृष्ण कट्टर धर्माभिमानी असल्यानें एक तर त्यांचें इतर धर्म अगर पंथांशीं कट्टर वैर होतें व त्यामुळें राष्ट्रीय वृत्ती जितकी असावी तितकी त्यांच्याजवळ नव्हती. पण मला मुद्दाम असें दृष्टोत्पत्तीस आणावयाचें आहे कीं वरील दोनही समजुती सपशेल चूक आहेत. माझा तर असा अनुभव व खात्री आहे कीं, त्यांच्यामध्ये धर्माभिमान, सहिष्णुता व राष्ट्राभिमान हे सारख्या प्रमाणांत नांदत होते.

डॉ. बाळकृष्ण हे जितके धर्माभिमानी होते तितकेच ते राष्ट्राभिमानी होते. जितका त्यांच्या प्रत्येक शब्दामागें आर्यसंस्कृतीचा अभिमान दिसून येई तितकाच, अगदीं तितकाच, राष्ट्राभिमान दिसून येई. डॉ. बाळकृष्णांची मूर्ती डोळ्यापुढें आली कीं, जितकी त्यांच्या आर्यसंस्कृतीच्या अभिमानासंबंधीं विचारसरणी आमच्या मनांत सुरू होते तितकीच त्यांच्या राष्ट्राभिमानाविषयींची विचारसरणी निर्माण होते. 'हिंदुस्थानांतील प्रजा गुलाम म्हणून राहण्यास तयार नाहीं. आमचें राज्य आम्ही चालविण्यास समर्थ आहोत. ब्रिटिश सरकार हिंदुस्थानांतील दुफळीचा फायदा घेऊन आम्हांला तुम्ही वर्तनगार नाहीं असें सांगतें. हिंदुस्थानांतील प्रत्येक व्यक्तीनें आपल्या राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याचा शक्य तितका प्रयत्न केला पाहिजे. हिंदुस्थानचा राज्यकारभार हिंदुस्थानच्याच लोकांना लोकशाही तत्वा-(democratic basis) वर चालवावयास मिळाला पाहिजे. जो विद्यार्थी आपल्या देशासाठीं काहींच करीत नाहीं, तो मनुष्यच नव्हे,' असे विचार ते नेहमीं टासून सांगत. असे कितीक प्रसंग दाखविता येतील कीं त्यावेळीं त्यांचा अतिशय प्रखर व उत्कट राष्ट्राभिमान दिसून आला. ज्यावेळीं काँग्रेसनें सात प्रांतांमधील राज्यकारभार आपल्या हातीं घेतांना त्यावेळीं अत्यानंद ज्या व्यक्तींना झाला त्यांपैकीं डॉ. बाळकृष्ण हे होते. त्यांनीं आपल्या Indian Administration and Constitution या पुस्तकांत काँग्रेसनें ज्यावेळीं सात प्रांतांत कायदे मंडळें व्याप्त केलीं व दिवाणगिऱ्या स्वीकारल्या त्या प्रसंगाचें रसभरित व अभिमानपूर्वक वर्णन केलें आहे. आमच्या एम्. ए.च्या वर्गांत त्या प्रसंगाचें वर्णन करतांना त्यांचा आवेश व अभिमान पाहून आम्ही थक्क झालों व आमचीं अंतःकरणें अभिमानानें व आनंदानें भरून राहिलीं. तो प्रसंग आम्ही कधींच विसरणें शक्य नाहीं. 'इंग्रज सरकारास आम्ही दाखवूं कीं आम्ही राज्यकारभारदृष्ट्या पाहिल्यास समर्थ

आहों की नाहीं. इतकेंच काय, पण आमच्या देशाचें संरक्षण करण्यास देखील आम्ही समर्थ आहों. पण सरकारनें धूर्तपणानें वागून व आमची शस्त्रें काढून घेऊन आम्हाला निर्बल व नादान करून टेवलें आहे—' १९३७–३८ सालीं एफ्. वाय्. मध्यें राजाराम कॉलेजात असणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला आठवत असेल तो प्रसंग! असे एक ना दोन कित्येक प्रसंग! स्वातंत्र्य दिनादिवशी व इतर कांहीं प्रसंगीं ज्यावेळीं विद्यार्थी निरनिराळ्या तऱ्हेनें उत्साह दाखवीत त्यावेळची त्यांची विद्यार्थ्यांचा उत्साह भंग न करण्याची दृष्टी सर्व विद्यार्थ्यांना ठाउक आहेच. म. गांधी, जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस वगैरे राष्ट्रीय पुढाऱ्याविषयीं त्यांच्या मनामध्यें पूज्यभाव होता व ते त्यांच्या कार्याविषयीं वर्गात नेहमीं धन्योद्गार काढीत. धर्माभिमान व राष्ट्राभिमान त्यांच्यामध्यें तितक्याच उत्कटतेनें नांदत होती

डॉ. बाळकृष्ण हे खरे राष्ट्रीय–शिक्षण (National Education) देणारे होते. आपला विषय चांगला शिकविणारे खूप प्राध्यापक आहेत. पण आज प्रत्येक हिंदी विद्यार्थ्याला जें खरें शिक्षण पाहिजे आहे तें आम्हाला मुळींच दिलें जात नाहीं. आजचें शाळाकॉलेजात दिलें जाणारें शिक्षण हें अगदीं कमी प्रमाणात राष्ट्रीय आहे याबद्दल दुमत नाहीं. तरी पण डॉ. बाळकृष्ण हे मात्र जे विषय आहेत ते नुसत्या परीक्षेत उत्तीर्ण होण्याच्या संकुचित दृष्टीनें न शिकवितां प्रत्येक विद्यार्थी हा एक भावी जबाबदार नागरिक कसा बनवावयाचा या दृष्टीनें ते शिकवीत असत. प्रत्येक विद्यार्थी हा कसा आदर्श लोकसेवक, धर्माभिमानी व राष्ट्राभिमानी होईल व तसाच तो आदर्श नागरिक कसा होईल हीच त्यांची दृष्टी होती. हिंदुस्थानची राज्यघटना व नागरिकशास्त्र (Civics) हे विषय आम्हांस शिकवितांना त्यांची दृष्टी अत्यंत व्यापक होती. राज्यघटना शिकवितांना लोकशाही या राज्यपद्धतीवरच त्यांचा जास्त भर असे. ब्रिटिश सरकार

हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्यांत किती दिरंगाई करते, देशामध्यें फारच चळवळ झाली तर शिळ्या भाकरीचा तुकडा फेंकल्याप्रमाणें एखादी 'प्रचंड (?) सुधारणा' कशी करत असते व कांहीं झाले तरी मुख्य मुख्य खातीं आपल्याकडेच कसे ठेवून घेत असते हें ते सांगत असत. (१) न्यूरॉकसी, (२) संस्थानिक, (३) रिझर्व्हेशन, (४) युरोपियनांचा भरणा अशा युक्त्या निर्माण करावयाच्या या ब्रिटिश सरकारच्या तंत्रावर ते सडकून टीका करीत असत. असें असतांना आपलें कर्तव्य काय हा विचार करण्यास ते आम्हांस शिकवीत असत. Civics शिकवतांना आदर्श नागरिक कसा असतो, त्याचीं कर्तव्यें काय, हिंदुस्थानांतील प्रत्येक तरुणानें कसें आदर्श नागरिक बनावयाचें, खरी समता कशी निर्माण करावयाची व सर्वांना जास्तीत जास्त सुख मिळेल असें कसें करावयाचें याचेंच ते आम्हांला शिक्षण देत असत. थोडक्यांत म्हणजे लो. टिळक, आगरकर, गोखले प्रभृतींनीं ध्येयित केलेलें राष्ट्रीय शिक्षण देऊन ते आम्हांला खरे राष्ट्रीय वृत्तीचे व आदर्श नागरिक बनवीत असत, आणि म्हणूनच मी वर म्हटलें आहे कीं, ते राष्ट्रीय शिक्षण देणारे होते.

डॉ. बाळकृष्ण यांच्याविषयीं किती लिहिलें तरी थोडेच आहे. त्यांचें परराष्ट्रगमन व तेथील कार्य, ऐतिहासिक क्षेत्रांतील कार्य, केरळ व निरनिराळ्या संस्थांतील कार्य — सर्व आयुष्य त्यांनीं जनसेवेंतच खर्चिलें. मला या लेखांत फक्त त्यांचा धर्माभिमान, राष्ट्राभिमान व राष्ट्रीयशिक्षण यांसच विशेष भर द्यावयाचा होता. त्याबरोबरच आम्ही विद्यार्थी त्यांना कधींच विसरणें शक्य नाहीं. जरी ते स्वतः आमच्यांतून नाहींसे झाले तरी ते आपली स्मृती आमच्या विद्यार्थ्यांत कायमची ठेवूनच गेले. आम्हांला अभिमान वाटतो कीं, आम्ही अशा थोर विभूतीचे विद्यार्थी आहोंत.



# आम्हां हरिजनांचा कैवारी

लेखक—श्री. विष्णु बळवंत शेडगे, कोल्हापूर.

२१ आक्टोबर, १९४० हा दिवस, कोल्हापूर आर्यसमाजाच्या आणि हरिजनाच्या दृष्टीनें अत्यंत अशुभकारक म्हणून लिहिला जाईल! कारण हा दिवस म्हणजे, 'आर्यधर्म,' 'आर्यसंस्कृति' आणि 'हरिजन' यांच्यासाठीं, अहर्निश झटणारे डॉ. बाळकृष्ण यांचा मृत्युदिन होय!

सामाजिक समतेचा प्रसार होऊन, बहुजन समाज शैक्षणिक, धार्मिक व सामाजिक बाबतीत प्रगतीपर व्हावा म्हणून कै. श्री छत्रपती शाहू महाराज यांनीं आपल्या राजधानींत १९१८ मध्यें आर्यसमाजाची स्थापना केली. १९२२ सालापासून डॉ. बाळकृष्ण हे समाजाचे प्रधान म्हणून काम पाहू लागले. त्या वेळेपासून जवळ जवळ १८ वर्षे, आर्यसमाजामार्फत हरिजनांची सुधारणा करण्याची डॉक्टरसाहेबांनीं जी उज्ज्वल कामगिरी केली ती अत्यंत संस्मरणीय होय.

आर्यसमाज गुरुकुल येथें असणाऱ्या मुलांना ते आपली मुलें असें समजत व त्यांचें जेवणखाण, कपडेलत्ते, आरोग्य, अभ्यास इत्यादि बाबतींत जिवापाड काळजी घेत असत. मुलांनाहि पण डॉक्टरसाहेब यांचेविषयीं अत्यंत आदर असल्यानें तीं मुलेंहि डॉक्टरसाहेबांच्या घरीं अत्यंत मोकळेपणानें वावरत.

"जे कां रंजले गांजले । त्यासी म्हणे जो आपुले ।" या तत्वाप्रमाणें, आर्यसमाजाचा हरिजन समाजामध्यें ज्यास्त प्रमाणांत प्रसार व्हावा व त्यांच्या अडीअडचणी समाजास समजाव्या म्हणून त्यांनीं हरिजन समाजांतील कांहीं मुलांना शिक्षण दिलें; त्यांना आर्यसमाजाचें प्रचारक नेमून त्यांच्या अडीअडचणी समजावून घेतल्या व त्या दूर केल्या.

डॉक्टरसाहेबांच्याकडे कोणीही मनुष्य कामाकरिता गेल्यास ते त्याचें म्हणणें समजावून घेत; व त्यास योग्य तो मार्ग दाखवून त्याचें समाधान करीत असत. त्यांच्याकडून आलेला प्रत्येक जण आनंदी व उल्हासी मनानेंच परत आलेला दिसे.

डॉक्टरसाहेबांना हरिजनांविषयीं अतिशय कळकळ व सहानुभूति वाटत असे. त्यांची सर्वांगीण उन्नति व्हावी म्हणून डॉक्टरसाहेबांनीं पुष्कळ श्रम स्वतः तर केलेच व दुसऱ्याकडून करवून घेता आले तितके घेतलेच. हरिजनांचे थोर व विद्वान पुढारी डॉ. आंबेडकर यांचा व डॉक्टरसाहेबांचा अत्यंत जिव्हाळ्याचा स्नेह होता.

डॉक्टर बाळकृष्णांनीं आर्यसमाजद्वारा कोल्हापूर इलाख्यावर प्रचारकार्य करून हरिजन लोकांच्या दुःस्थितीचें अवलोकन केलें, तन्निवारणार्थ जिवापाड श्रम केले; हरिजनांच्या वस्तींत जाऊन सभा भरविल्या, व त्यांना आपल्या गोड, साध्या व सोप्या भाषेनें समजेल असा उपदेश करून त्यांना त्यांच्या उन्नतीचा मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला. १९२५ सालीं हेर्ले येथें आर्यसमाजाची स्थापना करून तेथील लोकांत साक्षरताप्रसार व्हावा म्हणून त्यांच्याकरिता अेक रात्रीची शाळा सुरू करून त्यांच्यात शिक्षणप्रसार केला. तसेंच, लोकांना सावकारी पाशांतून सोडवून त्यांच्यात अैक्य संपादन होऊन त्यांना सहकारी करण्यासाठीं 'भद्रनंद' व 'दयानंद' नांवाच्या दोन पतपेढ्या सुरू करून दिल्या.

हेर्ले येथील आर्यसमाजिस्ट लोकांनीं आपणास मंदिरप्रवेश व गांव पाणवठ्यावर पाणी भरण्याची मोकळीक मिळावी म्हणून श्रीमद् जगद्गुरु यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरविली. याचा परिणाम असा झाला कीं गांवातील दुकानदारांनीं हरिजनांना माल देण्याचेंच बंद करून

टाकलें. ही बातमी डॉक्टरसाहेबांना कळतांच आर्यसमाजामार्फत २०० रु. खर्चून 'श्रद्धानंद' नांवाचा स्टोअर सुरू केला; व हरिजन लोकांची गैरसोय दूर केली. तसेंच आर्यसमाजिस्ट लोकांची वसाहत वेगळी असावी म्हणून करवीर दरबारकडून त्यांच्या वसाहतीकरितां स्वतंत्र जागा मिळवून दिली. कोल्हापूर येथील शुगर मिल, शाहू मिल व इचलकरंजी, सांगली इत्यादि ठिकाणच्या कारखान्यांतून पुष्कळशा हरिजनांना नोकऱ्या लावून दिल्या. शिवाय, सरकारी कायद्याप्रमाणें कायमचे चोर व दरवडेखोर समजल्या जाणाऱ्या रामोशी लोकाना दररोज हजरी घावी लागत असे. अशाही लोकांची सुधारणा व्हावी म्हणून दरबारच्या सहाय्यानें कित्येक रामोश्यांच्या हजऱ्या बंद करून त्याच्या वसाहतींत प्रौढ शाळा काढून त्यांच्यांत साक्षरता-प्रसाराची महनीय कामगिरी केली. जितक्या तऱ्हेनें आपल्या हातून लोक-कल्याण करतां येईल तितक्या तऱ्हेनें डॉक्टरसाहेबांनीं जिवापाड प्रयत्न केले.

अशा तऱ्हेनें आपल्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत आर्यसमाजा-मार्फत हजारों हरिजनांच्या उद्धारासाठीं अविश्रांत झटणारे डॉक्टरसाहेब देहानें दूर दूर गेले असले तरी, मनानें आमच्यांतच आहेत अशी आमची दृढ श्रद्धा आहे.



# तरुण करवीराचे पहिले आचार्य

लेखक:—प्रो. वा. रा. कोलटकर, एम्. ए., टी. टी. (लंडन), कोल्हापूर.

आज अखिल भारत ज्या तरुण करवीराकडे कौतुकानें पाहत आहे त्याचा त्या वेळी नवयुगात नुकताच जन्म झाला होता. त्याचें प्रेमानें संगोपन करायला कै. श्री. राजाराम महाराजांसारखा पुण्यश्लोक पिता सिद्ध होता, आणि त्याला सर्वांगीण सतेज शिक्षण द्यायला डॉ. बाळकृष्ण यांच्यासारखा कुशल आचार्य लाभला! डॉ. बाळकृष्णांकडे राजाराम कॉलेजचें प्राचार्यपद असल्यानें त्या संस्थेची अभूतपूर्व अशी वाढ झालीच; पण ही वाढ अखिल करवीराच्या वाढत्या वैभवाची द्योतक अथवा प्रातिनिधिक होती. कारण, बाळकृष्णांनी केवळ राजाराम कॉलेजच वाढविलें नाही. त्यांनी नव्या करवीराच्या बालमनात विविध विचारांचीं नि ध्येयांची बीजें रुजविलीं, त्याला नव्या आकांक्षांची ओळख करून दिली, त्याचें मनःक्षितिज विस्तृत केलें. आपल्या पराक्रमी पूर्वजांच्या स्फूर्तिप्रद गुणगानानें त्यानी तरुण करवीराला नवी जागृति आणिली आणि त्याला स्वपराक्रमासाठीं विविध क्षेत्रें उघडून दिली. आपल्या या प्रिय शिष्याच्या प्रगतीसाठीं त्यांनी अनेक साधनें जोडलीं, नव्या उभारणीच्या नि सेवेसही तयार केलें. आज तरुण करवीराच्या आनुवंशिक कर्तृत्वाला जें तेज चढत आहे त्याचें श्रेय आद्य छत्रपतींचे आशीर्वाद, राजाराम महाराजांचें पुत्रवत् संगोपन नि बाळकृष्णांच्यासारख्या मार्गदर्शकांची कामगिरी यांना दिलें पाहिजे.

डॉ. बाळकृष्ण राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपल होण्यापूर्वी त्या जागेवर ऑक्सफर्डसारख्या जगद्विख्यात विश्वविद्यालयांत पढलेले किती सद्गृहस्थ, मि. ए. डार्बी महादेवासारखे गुरु स्वतः धर्मोपदेशक, आणि प्रा. आपटेसारख्या अनन्यसाधारण प्रज्ञेचे विद्वान होते. विद्यार्थी

या नात्यानें त्या सर्वांचीच कारकीर्द पाहण्याची संधि मला मिळाली होती. कॉलेजचें त्या वेळचें तें चित्र जग आम्हाला खरोखरच आवडत असे नि त्यामध्ये आम्ही खूप रमतही असूं. पण आजच्या नव्या दृष्टीचा झोत त्यावर पडला की त्याचें संकुचित, एकांगी, विरस जीवनाची काहींशी चीडच वाटू लागते. प्रि. डार्बी यांच्या विद्वत्तेची धाव कोणालाही न कळणाऱ्या इंग्रजी व्याकरणाच्या पुनर्घटनेपलीकडे कधींच गेली नाहीं, आणि त्यांचे सर्व श्रम प्रवाहपतित त्याच त्या पुस्तकांची ने-आण करण्यात अन् आम्हांला इंग्रजी वृत्तांचा निष्कारण परिचय करून देण्यात खर्च होत असत. अवहोनियन नेपाळसिंहांचे स्वास्थ्यप्रिय शरीर व ढीलें मन महाराष्ट्राच्या रुक्ष दगडी प्रदेशात फारसें कधींच रमलें नाहीं. प्रि. आपटे यांच्यासारख्या स्वतंत्र बुद्धीच्या विद्वानाला आर्य-समाजाची कारकीर्द मानवलेली दिसली नाहीं, आणि गणितासारख्या गूढ विषयाला जन्मभर वाहून घेतल्यामुळें त्यांच्या एकान्तप्रिय स्वभावाला शिक्षणाच्या सर्वव्यापी स्वरूपाकडे पाहता आलें नाहीं. शिवाय प्रिन्सिपलशिप आणि पेन्शन त्यांना जवळ जवळ एकदमच मिळाली यानंतर डॉ. बाळकृष्ण आले. कॉलेजचें सवेतन आचार्यपद सरकारनें त्यांना दिलें; पण पूर्वी कोणत्याही प्रिन्सिपलनें न मिळविलेलें तरुण मनावरचें सन्मान्य आचार्यपद डॉ. बाळकृष्णांनी स्वतःच्या कर्तबगारीवर मिळविलें!

बाळकृष्णांच्या या त्या स्पृहणीय यशाचें मर्म कोणतें? त्यांची सर्वंकष बुद्धिमत्ता आणि अपरंपार विद्वत्ता हिंदुस्थानाच्या वेदही गाजली असून त्यांची असामान्य याजकता, नि इतर विविध गुण यांचाही आता वाचकांना परिचय झाला आहे. पण या सर्वांच्या मुळाशी त्यांचा विशाल ध्येयवादी दृष्टिकोन व त्याच्या उच्च पातळीवरून मनतोयोगानें कमावलेलें सर्वांग-संपन्न व्यक्तिमत्व होतें. त्यांनी कॉलेजला पुस्तकी वेदाध्ययनाचें रूप येऊं

दिलें नाहीं, कोणत्याही ज्ञानक्षेत्रास तुच्छ वा परकें लेखलें नाहीं, ज्ञानार्जनाइतकीच आरोग्याची काळजी वाहिली, विद्वत्तेइतकीच जनसेवेची कळकळ बाळगली, अर्थशास्त्रानें मन जड व रुक्ष होऊं न देता गान-शिल्पादि कलांवरील आपली आसक्ति कायम राखिली, नि पाश्चात्य विद्येंत पारंगत होऊनही आर्यधर्मावरील विश्वास अढळ ठेवला. प्रत्येकाशीं गोडी-गुलाबीनें वागून त्याजकडून योग्य तें कार्य करवून घेण्याचें कौशल्यही त्यांच्या व्यक्तिमत्वाचाच एक भाग होता. बाळकृष्णांच्या कर्तृत्वाचा दुसरा घटक त्यांची धडाडी. त्यांच्या प्रचंड योजना अखंड चालू असत. तपशिलांच्या कटकटींना आणि अडचणींच्या मुताला न जुमानता ' आगे चलो ' हें त्यांचें ब्रीद. असल्या गतिमत्तेमुळें त्यांना आपलें व्यापक कार्य सभाळतां आलें व निरनिराळ्या आघाडींवर राहून अनेकांना स्फूर्ति देतां आली, कार्यप्रवृत्त करतां आलें. पण बाळकृष्णांच्या यशाचें रहस्य साकल्यानें समजण्यास त्यांच्या उंच, गौरवर्ण, हसऱ्या धीरोदात्त मूर्तीची आठवण ठेवणें आवश्यक आहे. तिची प्रत्येक हालचाल, तिचा प्रत्येक शब्द आत्मविश्वासाच्या अखंड झऱ्यातून निघाल्यासारखा वाटे. आपल्या कार्यावरील त्यांची श्रद्धा कधींही ढळली नाहीं. कठीण प्रसंगींही त्यांची समता भंगली नाहीं. सह्याद्रीसारखी त्यांची धृति केव्हांही चळली नाहीं. जेव्हां जेव्हां मला डॉक्टरांची आठवण होते तेव्हां तेव्हां असंख्य पुस्तकांच्या गराड्यामध्यें त्यांची कृश मूर्ती बसली आहे, भोंवती कोणीतरी तक्रारी नि अडचणींचा पाढा आवेशानें वाचीत आहेत, आणि त्यांचें म्हणणें सत्काळ शांतपणें ऐकून घेऊन, मधूनमधून खोकत, पण शांत हसऱ्या मुद्रेनें 'अच्छा' म्हणून, ते त्या प्रसंगांतून चातुर्यानें वाट काढीत आहेत, हेंच चित्र पुनः पुनः माझ्या डोळ्यांसमोर येतें.

# डॉ. बाळकृष्ण यांचीं कांहीं विद्यालयीन पुस्तकें

लेखक—प्रो. ग. श्री. देशपांडे, एम् ए, बी टी., कोल्हापूर.

डॉ. बाळकृष्णाच्या विपुल ग्रंथसंभारामध्यें विशिष्ट पार्श्वभूमिवरून लिहिलेले असे कांहीं ग्रंथ आहेत. विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमास मार्गदर्शक व त्याचबरोबर सामान्य नागरिकाच्या बौद्धिक जीवनास पोषक असा एक ग्रंथसमुच्चय डॉक्टरसाहेबांनीं लिहिला आहे. यामध्यें 'Demands of Democracy', 'Indian Constitution' 'The Federal Constitution of India' इत्यादि इंग्रजींतील ग्रंथ व 'भारत वर्षाचा संक्षिप्त इतिहास' (तीन भाग) हा मराठींतील क्रमिक पुस्तकवजा असलेला ग्रंथ हीं मुख्यत येतील 'शिवाजी द ग्रेट', 'हिंदुस्तान व इंग्लंड यामधील व्यापार—संबंध' अगर 'हिंदु तत्त्वज्ञानाचे विचार' वगैरे ग्रंथ चिरकालीन व सखोल अभ्यासजन्य आहेत; तर वर सूचित केलेला ग्रंथसमुच्चय हा सामान्य जनतेच्या दृष्टीनें सहजासहजीं समजेल अशा पद्धतीनें विवक्षित प्रश्नाची चर्चा करण्यासाठीं किंवा विद्यार्थ्यांस अभ्यासक्रमांत मदत होईल अशा उद्देशानें लिहिलेला आहे. याच उद्देशानें त्यांनीं वेळोवेळीं दिलेलीं व्याख्यानेंही विपुल व चिरस्मरणीय आहेत. तशींच याच उद्देशानें लिहिलेली कांहीं पुस्तकेंही आहेत प्रस्तुत लेखविषय हा अशा कांहीं पुस्तकांची सामान्य ओळख करून देणें हा आहे.

अशा पुस्तकांत 'Demands of Democracy' हें एक महत्त्वाचें पुस्तक आहे लोकशाही व प्रातिनिधिक संस्था यांच्या जीवनांत इ स १९२० ते १९२५ हा काल महत्त्वाचा आहे. यावेळीं पुढारलेल्या लोकशाहीप्रधान देशांत प्रातिनिधिक मंडळाचे घटनात्मक

दोष प्रामुख्यानें पुढें आले होते. प्रातिनिधिक संस्थांची निवड करण्याच्या अगर मत ठरविण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळें (Majority System) या संस्थांमधून लोकमताचें खरें प्रतिबिंब न दिसतां त्याचा फक्त आभास होतो हें सर्वांस पटलें होतें आणि या मंडळांची रचनात्मक सुधारणा व त्यांच्या कार्यपद्धतींत ध्येयसाध्यासाठीं आमूलाग्र फरक यासाठीं सर्वत्र जोरदार चळवळही सुरू होती. हिंदुस्थानातही १९२१ सालची नवी प्रातिनिधिक मंडळें नुकतींच स्थापन झालीं होतीं. त्यामध्यें सर्व समाज-घटकांच्या विचारप्रवाहाचें खरें प्रतिबिंब दिसपत पडतें व तें अगदी बरोबर व स्पष्ट असें पडेल हा अत्यंत जिव्हाळ्याचा व जिवंत प्रश्न होता. अशा-वेळीं 'Demands of Democracy' या पुस्तकाचा जन्म झाला.

या १७५ पानांच्या लहानशा ग्रंथांत विषय पुढीलप्रमाणें आहे तात्त्विक व ऐतिहासिक दृष्ट्या लोकशाही ही प्रत्यक्ष (Direct Democracy) अगर प्रातिनिधिक स्वरूपांत असू शकते, पण आधु-निक जगांत ती मुख्यत प्रातिनिधिक स्वरूपांतच शक्य आहे प्रचलित प्रातिनिधिक संस्था या सामान्यत त्याच्या बहुमत पद्धतीनें निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या असतात या पार्श्वभूमीवर सामर्थ्यांत प्रतिपाद्य विषयास सुरवात केली आहे वरील पद्धतीमुळें व इतर घटनात्मक दोषांमुळें प्रातिनिधिक संस्थांचा मुख्य उद्देश सफल होत नाही. या संस्था समाजाच्या मताचें खरें प्रतिबिंब न दाखविता पुष्कळवेळी अत्यंत विकृत प्रतिबिंब दाखवितात उदाहरणार्थ, एखाद्या देशाच्या प्रातिनिधिक मंडळाचे बहुसंख्य सभासद पुष्कळवेळीं अल्पसंख्य मतदार नीच निवडलेले असतील. कारण त्यांस बहुसंख्य असलेले मतदार त्या देशांतील मतदार—इतरांमध्यें असे पडलेले असतील की पण केवळ विभागांतूनच यांचे प्रतिनिधी निवडले जातील, व ऐवजी ते प्रतिनिधिक मंडळांत

अल्पसत्य दिसतील थोड्याफार फरकानें अशा तऱ्हेचें विकृत व अन्यायमूलक प्रतिनिधित्व हें पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतें

यासाठीं निवडणुकीच्या व प्रातिनिधिक संस्थांच्या कार्यपद्धतींत आमूलाग्र सुधारणा पाहिजे अशी सुधारणा करण्याचे नानाविध मार्ग आहेत ते असे (1) Proportional Representation (11) Initiative (111) Referendum (1v) Recall (v) Plebiscite etc

या निरनिराळ्या प्रकाराची योग्य ती माहिती व गुणदोष चर्चा हा प्रस्तुत पुस्तकाचा मुख्य भाग होय Proportional Representation चा इतिहास, व या पद्धतीचे नानाविध पोट विभाग व त्यांची गुणदोष चर्चा हा पहिल्या प्रदीर्घ प्रकरणाचा विषय आहे पुढील आठही प्रकरणांत लोकांचा स्वत च कायद्यांचा मसुदा अगर ठराव मांडण्याचा हक्क व तो बजावण्याची पद्धत (Initiative) याची व प्रातिनिधिक मंडळानीं केलेले कायदे अगर नियम याना लोकसंमति मिळविण्याच्या प्रकारांची (Referendum) चर्चा आहे शेवटच्या प्रकरणांत प्रातिनिधिक मंडळांनीं पास केलेल्या विशिष्ट धोरणास संमति देणें व निवडलेल्या अधिकाऱ्यास मुदतीपूर्वी अधिकारावरून दूर करणें या लोकांच्या हक्क–बजावणीसाठीं असलेल्या पद्धतींची (Plebiscite व Recall) चर्चा आहे पुस्तकाचे आरंभीं व निरनिराळ्या प्रकरणांचे शेवटीं आधारभूत ग्रंथाची उत्कृष्ट यादी आहे स्वल्पभाषी पुस्तकाची यापेक्षा जास्त रूपरेषा देतां येत नाहीं

या पुस्तकाचे कांहीं विशेषही आहेत

(१) अत्यंत समयोचित विषयावर हें पुस्तक आहे विद्यार्थीवर्ग व कॉलेजच्या सभोंवतालचा समाज यांच्या दृष्टीनें खऱ्या प्राचार्यांच्या

जबाबदारीची डॉक्टरांची व्यापक कल्पना व ती पार पाडण्यासाठीं ते करीत असलेलें कार्य यांचें हें पुस्तक म्हणजे उत्कृष्ट उदाहरण होय. विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमाचा विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें व्यापक अर्थ करून त्याबरोबरच सामान्य नागरिकांना कॉलेजमध्यें नागरिकत्वास पोषक असें ज्ञान व पुढाकार देऊन डॉक्टरांनीं आपल्या 'प्राचार्य जबाबदारीचा' व्यापक अर्थ सार्थ केला. हें पुस्तक व त्यांनीं इ. स. १९२२ पासून चालविलेलीं "Extension Lectures" हीं याचेंच द्योतक होत. अशाच उद्देशानें प्रस्तुत ग्रंथविषयावर डॉक्टरांचीं सार्वजनिक व्याख्यानेंही कॉलेजहॉलमध्यें झालीं होतीं. अशी त्यांचीं नाना विषयांवरील कितीतरी व्याख्यानें अद्याप दुमदुमत आहेत.

(२) या पुस्तकांतील आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे यांत दिसून येणारी त्यांची अध्यापन शैली. डॉक्टरांच्या आयुष्यांतही सन १९२२ ते १९२८ याच काळांत त्यांची अध्यापन शैली अत्युच्च होती. पुढें त्यांचा आजार, 'शिवाजी' चरित्रविषयक कार्य, वाढत्या कॉलेजचा व्यवस्था—व्यवसाय व त्यांचा आर्यसमाज यामुळें त्यांच्या अध्यापनास व्यापाल्यानें गौणत्व आलें. त्यांच्या अध्यापनाच्या अत्युच्च काळांत आम्ही त्यांचे विद्यार्थी त्यांजकडे अध्यापनाचे बाबतीत किती अभिमानानें पहात असूं! इतर कॉलेजमधील विद्यार्थी मुद्दाम त्यांच्या वर्गांत येऊन बसत असत. विद्यार्थ्यांसाठीं विषय सुलभ करतांना, नानाविध उदाहरणें देत देत ते चर्चा चालवीत, विषयाचे योग्य छेदन करीत व पुन्हा सर्व दुवे व्यवस्थित जमवीत आणि या सर्वांनीं भरपूर अभ्यास, शिकविण्याची तळमळ, लोकशाहीशीं तादात्म्यता ही मूर्तिमंत असत.

या पुस्तकांत कांहीं दोषही प्रामुख्यानें दिसतील. विशेषतः पुस्तकाच्या नांवावरून त्यांतील विषयविस्ताराबद्दल कितीतरी गैरसमज होतो.

या पुस्तकात लोकशाहीवरल आणखी कितीतरी गोष्टींच्या चर्चेची अपेक्षा निर्माण होते; पण त्यात नमलेल्या गोष्टींवरल टीका करण्याची जरूर काय? एकंदरीत लोकशाहीच्या काही मुख्य सूत्रांची अयंत उपयुक्त चर्चा यात मिळते.

* * *

'भारत वर्षाचा संक्षिप्त इतिहास' हे तीन भागात प्रसिद्ध केलेले डॉक्टरांच्या शालेय पुस्तकांपैकी एक महत्त्वाचे पुस्तक आहे. जरी 'संक्षिप्त इतिहास' असे या संबंधी म्हटले आहे तरी यात 'इंग्लीश बॉडी' टाइपाची एकदर ७०० पानें आहेत. महाराष्ट्रातील किंबहुना हिंदुस्थानातील ऐतिहासिक क्रमिक पुस्तकामध्ये या पुस्तकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या विभागास विशिष्ट अर्थानें पहिला मान दिल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. तीन्ही भागामध्यें भरपूर व संशोधकाच्या दृष्टीनें अद्यावत् (१९२० सालीं) माहिती आहे, हें या पुस्तकाच्या कर्त्याचें नाव पाहिल्याबरोबरच पटेल. शालेय पुस्तकें बहुधा दुय्यम शिक्षक वर्गाकडूनच लिहिलीं गेलीं आहेत व त्यामध्यें विषयासंबंधीं सखोल व व्यापक ज्ञानाची वाण भासल्यास आश्चर्य नाहीं. या दृष्टीनें हें डॉक्टरसाहेबांचें पुस्तक अर्थातच फार उपयुक्त आहे. पण यापेक्षाही इतिहास–अध्यापन–शास्त्राच्या दृष्टीनें या पुस्तकानें एका नवीन युगास सुरुवात केली आहे. यातील विषयाची मांडणी, हल्लीं अत्यंत उपयुक्त व शास्त्रोक्त मानल्या जाणाऱ्या पद्धतीनें— Topical treatment within broadly defined periods of Human movement—करण्याचा यशस्वी प्रयत्न प्रथमच केलेला दिसेल. इतिहास अध्यापन–शास्त्राची आपल्याकडे गेल्या १०।१२ वर्षांत झपाट्यानें प्रगति होत आहे त्या दृष्टीनें प्रस्तुत पुस्तकातील विषय मांडणी आणखीही सुधारता येईल पण या नव्या दृष्टीनें प्रयत्न करणारें हें पहिलें पुस्तक होय. व अद्यापिही या बाबतींत मराठीमधील कोणत्याही इतिहासावरील क्रमिक

पुस्तकानें याचा मार्ग टाकलेलें नाहीं. या मुद्याचा विचार करतांना डॉक्टरसाहेबांच्या इतिहासाचा पहिला भाग मात्र वगळावा लागेल.

या तीन्ही भागांमधील नकाशे व चित्रसंभार हा इतर कोणत्याही ऐतिहासिक क्रमिक पुस्तकापेक्षां प्रकार, गुण व संख्या या दृष्टीनें अनेक पटींनीं श्रेष्ठ आहे इतकेंच नमूद केलें म्हणजे पुरे.

इतिहास अध्यापनशास्त्राच्या प्रगतीबरोबर अलीकडील पुस्तकांमध्यें कालनिदर्शक रेषा, तुलनात्मक तक्ते, वीतक रेखाचित्रें वगैरे अनेक प्रकारच्या साधनांचा उपयोग करण्यास सुरवात झाली आहे, ही अर्थातच डॉक्टर-साहेबांनीं उपयोगांत आणलेली नाहींत; पण या पुस्तकाचा प्रकाशन काल आपण लक्षांत घेतला म्हणजे नसलेल्या गोष्टींबद्दल टीका किती अप्रासंगिक आहे हे दिसेल. तसेंच भाषेच्या दृष्टीनें लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे इंग्लिश, हिंदी, उर्दू, संस्कृत भाषाप्रवीणानें मराठीची फक्त तोंड-ओळख असतां देखील तोकभाषेंतच या पुस्तकाची रचना केली, यामुळें भाषेंत राहिलेल्या थोड्याशा दोषांकडे लक्ष न जातां ही कृति अत्यंत कौतुकास्पदच वाटते.

इतर विद्यालयीन पुस्तकें ही विशेषतः कॉलेजमधील प्रीव्हियस व इंटरचा वर्ग यांतील विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें लिहिली आहेत. व या सर्वांमध्यें त्यांच्या प्रकाशनकालाच्या दृष्टीनें अद्ययावत् माहिती व विशेष प्रमाणात योग्य भर दिलेला दिसतो. आणि या सर्वांतूनही सर्व ऐतिहासिक प्रकाशनांमध्यें डॉक्टरसाहेबांचा एक महत्त्वाचा दृष्टिकोन पुरेपूर प्रकटलेला दिसतो व तो म्हणजे आर्यत्व व राष्ट्रीयत्व. डॉक्टरसाहेबांच्या इतर सर्व ग्रंथांमध्यें त्यांचें आर्यत्व व जागृत राष्ट्रीयत्व हेंच देदीप्यमान मुकुटमणी व त्यांची प्रभा या विद्यार्थीय पुस्तकांत पुरेपूर दिसते यांत नवल तें काय?

# Dr. Balkrishna and the Arya Samaj

By—Dr. A. C. BOSE, M. A., Ph. D.,
Rajaram College, Kolhapur.

(1)

Dr. Balkrishna was born in an orthodox Hindu family. It was after passing his Matriculation examination, when he was a student in the D. A. V. College, Lahore, that he came into close contact with the Arya Samaj and its manifold activities. He very soon got himself enrolled as a member of the Young Men's Aryan Association and began to take a leading part in this student movement. He was given the highest honour by the Association when a few years after, in 1916, at its Lucknow session, it elected him the President of the annual Conference which was held at the same time as the session of the Indian National Congress of the "Lucknow Pact" fame.

After obtaining his M. A. degree in 1908, Dr. Balkrishna had to make a choice between the two rival systems of education followed by the Arya Samaj · the College system and the Gurukul system. He chose the latter and joined Acharya Munshiram ( later Swami Shraddhanand ) at Gurukul, Kangri, as Professor of Economics. Gurukul Kangri is a residential college in which the staff and students live in a simple old-world style. The professors not only work on a sacrificing basis but also collect funds in their spare time and during vacations for the up-keep of the institution. Besides, they are also the torch-bearers of the Vedic religion and culture and of the reformist ideal followed by the Arya Samaj. Dr. Balkrishna was frequently busy

about the collection of funds and untiring in lecture-work in furtherance of the Arya Samaj cause Both these activities as well as the common residential life of teachers and students in the Gurukul brought Dr Balkrishna and his pupils into close contact This Gurukul tradition of personal touch with students was maintained by him in his later career too as a college Principal

(2)

During his ten years' life at Gurukul he became deeply interested in the different aspects of the Arya Samaj tenets, and brought a scholastic mind to the study of various religious problems For example, he interested himself in European religious literature in connection with the doctrine of revelation His "Veda, the Word of God", as the title implies, is an assertion of the revealed character of our scriptures.

More interesting were the results of his researches in ancient Indian history He discovered legitimate grounds for pride in our ancient civilisation, by following the modern critical method which, of course, was backed up by the zeal of the Arya Samajist He opposed the facile theory spread by ordinary school text-books about the ancient Indian Aryas—the theory that attributes to them nature-worship, primitive mentality and primitive ways of life He found them to have been a highly advanced race that had laid the foundation of world civilisation. He believed that India was the cradle of human civilisation. He cited philological authorities for the conclusion that Sanskrit was the mother of languages. He held the view that Indians had not only spread over the whole of Eurasia, but crossed the Baring Strait into America and given her culture and religion to what is now

known as the New World, which was no new world to her. He found great figures in ancient Indian history, who had made their contribution to different departments of life.

In certain respects he held theories not generally supported by historians, like, for example, the one attempting to connect ancient Indian and ancient Egyptian civilisations.

(3)

After completing ten years in Gurukul, Dr Balkrishna went to England and obtained the Ph D degree of London University at the end of a little over two years During the period he was frequently engaged in spreading the message of Arya Samaj and addressed meetings in different parts of Great Britain He also organised a meeting in London to celebrate the death anniversary of Swami Dayanand

Dr Balkrishna came to Kolhapur just after His Highness Shri Shahu Maharaj, who had called the Samaj to Kolhapur, had passed away Shri Shahu Maharaj was an enthusiastic admirer of the Samaj He had come into close contact with the ideals and leaders of the Samaj in 1917, called some Samaj workers to his State and decided that it should be a centre for the spread of the Vedic religion and ideals of the Arya Samaj This decision of his had far-reaching effects In 1918 he made a gift of land and buildings to the newly established Arya Samaj at Kolhapur to conduct a middle English school, a Gurukul and an orphanage according to Arya Samaj principles In the following year he took a more important step He handed over the Rajaram College and Rajaram High School to a provincial Arya Samaj organisation of North India, the Arya Pratinidhi Sabha U P. The Sabha had been conducting the institutions for two years when Dr. Balkrishna joined the college as Principal.

During those two years some important progress had already been recorded The college was raised in 1920 from the I A to the B A standard, though the affiliation was temporary

The present writer, who had been placed in charge of English in the newly opened B A classes in 1920, was one of those who welcomed Dr Balkrishna to the college in 1922 The Doctor was fresh from England, full of new ideas about education and college life, and of high enthusiasm He started on his new career with remarkable zeal

He was only too keenly conscious of the fact that he was the chief representative of the Arya Samaj in Kolhapur and that it lay with him to make history for that body in the Deccan But as an Arya Samajist he was considerably changed from what he had been in Gurukul He had breathed in the atmosphere of the modern western world As a result of his new and wide experiences he had developed a cosmopolitan outlook on life For example, in selecting new staff, which he had to do at the beginning of the year, he did not restrict his choice to Arya Samajists Throughout his career as Principal he maintained this liberal attitude

(4)

In the first Extension* Lecture that he delivered from the college platform, he made an attempt in the light of his recent studies, to establish the greatness of India. For example, he pointed out how India had successfully resisted the impact of the religion of Moslem conquerors for over five hundred years, while countries like Egypt, Turkey, Persia and Afghanistan had almost wholly succumbed to it within a year or two It was also remarkable that he took pride not

only in India but also in other Asiatic countries He spoke with enthusiasm of the Moslem conquests in Europe

Dr Balkrishna's application of Arya Samajist principles to the social life of students was interesting He found that for the previous year or two no Social Gathering of students had been held, owing to a caste controversy about the college dinner He solved the problem by doing away with caste altogether in respect of the dinner He issued a notice that the Social Gathering would be held that year and that those who wished to take part in a cosmopolitan dinner, which would be served by members of different communities—Brahmins, non-Brahmins, "Untouchables", Moslems, Christians—should submit their names, and that those who did not like to join the dinner would be offered light refreshments of the orthodox type in the after-noon The plan worked wonderfully and the cosmopolitan dinner was the first of its kind in Kolhapur

Here it should be noted that Dr Balkrishna not only showed the liberalism of Arya Samaj in combining all classes of Hindus together, he went farther and combined members of other religions too

The University of Bombay had been critically watching the transfer of power from the Kolhapur Darbar to the A P. Sabha U P The University Commission of the previous year had taken up a rather unfavourable attitude Dr Balkrishna put up a strong defence on behalf of the Sabha. He was also soon nominated to the University Senate In a short time the A P Sabha was enjoying the full confidence of the University authorities Kolhapur won the distinction of being a centre for University examinations The Principal

and several of his colleagues were appointed examiners The first University commission in Dr. Balkrishna's regime consisting of Father Blatter, Principal McKenzie and Prof. P. A. Wadia sent a very appreciative report. It is interesting to note that they had a good word to say about the Arya Samaj complexion of the institution including the religious instruction. Year after year the college went from strength to strength, to the great satisfaction of the Ruler of the state, Chhatrapati Rajaram Maharaj, and of his veteran Dewan, (now Sir) Raghunathrao Sabnis, and of all the people of Kolhapur interested in higher education and the progress of the State.

After the retirement of Sir Raghunathrao and the appointment of a new Dewan, (then) Rao Bahadur Latthe, the State took back the charge of the college and the school from the Arya Samaj. But Dr Balkrishna continued as Principal and was taken into State service. The change of management did not mean much of a break Only the religious instruction was dropped, but the "cosmopolitan dinner" continued The progress of the institution was maintained. The number on the roll greatly increased till Rajaram college was among the biggest half-dozen colleges in the whole presidency.

His second marriage in 1925 with a Deccani lady was typical of his Arya Samajist outlook.

(5)

From this time forward Dr. Balkrishna set his mind to the development of the Kolhapur Arya Samaj. He built the Arya Samaj temple, the Shraddhanand Hall, with public subscription received from Princes, Chiefs and the people. He erected two other buildings in the same premises out of

the earnings of the Arya Bhanu Press, owned by the Samaj. Every year he invited distinguished people from outside during the anniversary of the Samaj He published a Marathi version of Swami Dayanand s *magnum opus*, the "Satyarth Prakash , which is sold at a nominal price

He developed the Free school and Boarding Houses conducted by the Kolhapur Arya Samaj The School was raised from the Middle English to the Matriculation standard He erected a Students' Home near the school premises and named it after the Chhatrapati Maharaja, who performed its opening ceremony He took up a school in Sankeswar and managed it, in spite of many difficulties, with remarkable resourcefulness He obtained a grant of land from the Darbar for the Arya Samajist Harijans at Herla

(6)

We have seen how as an Arya Samajist he took great pride in the glories of India and in the great sages and heroes of old But here in Maharastra he found a history of recent times which was highly illustrious and discovered a great national hero, who was not inferior to the legendary heroes of old in Chhatrapati Shivaji He brought to light old letters written home by Englishmen of the factories, in which Shivaji was compared to Alexander, Hannibal and Julius Caesar Thus the search of the national greatness of India which he had begun in Gurukul —sometimes through the obscure and misty region of legend—now culminated in the discvery of an historical figure whose greatness shone all the more brightly for being seen at a close perspective In the voluminous "Shivaji the Great" the ardent patriot laid out concrete and well-documented facts about a magnificent national hero

रायगडच्या किल्ल्यावर डॉ० बाळकृष्ण



(पायाजवळ भडावरच्या तोफेचा गोळा)

One of the proudest days of Dr Balkrishna's life was the day he visited "Raigad", Shivaji s hill fort, "the eagle s nest ', as he described it when he was nearing the top of the hill I had the honour of being his companion on the journey. We had left Mahad on a May evening in 1933, spent the night at the foot of the hill in the Rest House, and started the climb at sun rise on the following day With his weak health and asthma it was almost doing the impossible Hardly ever I saw a happier man in my life than Dr Balkrishna as he found himself on the top of the hill and walked from one end of it to the other, giving us the historical details. We sat long by the Shivaji monument and left in the afternoon

(7)

Dr Balkrishna carried the message of the Arya Samaj to different parts of India, but the great moment of his life came when he was elected by the International Aryan League, Delhi, the supreme body of Arya Samaj, to represent it at the Parliament of Religions held in U S A. in 1933 In spite of poor health he ventured out of his country to a distant land and made a worthy contribution to the proceedings of the World Conference. After the Conference work he toured in U S A and Europe and returned home with a rich experience of the world abroad

But he had now only five more years of his life left to him These he lived very strenuously, being devoted to the two chief passions of his later life—the establishment of the Kolhapur Arya Samaj on a secure basis and the completion of his history of Shivaji Both these he accomplished, though at a great cost to his health.

He was a man of noble aspirations and had dreamt great dreams, one of which was the founding of a "Shivaji University" at Kolhapur. Many of these dreams remained unfulfilled, though to him they had never appeared impracticable. But he had fulfilled one great task of his life—he had finished his *magnum opus*, "Shivaji the Great", and made himself immortal as an historian. He also placed the Kolhapur Arya Samaj on a secure footing and for years to come the Samaj will, with the effort of workers who had the good fortune of having worked under his inspiration, enjoy the facilities for public service created by him. Arya Samaj, and Shivaji, the most real of the greatest Aryan kings, kept him feverishly busy in the last weeks of his life, and he died in harness, hardly thinking that the end was so near. I have no doubt that he had given to these noble pursuits more than he could afford. Like Dante's great epic, his historical epic—for such is "Shivaji the Great"—was written with his life's blood, and like that of the martyrs of the Samaj, he allowed his life to be cut short in order that the cause should prevail.



# A Worthy Son of India

By.—Shrimant Balasaheb Pant Pratinidhi,

Rajasaheb of Aundh

I knew late Dr Balkrishna for the last twenty years Dr Balkrishna was an ardent lover and student of History He took keen interest in the research work and study of the Indian History and particularly that of the Marathas He has written a very scholastic book on the life of Shivaji the great The book reveals the exceptional qualities and genius of the author It helped to obtain him fame and prominence among the scholars of History The book has its own originality in that it contains valuable information regarding the life of the great hero enlightening new aspects of his life, and thus making him more adorable

Dr Balkrishna's efforts in the sphere of higher education are equally praiseworthy Rajaram College prospered steadily under his able supervision The college got the permission for I Sc., and B Sc. classes during his tenure The credit of the new B T and Law colleges in Kolhapur, no doubt, goes to him in many respects

Dr Balkrishna was suffering from asthma and cough His constitution was rather weak and in autumn he used to be confined to his bed for several days but in spite of all these physical debilities, he could do so

much research work in History and has written so many volumes on the subject that even a healthy man will have to envy his achievements.

I was really proud of having the privilege of friendship with this great scholar of History. It was a great pleasure to me to discuss with him the incidents in Maratha History, whenever I could get an opportunity to meet him. I shall never in my life forget his individuality.

It is really a misfortune that Dr. Balkrishna left us all so early and we are deprived of his valuable additions to our glorious history. I wish eternal peace to the soul of this worthy son of India.



मिरज येथील सरकार वाड्यात श्रीमंत राजेसाहेब मिरजकर यांच्यासमवेत (१९३७)

# अखंड विद्याव्यासंगी

लेखक —श्रीमंत नारायणराव तात्यासाहेब पटवर्धन,
राजेसाहेब, मिरज सीनियर.

कै० डॉ० बाळकृष्ण हे कोल्हापुरास राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाल्यानंतर त्यांचा माझा प्रत्यक्ष परिचय झाला. पुढे सन १९३७, १९३८ व १९४० साली मिरजेस ते पावसाळ्यात मिरज स्टेशनजवळ आमच्या बंगल्यांत २।३ महिने येऊन राहत असत, म्हणून पूर्व परिचय दृढ होण्यास अधिक संधी मिळाली. त्यांना दम्याचा विकार असल्याने आणि कोल्हापुरापेक्षा मिरजेस पाऊस कमी असल्यामुळे येथील कोरड्या व स्वच्छ हवेचा डॉक्टरसाहेबांना चांगलाच फायदा होई.

**स्पष्टवक्तेपणा :** पावसाळ्याच्या अखेरीस मिरजेहून कोल्हापुरास परत जातेवेळी डॉक्टर आम्हांस सांगत "आपल्यासारख्या लोकांकडून उपकृत करून घेण्याची पाळी परमेश्वराने मला यापुढे आणू नये. दरवर्षी पावसाळ्यांत आपणांस बघावा तर मला शरम लागते आणि आपण तर माझ्याकडून भाडे घेत नाही. माझ्यासारख्या माणसाला हे देखील डोईजड वाटते. आपण सवडीप्रमाणे १।२ लहान खोल्या माझ्या-सारख्या लोकांना सोईस्कर होतील असे बांधून ठेवा म्हणजे मोकळ्या मनाने दरवर्षी मला येथे पावसाळ्यांत येता येईल, भाडे देऊन राहता येईल व आपल्या उपकारांचे ओझे माझ्या डोक्यावर अधिक पडणार नाही. आपल्या सौजन्याचा मर्यादेपेक्षा अधिक फायदा घ्यावा असे मला वाटत नाही."

**करारी स्वभाव :** खास शिस्तीमुळे त्यांना फार अगोदर पूर्वी ठरलेले कार्यक्रम बिनतक्रार पार पाडण्याविषयी ते सतत जागरूक असत.

आजारी म्हणून येथें विश्रांतीसाठीं आले असताही, आल्यागेल्याच्या गाठीभेटी, विचारविनिमय, सल्लामसलत नि महत्त्वाच्या विषयावर आप्तेवाईक चर्चा सदासर्वदा चालू असे. आजारीपणाची खरी खबर असताही, स्वभावांतील करारीपणामुळें, आपला दिनक्रम डॉक्टरसाहेबांनीं फारसा कधीं बदलला नाहीं.

**अखंड विद्याव्यासंग :** कै० डॉ० बाळकृष्णांना व्यसन कोणतें होतें म्हणून जर कोणी कुतुहलानें विचारलें तर मी म्हणेन वाचन नि लेखन हें त्यांचें व्यसन होय. आणि अशा विद्वान पुरुषाला हेंच व्यसन शोभतें मिरज ते कोल्हापूर नि कोल्हापूर ते मिरज असा आगगाडींतून प्रवास करतानासुद्धा शिवचरित्रावरील त्यांचें वाचन, मनन नि लेखन नेहमीं चालू असे दम्याच्या त्रासामुळें पहाटे त्यांना झोंप येत नसे या गोष्टीचा देखील त्यांनीं फायदाच घेतला लेखनव्यवसाय बहुतेक ते पहाटे करीत लाहोर, कलकत्ता, बनारस, मुंबई वगैरे ठिकाणच्या विद्वान लोकांशीं ऐतिहासिक विषयावर ते पत्रद्वारें विचारविनिमय करीत

**सहनशीलता :** आजार कितीही बळावला तरी तो ते निग्रहानें जास्तींत जास्त सहन करीत "दमा हा माझा चिरकाल टिकणारा स्नेही आहे त्याचेविरुद्ध फारसे उपचार करणें बरें नव्हे", असेच ते विनोदानें म्हणत अगदींच सहन होईनासे झाले म्हणजे औषधोपचारार्थ डॉक्टरला बोलावणें पाठवीत ही झाली आजाराची गोष्ट परंतु इतर बाबतींत देखील ते फार सहनशील होते कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांच्या तक्रारी ऐकणें व त्यांचें समाधान करणें यांत तर त्यांचा हातखंडा असे कांहीं स्थानिक प्रतिकूल गोष्टींमुळेंही त्यांना थोडा मानसिक त्रास झाला तथापि त्या वातावरणांत डॉक्टरसाहेब सहनशील म्हणूनच टिकून राहिले.

शिवचरित्र : छत्रपति श्री शिवाजी महाराज यांचें डॉ. बाळकृष्ण यांनीं लिहिलेलें चरित्र हें त्यांच्या लेखनकलेचें एक स्मारकच होय असें म्हणतां येईल. श्री. जदुनाथ सरकार, इतिहास संशोधक कै. राजवाडे, रियासतकार सरदेसाई, प्रो. पोतदार यांनीं शिवचरित्राचीं मिळविलेलीं साधनें व स्वतः डॉक्टरसाहेबांनीं अन्य ठिकाणांहून संकलित केलेली माहिती या सर्वांचा उपयोग त्यांनीं आपल्या शिवचरित्र या ग्रथांत केला आहे. या श्रमाचा परिणाम त्यांच्या दुर्बल प्रकृतीला बराच जाणवला असला पाहिजे असें मला वाटते. असो. येथें एक गोष्ट कै. राजाराम महाराज यांचेविषयीं नमूद करावीशी वाटते, ती अशी : डॉक्टरसाहेबांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबाच्या निर्वाहाची चांगली व्यवस्था कै. छत्रपति राजाराम महाराज यांनीं केली आहे, असें ऐकतों. आपल्या शाकर्त्या मूळपुरुषाच्या चरित्र लेखकाची संभावना छत्रपतींच्या घराण्यांत जन्माला आलेल्या राज्यकर्त्यास योग्य अशीच कै. महाराजांनीं केली असेंच कोणीही म्हणेल.

स्मारक कमिटीनें कै० डॉक्टरसाहेबांच्या स्मरणार्थ या चार ओळी लिहिण्याची ही संधी प्राप्त करून दिली याबद्दल मी तिचे आभार मानतों.



# विद्वान मित्र

लेखक : श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, जहागिरदारसाहेब इचलकरंजी.

डॉ. बाळकृष्ण याना आर्यसमाज व त्या समाजाचीं तत्त्वें यासबंधीं अत्यंत आदर व विश्वास होता. एकदा आर्य समाजासंबंधीं कोल्हापूर येथें होणाऱ्या उत्सवाचे प्रसंगीं बोलतांना आर्यसमाजाचीं कांहीं तत्त्वें व त्या समाजाची कर्तव्यनिष्ठा याचा मी गौरव केला होता. तेव्हा आभार मानताना डॉ. बाळकृष्ण मला उद्देशून म्हणाले कीं, "आपण सध्यां २।४ आणे आर्यसमाजिस्ट आहातच; व मला अशी खात्री वाटते कीं, लवकर आमचे धार्मिक आचारविचार आपणांस सर्वतोपरी मान्यच होतील." अशा तऱ्हेचे आर्यसमाजाच्या उज्ज्वल भविष्यासंबंधीं आदराचे उद्गार त्याचे तोंडून वारंवार निघत. दुसऱ्या एका प्रसंगीं राजाराम कॉलेजमध्यें एका कार्यक्रमासाठीं अध्यक्ष या नात्यानें मला बोलावण्यात आले होते. त्यावेळच्या माझ्या अध्यक्षीय भाषणांत मी डॉक्टराचे सबंधीं गौरवपर उल्लेख काव्यमय भाषेंत केला होता. भाषणें अर्थातच इंग्रजींतून होतीं. त्यांच्या महाराष्ट्राचे इतिहासाबाबतच्या कार्याचा उल्लेख करताना मी सुरवात अशी केली कीं, "डॉ. बाळकृष्ण परप्रांतीय असूनही आमचे म्हणजे महाराष्ट्रियांचें इतिहाससंशोधनाचें कार्य इतक्या उत्तम रीतीनें करतात याबद्दल आम्हा महाराष्ट्रियाना असूया वाटते." हे माझे उद्गार त्याना पसंत पडले नसावेत असे मला त्यांच्या कपाळावरील आठ्यावरून दिसले. पण पुढचे वाक्याला सुरवात करताच तें सर्व गढूळ झालेलें वातावरण विरघळून जाऊन त्याना हसू आले व आनंदही झाला. मी पुढें म्हणालों, "असे जरी असले तरी डॉक्टराचा 'उत्तमार्ध' (बेटर हाफ) यांचा जन्म व वाढ येथेंच झाली असून त्या पक्क्या महाराष्ट्रीय आहेत

तेव्हां डॉक्टरांच्या संशोधनापैकीं निम्में श्रेय महाराष्ट्रालाच आहे. हा मजकूर त्यांची पत्नी दयाबाई, मालशे यांची कन्या, यांना अनुलक्षून होता. त्यांनाही या त्यांच्यासंबंधींच्या माझ्या उल्लेखानें बरें वाटलेसें दिसलें.

इचलकरंजीच्या व्यापार व उद्योगधंद्याचे वाढीसंबंधानें व उत्पन्नामध्यें घट वारंवार होत असल्यानें लोकहिताचे कामीं मला पैसा कमी पडत असलेला पाहून त्यांनीं असे उद्गार काढले कीं कोल्हापूर दरबारानें आपले हिताचे दृष्टीनें तरी इचलकरंजीला करवाढ करूं द्यावी. करवाढ झाली असतां इचलकरंजीची जी व्यापारी भरभराट होईल तिचा कांहीं ओघ कोल्हापूर दरबारचे मुलुखाकडे खास वाहूं लागेल.

इचलकरंजीचा भव्य वाडा व तशाच इतर इमारती त्यांनीं एकवार पाहिल्यावर मी त्यांना म्हटलें कीं इंग्लंड व युरोपांतील सरदार व धनिक लोकांनीं आपल्या ईस्टेटी युनिव्हर्सिट्या वगैरेंना दिल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. तसें जर मला करतां आलें असतें तर येथें महाराष्ट्र युनिव्हर्सि-टीला इमारतीच्या सोई व प्राथमिक खर्चाकरितां थोडे फार द्रव्य अशी उभारणी होऊं शकली असती व युनिव्हर्सिटीचें कार्य सुकर झालें असतें. हें ऐकून डॉक्टर म्हणाले, "येथेंहि आमच्या देशाचें भाग्य आडें येतें!"

त्यांची प्रकृति दम्याचे विकारानें बरी नसे. तथापि दोन वेळां ते माझे दर्शनास शिफारशींची परवानगी मागून येत असत. आपल्यांना हे निभावतें कसें असें मी त्यांना विचारलें. तेव्हां ते म्हणाले, "प्रकृति बरी असली म्हणजे मोकळी हवा, थोडे श्रम, मनाला पोषक वाङ्मय, देशांतील लोकांचा समागम व देशांतील ज्ञानार्जन इत्यादि सर्व या गोष्टी साधतात; व मनाला आनंद होतो. परंतु मुख्य [illegible] स्नेहीसोबती यांचाही सहवासामुळें शिकारीची करमणूक घडे. दुसरीकडे मला तसा त्रास मिळत नाहीं म्हणूनही येथें येण्यांत मला आनंद वाटतो."

कोल्हापुरास मी गेलों कीं बहुतेक कांहीं तरी निमित्तानें ते मला भेटत असत. कॉलेज, क्रीडांगण, लॅबोरेटरी यांमध्यें कांहीं कमी नाहींतर झाले असेल ते आग्रहानें दाखवीत. मी 'राजारामियन' म्हणून ते अभिमान बाळगीत. आर्यसमाजाचे बहुविध कार्याला मदतीचीही ते मजपासून अपेक्षा करीत. पण जेव्हां मी खरोखरी पैशाचे अडचणींत आहे असे दिसत असे तेव्हां जोराची मागणी झाली तर मी नाहीं म्हणणार नाहीं हे माहींत असूनही भीड घालीत नसत. घर राखून ठेवलेले असावे अशी त्यांची वृत्ति असे.

आर्यसमाजाचें एक कार्य मुसलमानांकडून जेथें जेथें हिंदूंवर आक्रमण होत असेल तेथें तें थांबविणें व जे बाटलेले असतील त्यांना पुन्हां जातींत घेणें हें आहे. या कार्याबद्दल मला ते कधीं कधीं हकीकत सांगत. अनन्यगतिक होऊन ज्या बायाबापड्या बाटल्या असतील त्यांना शुद्ध करून जमल्यास त्यांचें लग्न जमवून देणें, अगर एखाद्या धंद्याचें शिक्षण देऊन त्यांचेमध्यें सन्मार्गानें योगक्षेम चालविणेची पात्रता उत्पन्न करून देणें अशा प्रकारें हें कार्य चालतें. ते म्हणत कीं, "हिंदूंच्या मुली व बायका पळविल्या जातात येवढेंच नव्हे तर मुसलमान नायकिणी व तत्सम स्त्रिया या आपले प्रियकरांना भीड घालून मुसलमान होणेंबाबत गुरळ घालतात." निरनिराळ्या ८१० प्रकारांनीं मुसलमानांची प्रजासंख्या कशी वाढेल यासंबंधीचे उपाय योजनेबाबत त्यांचें एक गुप्त सर्क्युलर डॉक्टरांचे हातीं आलें असल्याचें त्यांनीं मला सांगितलें होतें.

. ज्यांना बहुविध विषयांची सांगोपांग माहिती आहे अशा ज्या विद्वान व बहुश्रुत व्यक्तींचा थोडा वेळ तरी सहवास मधुनमधुन घडावा असे मला मनापासून वाटते अशा व्यक्तींपैकीं कोल्हापुरांत डॉ. बाळकृष्ण हे एक होते.



# पंडित बाळकृष्ण

लेखक —श्री. भास्करराव जाधव, एम. ए., एल्एल्. बी. मुंबई.

डॉ० बाळकृष्ण हे पंजाबचे राहणारे. लाहोर युनिव्हर्सिटीत यांनी उत्तम विद्यार्थी म्हणून नांव कमावलें. त्यांची माहिती मुंबईकडे मुळींच नव्हती. पण मुंबई युनिव्हर्सिटीत एका प्रख्यात कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून चमकण्याचा मोका त्याना मिळाला व आपल्या विद्वत्तेनें, सौजन्यानें व मनमिळाऊ स्वभावानें त्यांनीं आपली कारकीर्द यशस्वी केली.

सन १८९४ सालीं श्रीशाहू छत्रपति महाराज यांनीं राज्याची सूत्रें आपल्या हातीं घेतलीं व आपल्या प्रजेची स्थिती अवलोकन करून शेतकरी वगैरे विविंत मागासलेल्या वर्गांत शिक्षणाचा प्रसार झाल्याशिवाय त्यांची सुधारणा होणें शक्य नाहीं असें त्यांचे नजरेस आलें. प्रथमतः त्यांनीं मागासलेल्या समाजांतीलच लोकांचे पुढारी निर्माण करण्याकरितां एक विद्यार्थी वसतिगृह काढून त्यात सर्व जातींच्या विद्यार्थ्यांची सोय केली व सर्व मागासलेल्या वर्गांतील विद्यार्थ्यांत एक प्रकारचें चैतन्य उत्पन्न केलें.

कोल्हापूर येथील राजाराम कॉलेज सुरुवातीपासूनच पूर्ण नव्हतें. पहिल्या दोन वर्षांचेच वर्ग तेथें असत. पुढील अभ्यासासाठीं मुलांस मुंबई किंवा पुणें येथील कॉलेजांत जावें लागे.

या कॉलेजचा सर्व खर्च कोल्हापुरच्या तिजोरीवरच पडत असे व तें कॉलेज पूर्ण करणें म्हणजे जास्त खर्चाचा बोजा अंगावर घेणें होतें. पण युनिव्हर्सिटीनें 'हें कॉलेज पूर्ण करावें किंवा तें बंद करावें' असा हुकूम दरबारला दिला. त्याप्रमाणें तें पूर्ण करावें असा श्री शाहू छत्रपतींनीं निश्चय केला. कॉलेजच्या प्रिन्सिपॉलची जागा प्रथमपासूनच बरेच वर्षे युरोपियनांकडे होती. महाराजांना मुख्यतः विद्वत्तेकरितां ५।१० वर्षे

युरोपियन प्रिन्सिपॉल होते; पण हा प्रयोग दरबार व विद्यार्थी यांच्या दृष्टीनें फारसा यशस्वी झाला नव्हता, म्हणून कॉलेजांतील प्रोफेसरांसच प्रिन्सिपॉल करण्याचा प्रयोग करून पाहिला. पण खर्चाचें व उत्पन्नाचें अंतर कमी होईना व अनेक प्रकारें त्रास होऊ लागला. तेव्हां शिक्षणाचें प्रेम आहे व कमी खर्चांत उच्च शिक्षण देण्याची परंपरा आहे अशा परप्रांतीय संस्थेच्या ताब्यांत कॉलेज द्यावें असा विचार महाराजांनीं ठरविला.

श्री शिवछत्रपतींचें घराणें क्षत्रिय नाहीं म्हणून राजवाड्यांतील धर्मकृत्यें वेद मंत्रानें न होतां पुराणोक्तच झालीं पाहिजेत असा वाद सुरू झाल्यापासून कोल्हापूर येथील मराठा समाजांत एक प्रकारचें चैतन्य उत्पन्न झालें. त्या कामीं कै. राजारामशास्त्री भागवत वगैरे विद्वान ब्राह्मणांनीं व आर्यसमाजाचे प्रचारक स्वामी परमानंद वगैरेंनीं चांगलेंच साहाय्य केलें; व तेव्हांपासून आर्यसमाजाविषयीं आदरयुक्त आस्था कोल्हापुरांत उत्पन्न झाली. पुढें अस्पृश्य मानलेल्या जातींचा उद्धार करण्यासाठीं त्यांच्यांत शिक्षणप्रसाराचें काम सुरू करण्यांत आलें व आर्यसमाज गुरुकुल स्थापण्यांत येऊन त्यांत इतरांच्या बरोबर अस्पृश्यांनाही प्रवेश मिळाला. त्यांतील मुलांना धर्मशिक्षण देण्याचें काम आर्यसमाजाच्या स्वामींनीं हातीं घेतलें, व महार, मांग जातीच्या मुलांस त्यांनीं कांहीं वेदमंत्र पढविले. या मंडळींचें एक वार्षिक अधिवेशन भरविण्यांत आलें. तेव्हां सुरवातीसच या मुलांनीं वेदाच्या ऋचा सुस्वर म्हणण्यास सुरवात केल्यावर सर्व मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें; व वेदोक्ताच्या पोरकट लढ्याला हें चांगलें झणझणीत उत्तर मिळालें असें वाटलें. या आर्यसमाजाच्या कामाकडे श्री शाहू छत्रपतींचें पूर्वीपासून लक्ष्य होतें व त्यांचेकडून त्याला उत्तेजनही मिळत असे. मुंबई येथील आर्यसमाजाच्या कामाकडे त्यांचें लक्ष्य प्रथम वेधलें, व त्या समाजाच्या

नवसारी येथें भरलेल्या अधिवेशनास श्री शाहु छत्रपती अध्यक्षस्थानी विराजमान झाले होते. पण एकंदरीत मुंबई आर्यसमाजाच्या कामाविषयी त्यांना फारसा आदर वाटला नाहीं. म्हणून श्री शाहु छत्रपतींनीं इतर प्रांतांतील आर्यसमाजाच्या कामाची पाहणी केली. त्यांत त्यांना पंजाब प्रांतीय आर्यसमाजांत विशेष दिसलें. कारण, पंजाबप्रांत आर्यसमाजानें दयानंद अँग्लो वैदिक कॉलेजसारखें प्रचंड कॉलेज मोठ्या धडाडीनें चालविलें होतें. गुरुकुल कांगडीसारखी अभिनव संस्था मोठ्या उत्साहानें भरभराटीस आणली होती. पण पंजाबप्रांत आर्यसमाजानें बाहेरची जबाबदारी पत्करण्यास यावेळीं नाखुषी दर्शवून संयुक्तप्रांत आर्यसमाजाचें नांव सुचविलें. या संयुक्तप्रांत आर्यसमाजानें देखील कॉलेज, शेंकडों हायस्कुलें व हजारों शाळा उघडून लाखों विद्यार्थ्यांस विद्यादान करण्याचें काम अव्याहत सुरू ठेविलें होतें. विद्याप्रसाराची आस्था, व त्या कामीं येणाऱ्या अडचणींशीं टक्कर देण्याची त्यांची हिंमत वगैरे गोष्टी लक्ष्यांत घेऊनच महाराजांनी राजाराम कॉलेज संयुक्तप्रांत आर्यसमाजाच्या स्वाधीन देण्याचें ठरविलें. आर्यसमाजानें कॉलेज हातांत घेतल्यानंतर राजाराम कॉलेज पूर्ण करण्याचा निश्चय केला.

पण ही गोष्ट विद्यादानाचें क्षेत्र पूर्वीच आक्रमून बसलेल्या पुण्यास नापसंत होती व कॉलेज पूर्ण करण्याची परवानगी युनिव्हर्सिटीकडून मिळूं नये अशी खटपट सुरू झाली. याचवेळीं सांगली जवळ येऊन एज्युकेशन सोसायटीनें आपलें कॉलेज सुरू केलें होतें. आणि दोन पूर्ण कॉलेजला पुरतील इतके विद्यार्थी या भागांत नसल्यानें कोल्हापुरचें कॉलेज पूर्ण करण्याची आवश्यकता नाहीं असा मुद्दा पुढें आला. पण या सर्व गोष्टींना तोंड देऊन कॉलेज पूर्ण करण्याची परवानगी मिळविण्यांत आली.

१९२२ सालीं संयुक्तप्रांत आर्यसमाजानें पंडित बाळकृष्ण यांची निवड प्रिन्सिपॉलच्या जागेसाठीं केली; व त्यांनीं आपल्या कामाचा चार्जही घेतला. पंडित बाळकृष्ण यांची काठी उंच पण दम्याच्या विकारामुळें ते कृश होते व त्यांचे अंगीं ताकदही भरपूर नव्हती; पण उत्साह दांडगा, विद्याव्यासंग मोठा, शिकविण्याची हातोटी उत्तम. विशेषतः हाताखालच्या लोकांवर छाप ठेऊन त्यांचेकडून काम करून घेण्याची त्यांची कुशलता वाखाणण्यासारखी होती.

१९२० च्या पूर्वी राजाराम कॉलेजांत दोनच वर्ग होते, तरी तेथील शिक्षणाची कीर्ति प्रथमपासूनच होती व त्या कॉलेजांत शिक्षण घेतलेल्यांत फार मोठीं नांवें होतीं. पंडित बाळकृष्ण यांनीं ती कीर्ति कायम ठेऊन वाढविली. कॉलेज पूर्ण झाल्यावर तर कोल्हापूर कॉलेज निशेष भरभराटीस आणण्याचें श्रेय सर्वस्वीं पंडितजीकडे जातें. डॉ० बाळकृष्ण यांनीं या कामीं फार झटून कोल्हापूर कॉलेजची कीर्ति वाढविली व त्यामुळें सांगली कॉलेज भरपूर विद्यार्थ्यांच्या अभावी कैक वर्षे नुकसानींत चालवावें लागलें. ही पुण्याची चुरस राजाराम कॉलेजला पुष्कळ वर्षे नडत होती. पण पंडित बाळकृष्ण यांनीं या सर्व अडचणींना तोंड देऊन आपल्या कॉलेजांत सायन्सच्या उच्च शिक्षणाची सोय केली व इतरही बाबतींत कॉलेजची बढती केली आहे.

विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति॥

यांत म्हटल्याप्रमाणें पंडितजी हे उत्तम जनांपैकीं एक होते. यांतच त्यांचें थोरपण स्पष्ट होत आहे.



# Dr. Balkrishna, and His late Highness

By:—Rao Bah. D. M. BHONSALE,
Ex. Dy. Prime Minister, Kolhapur.

I feel very glad to write a few words regarding the work of the late Dr. Balkrishna.

I had the pleasure of knowing Dr. Balkrishna very intimately ever since he took over the charge of the Rajaram College as Principal. As chance would have it, correspondence regarding the College was at that time submitted to His Highness through the office of the Financial Secretary, the office that I then held, and consequently Dr. Balkrishna and I came in contact with each other very often.

Dr. Balkrishna always came with some request on behalf of the Rajaram College. It was either to increase the number of freeships, to sanction the starting of a new subject in the College, for a play-ground for the College or for such other amenity as would enhance the prestige of the College. I know of many a time when His late beloved Highness Shri Rajaram Chhatrapati Maharaj under whom I worked, put off Dr. Balkrishna with some reason or the other. His Highness had the entire State to look to while the Doctor always hammered at the wants of the College. His Highness and I were glad when we had disposed of Dr. Balkrishna but we knew that that was not the end of things and that before long we would have to hear of the Doctor again and sure enough this was the case. He came again and again and ultimately His Highness would be pleased to meet the Doctor's request to some extent at least. How often

I have heard Shri Rajaram Maharaj say that he was sanctioning money, because he was sure that under Doctor Balkrishna's guidance the best possible use would be made of it.

It was during Dr. Balkrishna's Principalship too that the Rajaram College permanently became a first grade College and also had the Science Department attached to it. All this was possible because Dr. Balkrishna gave his heart and soul to the Institution and found in His Highness Shri Rajaram Maharaj a Master who supported and generously financed all schemes for the betterment of the College.

I think I am right when I say that Dr. Balkrishna was one of the chief sponsors of the move to have the Law College started in Kolhapur. Had it not been for the personal visits His Highness paid to numerous Members of the Senate this proposal could never have been passed I remember a very prominent member of the Senate say to me: "We were never aware of the immense personal interest that His Highness takes in education but now you may be sure that stubborn members of the Senate like me will have reason not only to support the proposal but to see that it is passed"

Dr. Balkrishna has done a great service to the Rajaram College and to the cause of education in Kolhapur in general. This service needs to be commemorated and I am sure every body would gladly support a movement that is started for the bringing into being of a suitable memorial to the memory of the late lamented Principal Dr. Balkrishna.

—o—

# My Reminiscences of Dr. Balkrishna

By—Prof N S Takakhav, M A, I E S (retired)
H. P. T. College, Nasik

With a heavy heart I take pen in hand to put together a few thoughts and memories about the late Dr Balkrishna. It has not been my good fortune to have known many great men, but among the few great men I have really known, Dr. Balkrishna might easily challenge a prominent place Nothing will ever obliterate from my mind the impression I have formed of him as a teacher, as a scholar and as a man.

My first meeting with him took place at the residence of Prof. B K Thakore, I E S (of the Deccan College) at Poona Dr. Balkrishna, the Rev J Kellock of the Wilson College, and myself were guests of Prof Thakore All four of us were examiners in *History and Economics* at the B A. examination of the Bombay University, I believe in March-April 1923 We met at Prof Thakore's to draft our question papers. I remember the *puries* and *dudh-pak* which we then consumed and the Rev J Kellock's cross-legged appreciation of it On our return homewards Dr Balkrishna made me break my journey at Kolhapur and inflict a lecture upon his pupils. That was the first time I enjoyed his hospitality

He then lived at a place a bit isolated from the city and, if I remember right, it was called *Shetra Bagh* In the following June, my family and I returning after the summer vacation from Bombay to Dharwar again broke our journey at Kolhapur Dr. Balkrishna was then a widower But the doctor's mother gave a cordial welcome to my wife. The

house at Sheri Bagh then seemed to be honey-combed with the family nests of other Lecturers and Professors, besides that of Dr. Balkrishna. They all seemed to be living together in great amity and all seemed to be so loyal to Dr. Balkrishna, their chief ! Most of these Professors, however, later on left Kolhapur and found situations nearer home in North India. An atmosphere of mutual trust and loyal service distinguished that early band of Rajaram College Professors But this trust and service had their origin in Dr. Balkrishna's own example and his sincere helpfulness to all his colleagues in their difficulties.

After that, it will be difficult to disentangle the threads of the different occasions that brought Dr. Balkrishra and me together. Suffice it to say that on diverse occasions, Dr. Balkrishna had a call to address the students of the Karnatak College, Dharwar, where he used to be my guest. Some of these lectures were delivered to the general public of Dharwar. On some of these occasions I had the honour to preside One I remember, which was largely attended and took place in Mr Gopalgiri's Theatre at Dharwar and was constantly punctuated with the applause of the large audience assembled there One of my then collegues, Prof. Karamchand, presided on the occasion Dr Balkrishna spoke on the Ideals of Life in Vedic India and pricked the bubbles of many a misconception we have entertained all these centuries about life and ideals in Vedic India. His last general lecture in Dharwar was delivered at the Municipal Hall. I had the honour to preside Dr. Balkrishna spoke on - of American Life. That was after his tour of America. The audience comprised nearly a

thousand But so great was the silence amidst which the lecture was listened to that it would be no exaggeration to say that even the dropping of a pin to the ground could have become audible to that vast audience

It will be difficult to enumerate the different occasions on which Dr Balkrishna was invited to address audiences at Dharwar One occasion I distinctly remember when after a course of lectures at Dharwar, he was called upon to address late on a chilly monsoon night an audience at Hubli. It was during a Ganapati festival. Dr Balkrishna was my guest and I had of course to accompany him to that distance of twelve miles at night, when neither he nor I possessed a motor car What was a worse problem with me was that I had to officiate as a dummy chairman on the occasion But the lecture of the learned Doctor was as great a success as my performance as a dummy If I remember right, Dr Balkrishna was invited the next morning to pay a further call to Hubli and address other eager audiences, though I could then excuse myself on the ground of college duties.

It was of course always a pleasure to preside over a lecture of Dr. Balkrishna, which was so often my good fortune to do at Dharwar I excelled in playing the part of a dummy chairman, but I had cultivated and acquired the art of making a good introductory speech and getting audience and speaker acquainted with each other on terms of extreme intimacy I did that in a good humoured way, and wherever Dr Balkrishna was the speaker, he always justified my prophecy about a good intellectual treat awaiting the audience which in this case was generally so good, that

लेखकः—रा. कृ. ना. पंडितराव, बी. ए., एलएल्. बी.,
माजी सरन्यायाधीश, कोल्हापूर.

डॉ. बाळकृष्णांचा व माझा विशेष परिचय नसला तरी त्यांस भेटण्याचे व त्यांच्याबरोबर भाषण करण्याचे वर्षांतून अनेक प्रसंग येत. त्यांचें नांव निघाल्याबरोबर त्यांची तेजस्वी, उंच शरीरयष्टि व त्यांची गंभीर सहास्य मुद्रा मनश्चक्षूसमोर उभी राहून त्यांचें मधुर व विनोदी भाषण यांचें स्मरण होतें.

या संस्थानांतील शैक्षणिक प्रगतीचें बरेचसें श्रेय निर्विवाद त्यांस आहे. येथें 'लॉ कॉलेज' स्थापन करण्याची कल्पना मूळची त्यांचीच. त्या संबंधानें आरंभीं विचार करण्यासाठीं कै. दादासाहेब करंदीकर वगैरे दोन तीन बाहेरची मंडळी व येथील मी व आणखी एक दोन गृहस्थ असे त्यांच्या घरीं अनेकदां जमत होतों.

लॉ कॉलेजमध्यें अध्यापनाच्या कामीं त्यांचा थोडा संबंध असावा असा आरंभीं विचार होता. माझ्याकडेही हिंदु लॉ हा विषय शिकविण्याचें काम सोंपविलें होतें. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मला तें सोडावें लागलें व पुढें थोडी निराळींच कांहीं घटना झाल्यानें डॉ. बाळकृष्णांचाही त्या संस्थेशीं साक्षात् कांहीं संबंध राहिला नाहीं. तथापि येथें लॉ कॉलेज काढण्याची कल्पना मूळची त्यांचीच असून त्यांनीं त्यास मूर्त स्वरूप देण्याबद्दल बरीच तसदी घेतली, त्याबद्दल त्यांस धन्यवाद दिले पाहिजेत.

लेखक:—ॲडव्होकेट एस्. जी. दाभोळकर, बी. ए. एल्एल्. बी.,
प्राध्यापक, साइक्स लॉ कॉलेज, कोल्हापूर.

कोल्हापुरांतील इलाखा पंचायतीचे स्थापनेनंतर कै. डॉ. बाळकृष्ण हे व मी दोघेही इलाख्यांतील प्राथमिक शिक्षणावर नियंत्रण करणाऱ्या शिक्षणमंडळावर होतों. एका सभेंत प्राथमिक शाळांतील शिक्षक नेमतांना त्यांची लायकी कशी ठरवावी या संबंधीं नियम करण्याचा प्रश्न आला. एक पक्ष म्हणे कीं जातवारीचें तत्त्व अमलांत आणावें. दुसरा पक्ष केवळ लायकीवर दृष्टि ठेवून शिक्षकाची निवड करावी असा आग्रह धरणारा होता. डॉक्टरसाहेबांनी या दोन्ही पक्षांचें म्हणणें विचारांत घेऊन लायकीवरून शिक्षकाची निवड करावी असें मत व्यक्त केलें व विरोधी पक्षानें जेव्हां यामुळें मागासलेल्या वर्गाचे लोक शिक्षकांची नोकरी मिळवूं शकणार नाहींत असा आरोप घेतला तेव्हां मुलकी परीक्षेचे पूर्वीचे रिझल्टस् मागवून या आक्षेपकांना दाखवून दिलें कीं शेंकडा पन्नासपेक्षां अधिक मार्क मिळालेल्यांची सरासरी पाहतां एकाच वर्गाचे लोक लायक ठरतील हें त्यांचें म्हणणें चुकीचें आहे.

कोल्हापुरांतील एका परिषदेला अध्यक्ष म्हणून एका बाहेरच्या पुढाऱ्याची निवड झाली होती. या पुढाऱ्यावर नसते वेडे आरोप करून ही कोल्हापुरास भरणारी परिषद यशस्वी होऊं नये असा प्रचार कांहीं मंडळींनी फार जोरानें सुरू केला. कार्यकर्ते गडबडले व परिषद रद्द करण्याच्या विचारास लागले. डॉक्टरसाहेबांना ही हकिकत समजल्या-बरोबर सर्व कार्यकर्त्यांना बोलावून त्यांनी धीर दिला व स्वतः जातीनें खपून सदरची परिषद यशस्वी रीतीनें पार पाडण्यास मदत केली.

---

लेखक—रा. कृ. ना. पंडितराव, बी. ए, एल्‌एल्. बी.,
माजी सरन्यायाधीश, कोल्हापूर.

डॉ. बाळकृष्णाचा व माझा विशेष परिचय नसला तरी त्यांस भेटण्याचे व व्याख्यानरोनर भाषण करण्याचे वर्षांतून अनेक प्रसंग येत. त्यांचें नाव निघाल्याबरोबर त्यांची तेजस्वी, उंच शरीरयष्टि व त्यांची गंभीर सहास्य मुद्रा मनश्चक्षुसमोर उभी राहून त्यांचें मधुर व विनोदी भाषण यांचें स्मरण होतें.

या संस्थानांतील शैक्षणिक प्रगतीचें बरेचसें श्रेय निर्विवाद त्यांस आहे येथें 'लॉ कॉलेज' स्थापन करण्याची कल्पना मूळची त्यांचीच. त्या संबधानें आरंभीं विचार करण्यासाठीं कै दादासाहेब करंदीकर वगैरे दोन तीन बाहेरची मंडळी व येथील मी व आणखी एक दोन गृहस्थ असे त्यांच्या घरीं अनेकदा जमत होतों.

लॉ कॉलेजमध्यें अध्यापनाच्या कामीं त्यांचा थोडा संबंध असावा असा आरंभीं विचार होता माझ्याकडेही हिंदु लॉ हा विषय शिकविण्याचें काम सोंपविलें होतें. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मला तें सोडावें लागलें व पुढें थोडी निराळींच कांहीं घटना झाल्यानें डॉ. बाळकृष्णाचाही त्या संस्थेशीं साक्षात् कांहीं संबंध राहिला नाहीं. तथापि येथें लॉ कॉलेज काढण्याची कल्पना मूळची त्यांचीच असून त्यांनीं त्यास मूर्त स्वरूप देण्याबद्दल बरीच तसदी घेतली, त्याबद्दल त्यांस धन्यवाद दिले पाहिजेत



लेखक —ॲडव्होकेट एस्. जी. दाभोळकर, बी. ए. एल्एल् बी,
प्राध्यापक, साइन्स लॉ कॉलेज, कोल्हापूर.

कोल्हापुरातील इलाखा पंचायतीचे स्थापनेनंतर कै. डॉ बाळकृष्ण हे व मी दोघेही इलाख्यातील प्राथमिक शिक्षणावर नियंत्रण करणाऱ्या शिक्षणमंडळावर होतों. एका सभेंत प्राथमिक शाळांतील शिक्षक नेमताना त्यांची लायकी कशी ठरवावी या संबंधीं नियम करण्याचा प्रश्न आला. एक पक्ष म्हणे कीं जातवारीचें तत्व अमलांत आणावें. दुसरा पक्ष केवळ लायकीवर दृष्टी ठेवून शिक्षकाची निवड करावी असा आग्रह धरणारा होता. डॉक्टरसाहेबांनीं या दोन्ही पक्षांचें म्हणणें विचारात घेऊन लायकीनुरून शिक्षकाची निवड करावी असें मत व्यक्त केलें व विरोधी पक्षानें जेव्हा यामुळें मागासलेल्या वर्गाचे लोक शिक्षकांची नोकरी मिळवूं शकणार नाहींत असा आरोप घेतला तेव्हा मुल्की परीक्षेचे पूर्वीचे रिझल्टस् मागवून या आक्षेपकांना दाखवून दिलें कीं शेंकडा पन्नासपेक्षा अधिक मार्क मिळालेल्याची सरासरी पाहतां एकाच वर्गाचे लोक लायक ठरतील हें त्याचें म्हणणें चुकीचें आहे.

कोल्हापुरांतील एका परिषदेला अध्यक्ष म्हणून एका व देश्या पुढाऱ्याची निवड झाली होती. या पुढाऱ्यावर नसते व खोटे आरोप करून ही कोल्हापुरास भरणारी परिषद भरवली होऊं नये असा प्रकार कांहीं मंडळींनी फार जोरानें सुरू केला. कार्यकर्ते गडबडले व परिषद रहित करण्याच्या विचारास लागले. डॉक्टरसाहेबांना ही हकिकत समजल्याबरोबर सर्व कार्यकर्त्यांना बोलावून त्यांनी धीर दिला व स्वतः जातीनें खपून सदरची परिषद भरवली यशस्वी रीतीनें पार पाडण्यास मदत केली.

---

लेखक—श्री. का. र. वैशंपायन, साहित्यभूषण (काशी)
संस्कृत शिक्षक, मालेद.

पूज्य स्वामी श्रद्धानंदांचा गर्हणीय खून झाला त्या वर्षीची गोष्ट. स्वामीजींच्या खुनानंतर सुमारें एक महिन्यानें डॉ० बाळकृष्ण हे येवले (नाशिक) येथें आले होते. येवल्याला आर्यसमाजाच्या मार्फतीचें, हमरस्त्यावर सुंदर व प्रशस्त असें एक आर्यसमाजमंदिर आहे. डॉ० बाळकृष्ण हे याच ठिकाणीं उतरले होते याच आर्यसमाज मंदिरासमोर जाहीर सभा नेहमीं भरतात. डॉ० बाळकृष्ण येण्यापूर्वी म्हणजे श्रद्धानंद वधदिनाचे दुसरे दिवशीं आर्यसमाज मंदिरासमोर एक प्रचंड सभा भरली होती. २।३ हजार लोक सभेस उपस्थित होते मुसलमानही आले होते. त्या सभेचें अध्यक्षस्थान येवल्याचे श्री. बाळमुकुंद जीवनशेठ यांनीं स्वीकारलें होतें. त्या सभेंत येवल्याच्या राष्ट्रीय शाळेंतील शिक्षक 'अण्णा' यांचें अत्यंत आवेशपूर्ण व विचारपरिप्लुत असें भाषण झालें त्याचा परिणाम शहीद अब्दुल रशीदच्या चाहत्यांवर होऊन, त्यांतील कांहीं लुच्च्या लोकांनीं सदर शिक्षकास धमक्या देऊन जीवहानी करण्याचा धाक दाखविला. तो शिक्षक मुळींच डरला नाहीं मात्र वातावरण २।३ महिने अत्यंत गरम होतें.

अशा स्थितींत डॉ. बाळकृष्णाचें टिळक मैदानावर (आर्य समाज मंदिरासमोर) व्याख्यान ठरविलें व तशी दवंडीही पिटली रात्रीं ९ ची वेळ जाहीर झाली होती हळुहळु लोक जमूं लागले. गांवांतील कांहीं प्रतिष्ठित लोक डॉक्टर बाळकृष्ण यांजकडे गेले व "आपण आज कृपा करून टिळक मैदानावर भाषण करूं नये. श्रद्धानंदांचे वधदिनाचे सभेमुळें मुसलमान समाज फार क्षुब्ध झाला आहे" असें सांगितलें. डॉ. साहेबांनीं त्यांचें भाषण ऐकून त्यास सांगितलें कीं "जाहीर केलेल्या जागीं मी

भाषण करणार. त्याला कांहीं उपाय नाहीं. मी आर्यसमाजी आहे. आर्यसमाजी निर्भय असतो." नंतर सदर लेखकास ते म्हणाले "चला सभेस सुरवात करूं या." लागलीच मी डॉक्टर भट यांस अध्यक्ष निवडण्याची सूचना केली. सभा सुरू झाली. डॉक्टर भाषण करण्यास उभे राहिले. "स्वामी श्रद्धानंदांच्या खुनाचे सभेमुळे येथील वातावरण गरम आहे, तेव्हां मी येथें बोलूं नये, असें मला सांगण्यांत आलें; परंतु ज्या महात्म्यानें धर्मासाठीं प्राणही दिला; त्या श्रद्धानंदाच्याच पंथातील मला ही गोष्ट पटली नाहीं व मी आपल्यासमोर उभा आहे." इतकें बोलतात तोंच 'रशीदभाईही' जमूं लागले व पाऊसही अचानक आला. तेव्हां सभा पुन्हां समाजमंदिरांत नेऊन सुरू करावी लागली. मंदिरांत सभा भेत असतां डॉ. बाळकृष्ण म्हणाले "आर्यसमाज मंदिर सर्वांस खुलें आहे, त्यांत जातिभेद नाहीं. सर्वांनीं आत यावें." विद्वान असूनही निर्भय असणाऱ्या आर्यसमाजियांचें डॉक्टर बाळकृष्ण हे उत्कृष्ट उदाहरण होत.



लेखकः—श्री. गोविंद विनायक करंदीकर, बी. ए. (ऑनर्स),
ट्यूटर, राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

डॉ० बाळकृष्ण गेले. पण विद्यार्थ्यांच्या हृदयांतून ते कधीच गेले नाहीत. त्यांचें अमर स्मारक तेंच की जे त्यांनीं विद्यार्थ्यांच्या हृदयफलकावर प्रेमाच्या सुवर्णाक्षरांनीं आपणचें लिहून ठेविलें आहे.

डॉ० बाळकृष्णांचा पावित्र देह अनेकदां पाहूनही, त्यांचे पाय सदा धर्मापूर्वी आर्यसमाजाच्या उत्सव प्रसंगीं झालेलें व्याख्यान ऐकेपर्यंत, मला त्यांचें खरें दर्शन झालें नव्हतें. त्यांचें शरीर दिसत असे पण हृदय दिसलें नव्हतें. तें आर्यसमाजाच्या उत्सवांतील व्याख्यान व त्यांचा

माझ्या मनावर झालेला परिणाम वर्णन करणें अशक्य आहे. त्याच्या भाषणातील प्रत्येक शब्द म्हणजे जिवंत निखारा होता; त्याचें प्रत्येक वाक्य म्हणजे एकेक ज्योत होती, आणि सर्व व्याख्यान म्हणजे एक यज्ञ होता. जितकें पवित्र, तितकेंच ओजस्वी. आपल्या अमोघ वक्तृत्वानें जाज्वल्य ध्येयवाद निर्माण करणारें तें कोल्हापुरातील पहिलें, कदाचित शेवटचेंच, व्याख्यान असेल. त्याच्या त्या वक्तृत्वाच्या यज्ञात पवित्र होऊन आणि ध्येय व आशा हृदयात पुरेपूर साठवून मी भारावलेल्या अंत:करणानें घरीं परतलों. माझ्या जीवनात तो एक प्रकारचा पुनर्जन्मच होता.

डॉ० बाळकृष्णाच्या हाडीमासीं खिळलेला दमा व खोकला त्याच्या महाविद्यालयीन व्याख्यानाच्या ऐन रंगात बेरंग करीत असे. एकादा विषय शिकविण्याच्या ऐन रंगात ते यावेत व खोकल्याचा मध्येंच झटका यावा; मग त्याच्या इच्छेची त्याच्या शरीराशीं चालणारी झटपट दु:खदायक तर खरीच, पण बघण्यासारखी असे. पण दमा कमी असला म्हणजे त्याचीं व्याख्यानें जिवंत वक्तृत्व व देशाभिमान यानें भरलेलीं असावयाचीं. शिवाय त्याचे विषयही त्याच्या स्वभावाला पोषकच होते. आम्हाला 'राज्यव्यवस्था' डॉ. बाळकृष्ण शिकवीत. एकदा स्वतंत्र मतदार संघामुळें राष्ट्रावर झालेले व होणारे अनिष्ट परिणाम त्यानीं इतक्या कुशलतेनें व सहृदयतेनें रंगविले कीं आमचीं हृदयें भरून आलीं. राष्ट्रीयता व स्वातंत्र्य यांना पोषक अशा वीरोचित भावना विद्यार्थ्यांच्या हृदयांत निर्माण करणें व जोपासणें म्हणजे जर देशभक्ति असेल तर डॉ० बाळकृष्ण हे शेवटपर्यंत देशभक्त असून त्याचा वर्ग हें राष्ट्रीय विद्यापीठ होतें

वर्गामधील त्याची शिकवण जितकी उच्च तितकीच सूक्ष्मही होती. त्याच्या व्याख्यानात शिस्तीवरील भारूड उपदेश कधी असला तरी विनोदी सूचना भरपूर असत. एकदा उत्तरपत्रिका परत देताना त्यानीं

'तुम्ही पाहिल्यात कां?' म्हणून माझ्या एका मित्राला विचारलें. त्यानें 'होय' म्हणून उत्तर दिलें. त्यांनीं पुन्हां विचारलें; त्यानें पुन्हां तेंच उत्तर दिलें. असें पांच सहा वेळां सतत विचारल्यानंतर शेवटीं त्यानें 'होय सर' म्हटलें व प्रश्नांची सरबत्ती थांबली एकदाची. आणि वर्गांत हंशा आणि स्टँपिंग सुरूं झालें. एकदां विषय शिकवतांना त्यांनीं कादंबरीचा निसटता उल्लेख केला. एका विद्यार्थ्यानें मध्येंच उभे राहून विचारलें, 'तुम्ही स्वतः कादंबऱ्या किती वाचल्या?' डॉ० बाळकृष्णांनीं उत्तर दिलें, 'मी सबंध आयुष्यांत तीन कादंबऱ्या वाचल्या; आणि त्यापैकीं दोन माझ्या परिक्षेला लावलेलीं क्रमिक पुस्तकें होतीं. मुलांच्या हसण्याला आणि स्टँपिंगला किती ऊत आला असेल हें सांगायला नकोच.

मी कोल्हापुरला आल्यानंतर मला सायकलचा अपघात झाला. हाताचीं हाडें मोडलीं व शस्त्रक्रिया करण्याची वेळ आली. मिरजेला माझी कोणाशी ओळख नव्हती व जरूर ते पैसेही नव्हते. अशा स्थितींत मार्ग कोणचाच दिसत नव्हता. शेवटीं रात्रीं ८॥ नंतर माझ्या दोन मित्रांना डॉ० बाळकृष्णांकडे जाऊन त्यांना सर्व हकिगत कळवळ्यास सांगितले. हे त्यांच्या आयुष्याचे शेवटचे दिवस होते आणि दमा भयंकर जोरांत होता. ते बिछान्यावरून हालत नसत व कोणाचीही भेट घेण्याची शक्ति त्यांच्या अंगांत नव्हती. पण आपला एक विद्यार्थी आजारी आहे हें कळल्याबरोबर त्यांनीं माझ्या मित्रांना आंत बोलाविलें. विचारपूस केली. आणि मिरज मिशनचे मुख्य डॉ० गोरेन यांना पत्र दिलें. त्या पत्रामुळें माझी पुढील व्यवस्था इतकी त्वरित व काळजीनें झाली कीं त्या मदतीशिवाय माझा हात मला परत मिळाला नसता. हात दाखवणारे लोक पुष्कळ भेटतात; पण हात देणारे फार थोडेच!

—o—

लेखक —श्री य. रा. गुप्ते, बी.ए , एम् आर् ए. एस्., पुणें.

डॉ. बाळकृष्ण यास इतिहासाचा — विशेषेंकरून छत्रपति शिवाजी महाराजांच्या विषयींच्या इतिहाससंशोधनाचा नाद असे. पुराणवस्तुसंशोधनाचीहि त्यास गोडी होती. त्याची व माझी एकदाच प्रत्यक्ष गाठ पडली आणि ती कऱ्हाडास —कृष्णा व कोयना यांच्या प्रीतिसंगमीं— झाली. त्यांच्या कर्णपथावर मी कऱ्हाडच्या प्राचीन अवशेषांचें व ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन करीत असल्याची वार्ता गेली होती. मी त्यावेळीं कऱ्हाडास सब्रजिस्ट्रार होतो. तेथील टिळक हायस्कुलांत त्यांचें एक व्याख्यान व्हावयाचें होतें श्रोतृसमाज हजार दीड हजार होता विशेष भरणा विद्यार्थ्यांचाच होता कारण व्याख्यान त्यांच्यासाठींच विशेषत होतें पण इतर शिष्ट मंडळींबरोबर तेथील सद्गृहस्थ रा. सा. खासनीस व मी यास निमंत्रण होतें डॉक्टरसाहेबांची व माझी त्या हायस्कुलच्या मुख्याध्यापकांनीं ते येतांच ओळख करून दिली त्यास मोठा आनंद झाला. एवढेंच नव्हे तर त्यांनीं आपल्या भाषणांत मोठ्या गौरवानें माझा उल्लेख केला. त्यांनीं त्या वेळीं विद्यार्थ्यांस मजप्रमाणें कऱ्हाड गांवांतील प्राचीन अवशेष शोधून काढून त्यांचें नीट संरक्षण करावें व पुढें जमेल त्यांनीं त्यांचें व कागदपत्रांचें संशोधन करून प्राचीन व अर्वाचीन इतिहासांत भर घालावी असा उपदेश केला. तसेंच सुदृढ प्रकृति ठेवून व भरपूर व्यायाम करून महाराष्ट्राचें नांव राखावें असें सांगितलें. ठोसे मारतांच पळून जाणाऱ्या विद्यार्थ्यापेक्षां ठोसे मारणाराचा प्रतिकार करून त्याची हनुवटी उडविणारेच विद्यार्थी अधिक चांगले व तेच देशाच्या उपयोगी अधिक पडतील असें त्यांनीं त्यावेळीं प्रतिपादिलें होतें.

———

# एक थोर व्यक्ति

लेखक.—श्री. सी. रा. तावडे, B. A. (Hons) (Bom), M. A. (Edn.), T. Ed. (Columbia), Dip. Ed. (Oxon), एज्युकेशनल इन्स्पेक्टर, दक्षिणभाग, धारवाड.

डॉ० बाळकृष्णांचा व माझा फार दिवसांचा परिचय. ते कालवश होऊन जरी आज एक वर्ष झालें तरी पण त्यांची ती उंच सडपातळ शरीरयष्टि, त्यांचा तो घोगरा आवाज, दिसायला गंभीर पण परिचयानें होणारा हास्यमुख चेहरा व त्याच्या भव्य शरीराला शोभून दिसणारा त्यांचा तो पंजाबी फेटा हीं सर्व आज सुद्धां डोळ्यांसमोर दिसतात. डॉ. बाळकृष्ण जरी शरीरानें भव्य दिसत होते तरी निरोगी नव्हते. त्यांना नेहमीचा दम्याचा विकार होता. ते वरचेवर आजारी पडत. बोलतांना मधुन मधुन खोकत. त्यांना आपल्या आजाराची जाणीव होती. पण त्यांनी आपला आजार आपल्या नेहमींच्या व्यवसायाच्या आड येऊं दिला नाहीं. त्यांचें सतत वाचन व संशोधन चालूं होतें. कधीं भेटले तर दुर्मुखलेले दिसत नसत. त्यांच्या संभाषणांत कळकळ व आस्था असे. त्यांच्या बोलण्यांत व वागण्यांत कृत्रिमपणा क्वचित असे. ते आणि मी मुंबई युनिव्हर्सिटीच्या सिनेटचे सभासद असतांना त्यांचा व माझा विशेष संबंध आला. मी पुन्यास ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणें या संस्थेचा प्रिन्सिपॉल असतांना मुंबई इलाख्याची इतिहास शिक्षकांची परिषद बोलाविली होती. डॉ. बाळकृष्णांना त्या परिषदेचे अध्यक्ष म्हणून बोलाविले होते. ते माझ्याचकडे पाहुणे म्हणून उतरले होते. त्यावेळीं त्यांचा माझा निकट परिचय झाला. त्यावेळीं त्यांची शिवाजी व इतिहास-वरील अतूट प्रेम दिसून आलें. ते जरी जन्मानें पंजाबी होते तरी त्यांचें महाराष्ट्रावर व महाराष्ट्राच्या इतिहासावर फार प्रेम होतें. मराठ्यांच्या

# डॉ० बाळकृष्णांच्या कांहीं स्मृती

लेखक—श्री. अ. श्री. देशपांडे, बी. ए. (ऑनर्स),
एल्एल् बी, वकील, पुणें.

सन १९२२ च्या मे महिन्यात आमच्या राजाराम कॉलेजच्या इतिहासात एक महत्वाची गोष्ट घडली. ती म्हणजे डॉ० बाळकृष्णाची कॉलेजचे प्रिन्सिपॉल म्हणून नेमणूक. मुंबई विश्वविद्यालयाकडून आमच्या कॉलेजला ऑनर्सचा अभ्यासक्रम सुरू करण्याची नुकतीच परवानगी मिळाली होती व माझी इंटरमीजिएटची परीक्षाही नुकतीच झाली होती. बी. ए करिता इतिहास व अर्थशास्त्र हा ऐच्छिक विषय घेऊन ऑनर्स घेण्याची माझी तीव्र मनीषा होती त्यावेळच्या शिरस्त्याप्रमाणे पुण्याच्या कॉलेजाकडे माझें मन धांव घेत होतें. पण डॉ. बाळकृष्णाच्या नेमणुकीनें माझा विचार पालटला. डॉक्टरांची कीर्ति त्यांचे अगोदरच कोल्हापुरास येऊन पोंचली होती डॉक्टरांच्यासारख्या निष्णात अर्थशास्त्रज्ञाच्या शिष्यांचा मान व आमच्या कॉलेजमध्यें प्रथमच सुरू होणाऱ्या ऑनर्सच्या अभ्यासक्रमाचा पहिला विद्यार्थी होण्याचा एक प्रकारचा अभिमान यानीं पुण्याच्या आकर्षक वातावरणाकडे ओढ घेऊ पहाणाऱ्या माझ्या मनोवृत्तींना बालपणापासूनच्या सुखद संवेदनांनीं भारलेल्या व भारलेल्या आमच्या राजाराम कॉलेजच्या आवाराकडे खेंचून आणलें. कॉलेज सुरू होताच ज्यूनिअर बी. ए. च्या वर्गांत इतिहास व अर्थशास्त्र या विषयांच्या ऑनर्सच्या अभ्यासक्रमाकरितां मी आपलें नांव दाखल केलें.

मी व माझे बरोबरचे इतर चार सहाध्यायी एवढाच आमचा छोटासा वर्ग. डॉ. बाळकृष्ण व प्रो. दारूवाला हे आमच्या अभ्यासक्रमाचे दोघे प्राध्यापक प्राध्यापकद्वयाचे कोल्हापुरांतील आम्हीच पहिले शिष्यगण.

तेव्हां साहजिक आम्हां गुरुशिष्यामध्यें शिष्यत्वाचें औपचारिक नातें न राहतां निकटवर्तित्वाचा जिव्हाळा व सतत साहचर्याचें सुहृदत्व निर्माण झालें. आमच्या दोन वर्षांच्या अभ्यासक्रमाच्या अवधींत तें उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेलें. तसेंच तें केवळ कॉलेजच्या शैक्षणिक अभ्यासक्रमापुरतेंच न राहतां कॉलेजचा जिमखाना, कॉलेजचीं स्नेहसंमेलनें, आर्यसमाजाचे उत्सवप्रसंग व कॉलेज बाहेरील इतर शैक्षणिक व सामाजिक व्यवसाय यातही प्रतीत होत गेलें. आम्ही पास होऊन कॉलेजचा व आमचा संबंध सुटला; परंतु डॉक्टरांचा ऋणानुबंध मात्र आमरण अव्याहत राहिला.

डॉक्टरांची पहिली स्मृति माझ्या अंतश्चक्षुपुढून आजन्म हालावयाची नाहीं. आमचें कॉलेज नुकतेंच सुरू झालें होतें. नेहमीच्या पद्धती-प्रमाणें वर्ग सुरू होण्यापूर्वी कॉलेज हॉलमध्यें सामुदायिक प्रार्थना करण्यासाठीं सर्व विद्यार्थी व अध्यापक एकत्र जमले होते. नुकतेंच अकराचे ठोके पडून गेले होते. प्रार्थनेच्या घंटेचा निनाद कॉलेजच्या प्रांगणांतून निनादून गेला होता. इतक्यात प्रिन्सिपॉलच्या ऑफिसांतून डॉक्टरांची धीर गंभीर मूर्ति बाहेर पडली. निळ्या मूरमरीत ती उंची पुरी पण किंचित कृश शरीरयष्टी, डोक्यास रेशमी साफा पंजाबी पद्धतीनें चापून चोपून बांधलेला, भव्य भालप्रदेश, थोडेसे आंत गेलेले गाल, प्रामुख्यानें दृग्गोचर होणारी नासिका व बिद्वत्तेच्या व बुद्धिमत्तेच्या तेजाविष्कारानें प्रथम दृष्टिक्षेपांतच कोणाच्याही मनांत आदर उत्पन्न करणारा तो सावळा चेहरा, या क्षणालाही तें दृश्य माझ्या मन:चक्षुपुढें दिसत आहे. हॉलमधील अर्धवर्तुळाकार जिना सावकाश उतरून प्रशांत पदक्षेप करीत डॉक्टर व्यासपीठावर चढून उभे राहिले. त्यांनी हात छातीवर आडवे जुळवून व नासिकाग्रदृष्टि करून प्रार्थना म्हणावयास

सुरवात केली. "ओ३म् । शन्नो मित्र श वरुण । शन्नो भवत्वर्यमा । शन्न इन्द्रो बृहस्पति ।" डॉक्टरांच्या मुखांतून त्यांच्या पट्टेदार पण किंचित घोगऱ्या आवाजात एक एक शब्द बाहेर पडून वातावरणात विलीन होत होता. सबंध हॉलमध्ये तटस्थता निर्माण झाली. सर्वांचे हात बद्धांजलि झाले, दृष्टि नासिकाग्र झाली, व सगळीकडे एकदम विशुद्ध व प्रसन्न वातावरण निर्माण झालें. प्रार्थना मंत्र म्हणून होतांच डॉक्टरांनी विद्यार्थ्यांना उपदेश दिला. सत्य वद । धर्म चर । स्वाध्यायान्मा प्रमद । वगैरे उपदेशपर शब्दसमुच्चय डॉक्टरांच्या मुखातून निघून श्रोत्यांच्या अंत:करणाचा ठाव घेत होते. उपदेशपाठानंतर डॉक्टरांनी थोडक्यात इंग्रजीमध्ये वरील उपदेश पाठाचें सार विशद करून सांगितलें. गुरुमुखांतून निघालेले ते प्रार्थना मंत्र व तो उपदेशपाठ अद्यापही माझ्या स्मृतिकपाटांत निनादत आहे डॉक्टरांच्या सर्व आयुष्याचें सार व ध्येय या उपदेशांतच साठविलें आहे. असें म्हटले असता मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं.

डॉक्टर कोल्हापुरास एकटेच आले होते. ते त्यावेळीं विधुर होते. त्यांची वृद्ध मातोश्री व मुलें पंजाबात होतीं जूनच्या अखेरीस कोल्हापुरचा पावसाळा जोरांत सुरू झाला व डॉक्टरांच्या दम्यानें उचल खाल्ली. शेंडीनाकेतील गारठ्याच्या जागेतील वास्तव्य, नुकत्याच उघडलेल्या कॉलेजच्या कामाचा बोजा व त्यातच दम्यानें उचल खाल्ल्यानें डॉक्टर आजारी पडले. जवळ घरचे कोणी नाहीं आपल्या मुलुखापासून शेंकडो मैल दूर अशा परक्या प्रांतात येऊन पडलेले. ना कोणाची विशेष माहिती, ना महाराष्ट्रीय भाषेचें ज्ञान. अशा परिस्थितींत डॉक्टरांचा आजार कमी होण्याचे ऐवजीं वाढू लागला. दरबार सर्जन यांचें औषध चालूच होतें. अखेर त्यांनीं डॉक्टरांना त्या गारठ्याच्या बंगल्यातून दुसरीकडे हलविले पाहिजे, त्याशिवाय त्यांना लवकर

आराम पडावयाचा नाहीं असें सांगितलें. तेव्हां डॉक्टरांना कॉलेजमधील प्रिन्सिपॉलच्या ऑफिसांत आणून ठेवावयाचें ठरलें. आम्ही विद्यार्थी-पंचकानें पाळीपाळीनें त्यांचे जवळ राहून त्यांची शुश्रुषा करण्याचें पत्करलें व त्या प्रमाणें तावडतोब व्यवस्था केली. या आजारांत डॉक्टरांच्या सान्निध्यामुळें त्यांच्या स्वभावाचें जितकें ज्ञान झालें व डॉक्टरांच्या अंतरंगाची जितकी प्रचीति आली तितकी इतर कोणत्याही मार्गानें क्वचितच आली असती. त्या दम्याच्या दुष्ट व्याधीमुळें डॉक्टरना होणारा त्रास व त्या दुर्दम व्याधीशीं तितक्याच दुर्दम्य धीरानें झगडणारा व आपल्या अविचलित आशावादानें शेवटपर्यंत कार्य करीत राहणारा तो वीर यांचें प्रात्यक्षिकच ज्यानें पाहिलें असेल त्यालाच डॉक्टरांच्या स्वभावाची, मानसिक गंभीरतेची व कर्तव्यपरायणतेची खरी कल्पना आली असती.

बी. ए. झाल्यानंतर पहिल्याच वर्षी मुंबई युनिव्हर्सिटीच्या माणेकजी लिमजी पारितोषकाकरितां मी 'The Effects upon Indian Economic Conditions of the Trade with Europe in the XVIIth Century' या विषयावर प्रबंध लिहावयास घेतला व त्या कामीं डॉक्टरांचेंच मार्गदर्शन मला उपयोगी झालें. युनिव्हर्सिटीकडून तें अभिलषणीय पारितोषक मला मिळाल्याचें जाहीर झाल्यानंतर जर कोणाचें पहिलें अभिनंदनाचें व प्रोत्साहनाचें पत्र मला आलें असेल तर तें डॉक्टरांचेंच. डॉक्टर स्वतः मला पत्र पाठवूनच थांबले नाहींत, तर आपल्या कॉलेजच्या एका विद्यार्थ्यानें हा प्रबंध मिळविलेला मान डॉक्टरांनी दरबारच्या निदर्शनास आणून दरबारतर्फे मला त्यावेळचे लोकप्रिय दिवाण व नंतर मुंबई सरकारचे अर्थमंत्री श्री. लठ्ठे यांचेकडून व कॉलेजतर्फे [illegible].

माझें त्यानंतरचें पुस्तक 'विनिमय आणि पैसा' हें लिहिण्याचे कामींही मला डॉक्टरांचें अत्यंत सहाय्य झालें. डॉक्टरनीं आपला बहुमोल वेळ खर्च करून माझें सर्व हस्तलिखित अथपासून इतिपर्यंत वाचून अत्यंत उपयुक्त अशा सूचना केल्या. अशा जिव्हाळ्याच्या मार्गदर्शकाचा कोण आजन्म ऋणी राहणार नाहीं?

माझें पुण्यास वास्तव्य झाल्यानंतर माझ्या व डॉक्टरांच्या गांठीभेटी म्हणजे मी सुटींत कोल्हापुरास जाई तेव्हां अगर ते कामानिमित्त मुंबई पुण्यास येत जात असत त्या मुदतींत. परंतु केव्हांही भेट झाली तरी डॉक्टर अगत्यपूर्वक माझी, माझ्या धंद्याची व एकंदर परिस्थितीची चौकशी केल्याशिवाय राहिले नाहींत. इतकेंच नव्हे पण आमच्या बी. ए. च्या पहिल्या छोट्या वर्गांतील प्रत्येक सहाध्यायाची ते मजजवळ आस्थापूर्वक चौकशी करीत असत.

डॉक्टर गेले पण त्यांची दिव्य चिरस्मृति मागें राहिली आहे. डॉक्टरांच्या जड देहाचा त्याग करून त्यांचा अमर आत्मा ज्या दिव्य तेजो-राशीमध्यें विलीन झाला आहे त्याच दिव्य तेजोराशींत आपलाही आत्मा एक दिवस विलीन होणार आहे. त्या दिव्य प्रदेशांत पुन्हा आपली व आपल्या डॉक्टरांची भेट होणार आहे. पण तो सुखद क्षण येईपर्यंत डॉक्टरांनीं दाखवून दिलेला कर्तव्याचा मार्ग त्यांच्या दिव्य स्मृतीच्या प्रकाशांत आक्रमण करीत राहिलों तरच डॉक्टरांच्या पुण्यस्मृतीचें सार्थक केल्यासारखें होईल, एवढाच विचार आज माझ्या मनोभूमिकेवर स्थिर होऊन राहिला आहे.

# श्लोकांजलि

कवि:—डॉ. रा. चिं. धेरंडे, एम्. बी. बी. एस्.

मनोज्ञ गुणभूषणीं निळसत्र हिरा कीं भला —
हिराच इतिहासिचा नृप शिवा जयें गाइला;
विभूतिच विभूतिचे करितसे यथार्थ स्तव;
न हें स्तव गमो, गमो कथियटी कथा वास्तव. १

जयास गुणकीर्तनीं कधिहि मौन ना आवडे,
जयें झिजविलें वपू सुगुणपूजनीं एवढें,
जयाहृदयिं नांदला रिपुठ आर्यधर्मादर,
स्मरे नर दुजा असा न कुणि वाक्कृष्णेतर. २

मनोमुकुरिं माझिया स्मितमुखी वसे आकृति
सुरम्यवचनामृता शुभकपोलनासाक्ष ती
विशालमति, अंतरीं सुजनताहि जीच्या अति;
न कां! क्षणहि धन्य ते गमति जे तिथे संगती ३

विनिर्मिति दुजा रचे तरि विधातया! निर्मि रे!
अम्हांमधि अशाचसा वहु विभूति आतां तरें.
गमे विमलशील तूं सहज राखलें कौशल,—
प्रयोग तव साधु दे चिर यशस्विता उज्ज्वल! ४

◆ ◆ ◆

इतिहासकथासु शोधकर्त्री शिवराये तव भक्तिरर्पणा ।
ननु सम्यविवेचनाय किं त्वं शिवरायं प्रति भासि कल्पवृक्ष ।। ५

रुचिरं वचनामृतस्पृहं तव संश्रुत्य न कस्य तृप्तिरासीत् ।
अधुना कुलोनयतम्भजां श्रुतिमनसम्पकहो परिस्थिति रम ।। ६

हृद्यं मधुरं वचः सुधीरं मतिरस्थेरसस्तोर्मिर्निलजीर ।
इतिहासज्ञवर्षीति भिरस्त्व महताने मतेरिदं पावनम् ।। ७

# डॉ० बाळकृष्ण यांचें खरें स्मारक

लेखक:—श्री. भाऊराव पाटील, सातारा.

कै. डॉ० बाळकृष्ण हे एक विद्वान इतिहासतज्ञ, थोर शिक्षणतज्ञ, उत्तम वक्ते व कोल्हापूर आर्यसमाजाचे धुरीण आहेत, इत्यादि त्यांचा लौकिक इ. स. १९३२ पर्यंत मी दुरूनच ऐकत होतो. पण सुदैवानें १९३२ सालीं डॉक्टरसाहेबांचा व माझा सातारा येथें परिचय होण्याचा सुयोग केवळ त्यांच्याच कृपेनें लाभला.

सातारा येथें १९२४ सालापासून सर्व जातीच्या व धर्मांच्या लायख व हुशार विद्यार्थ्यांसाठीं जें एक वसतिगृह मीं चालविलें आहे त्यास त्यांनीं ता. ९।११।१९३२ ला भेट देऊन संस्था वजावीत असलेल्या शैक्षणिक कामगिरीबद्दल प्रशसोद्गार काढून तिजला शक्य तें सक्रिय सहाय्य देण्याचें अभिवचनही दिलें. यावरून डॉक्टरसाहेबांना शिक्षणप्रसाराबद्दल किती तळमळ लागून राहिली होती हें स्पष्ट दिसतें. ते १९२२ सालीं कोल्हापूर आर्यसमाजाचे प्रमुख सचालक म्हणून पंजाबमधून इकडे आले. कोल्हापूर शहरातील व संस्थानातील त्यावेळचा शैक्षणिक प्रसार व डॉ० बाळकृष्ण वारले त्यावेळचा शिक्षण प्रसार जर आपण लक्षात घेतला तरच आपणाला करवीर इलाख्यातील त्यांच्या अलौकिक शिक्षणप्रसारविषयक कामगिरीचें आकलन होईल. कोल्हापूर हें विश्वविद्यालयीन परीक्षांचें आज जें केंद्र दिसत आहे त्यासाठी कै. डॉ. बाळकृष्ण प्रामुख्यानें जबाबदार आहेत. या शिवाय त्यांनीं करवीर इलाख्यातील दुय्यम शिक्षणाचें इन्स्पेक्टर म्हणून बजावलेली कामगिरी उल्लेखनीय आहे. एवढ्या शैक्षणिक प्रगतीनें डॉक्टरसाहेबांचें समाधान न होतां त्यांनीं कोल्हापूर हें सर्व प्रकारच्या शिक्षणाचें केंद्र बनविण्याचा चग बांधला होता. व त्याचेंच

अंशात फळ म्हणून कोल्हापूर येथें लॉ कॉलेज व बी. टी. कॉलेज ही आज उत्तम रीतीनें कार्य करीत असल्याचें दिसत आहेत.

कै० डॉ. बाळकृष्ण हे पंजाबी गृहस्थ होते व ते प्रांताभिमानी नव्हते असें जरी आपणास यदाकदाचित म्हणता आलें नाहीं; तरी ते परप्रांतद्वेषी तरी खास नव्हते. ही गोष्ट त्यांनीं महाराष्ट्रांत निरनिराळ्या क्षेत्रांत बजावलेल्या कामगिरीवरून सर्वांच्या निदर्शनास आली आहे. मराठी राज्याचे संस्थापक श्री छत्रपति शिवाजी महाराज यांच्यासंबंधीं त्यांच्या ठिकाणीं परम आदर वसत होता; म्हणूनच त्यांनीं त्यांच्या चरित्रपर मोठाले इंग्रजी अभूतपूर्व असे ग्रंथ अहोरात्र परिश्रम करून निर्माण केले. इतकेंच नव्हे तर कोल्हापूर येथें श्री छत्रपति शिवाजी महाराजांचें चिरकाल स्मारक व्हावें म्हणून शिवाजी युनिव्हर्सिटी कै० श्री छत्रपति राजाराम महाराज यांच्या सहाय्यानें स्थापन करण्याची त्यांची अत्यंत महत्त्वाकांक्षा होती. ही युनिव्हर्सिटी स्थापन झाली असती तर डॉ. बाळकृष्ण यांची शैक्षणिक कामगिरी परमोच्च कळसास जाऊन पोहोंचली असती! पण ईश्वरी संकेत निराळा असल्यानें डॉक्टरसाहेबांची ती महत्त्वाकांक्षा कै० श्री छत्रपति राजाराम महाराज व स्वतः त्यांच्यावर निष्ठुर काळानें अकालीं झडप घातल्यानें अपूर्ण राहिली! असो. महाराष्ट्रामध्यें डॉ. बाळकृष्ण यांचा शिष्यगण अफाट आहे. त्याचप्रमाणें त्यांचे चहातेही सर्वत्र विखुरलेले आहेत. तेव्हां या सर्वांनी त्यांची ही अपूर्ण महत्त्वाकांक्षा पूर्ण केल्यासच त्यांचें खरेंखुरें स्मारक होणार आहे.



# श्रद्धांजलि

लेखक —श्री. का. धों. पेडणेकर, एम. ए, कोल्हापूर.

हिंदुस्थानातील फारच थोड्या संस्थानांत शक्य झालेली शैक्षणिक प्रगति कोल्हापूरसारख्या छोट्याशा संस्थानात ज्यांनीं शक्य करून दाखविली ते कै० राजाराम छत्रपति महाराज आणि राजाराम कॉलेजचे दिवंगत प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण यांचें जीवनकार्य एकाच कालखंडांत योगायोगानें झालें हें खरें असलें तरी माझ्यासारख्या एखाद्या श्रद्धावंताला त्याच्या बुडाशीं नियतिकृत पूर्व योजनेनुसार कार्य करणारी एखादी अद्भुत शक्ति असावी असें वाटतें. कै० राजर्षि श्री शाहू छत्रपति महाराज यांच्या कारकिर्दीत महाराष्ट्रीय दलित वर्गात सामाजिक ऐक्याची जाणीव झाली म्हणून तो काल ज्याप्रमाणें सामाजिक नवजीवनाचा म्हणून ओळखला जातो, त्याचप्रमाणें कै० राजाराम छत्रपतींच्या वेळीं सर्वत्र शैक्षणिक जागृति होऊन ज्ञानरवीचीं किरणें समाजाच्या सर्व घटकापर्यंत पोंचविण्याचें महत् कार्य झाल्यामुळें हा काल शैक्षणिक विकासाचा असें म्हटलें जातें. या शैक्षणिक सुधारणाचें सुखस्वप्न प्रत्यक्ष सत्यसृष्टींत आणण्यासाठीं त्यांना सर्व परींनीं साह्य करणारी विद्वान आणि अधिकारी व्यक्ति म्हणजे कै० प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण हे होत. दोघांच्याही जीवनकार्यात इतकी ध्येयात्मक एकात्मता आहे कीं हे दोघेही याच कार्यासाठीं अवतीर्ण झाले होते कीं काय असेंही वाटतें.

नगाधिराज हिमालय आणि गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्रादि महानद्यांच्या आसमंतात राहून वेदकालीन गुरुकुल परंपरा चालवणारा कुलपति महाराष्ट्रांतील एका छोट्याशा संस्थानांत आपलें जीवन वेचून ध्येयासिद्धि-साठीं झगडतो, ही कल्पनाच मुळीं उदात्तरम्य नि अद्भुत आहे!

अशावेळीं 'जननान्तर सौहृदानि', हें कविश्रेष्ठाचें वचन केवळ व्यक्तिपुरतेंच खरें न मानतां स्थळ आणि काळ या अचेतन सृष्टींत देखील तितकेंच यथार्थतेनें पटतें. नाहीतर, श्री शिव छत्रपतींच्या एकमेव वंशजांच्या राजधानींत राहून शिवचारित्र्याचे पाठ सर्व जगताला नवीनतेनें देण्याचें प्रतिज्ञाकंकण बांधून आपलें बहुमोल आयुष्य डॉ. बाळकृष्ण यांनी अशा रीतीनें शिवभक्तींत कधींच खर्ची घातलें नसतें. कॉलेजच्या वार्षिक वृत्तांताच्या शेवटीं पुनःपुन्हा घोषित झालेली शिवाजी विश्वविद्यालयाची कल्पना कित्येकांनीं प्रथम प्रथम अशक्य कोटींतील मानली तरी कै० राजाराम छत्रपतींच्या सहाय्यामुळें डॉ. बाळकृष्ण यांनी संकल्पिल्याप्रमाणें वेगवेगळ्या ज्ञानशाखांसाठीं वाढविलेलीं व नवीन सुरू केलेलीं आर्ट्स्, सायन्स, लॉ, टीचर्स कॉलेजें पाहिल्यानंतर मात्र अनेकांना ही कल्पना स्वीकारणीय वाटूं लागली; इतकेंच नव्हे तर या नवीन अस्तित्वांत येणाऱ्या शिवाजी विश्वविद्यालयाचें केंद्र कोल्हापूर असावें कीं पुणें असावें याबद्दलच्या चर्चेस देखील प्रारंभ झाला. शेवटीं शेवटीं तर डॉ. बाळकृष्ण यांच्या कार्याचें क्षेत्र इतकें व्यापक झालें कीं केवळ संस्थानांतील शिक्षणप्रगतीवर संतुष्ट न राहतां ज्या वीरश्रेष्ठाच्या चारित्र्याला मोहून त्यांनीं इतका आत्मयाग केला होता त्याच्या पेशाप्रमाणेंच आखिल महाराष्ट्रांत ज्ञानप्रसार करण्याचा त्यांचा मनोदय होता. वेंगुर्ल्यासारख्या लहानशा ठिकाणीं आर्ट्स् आणि सायन्स कॉलेज आर्यप्रतिनिधींसभेच्या सहाय्यानें स्थापून सध्यां अस्तित्वांत आलेल्या जॉर्ज हायस्कुलच्या [illegible] कॉलेजरूपें अल्पावधींत वाढवायाची ही त्यांनीं हाती घेतलेली योजना साहसप्रियतेबरोबरच त्यांचें असाधारण व्यक्तिमत्व सिद्ध करते.

आपल्या कॉलेजचा विद्यार्थी, मग तो कुठल्या [illegible] असो, त्याला शक्य त्या रीतीनीं ते मदत करीत. [illegible]

अनेकदा आहे. वक्तृत्वाच्या चढाओढींत मी एक उमेदवार होतो. स्पर्धेत भाग घेणारे वक्ते विद्वान आणि नामांकित होते. आणि मी तर कॉलेजच्या पहिल्या वर्गातील विद्यार्थी. यामुळे माझ्या वक्तृत्वाचा प्रकाश कितपत पडणार याची जाणीव असून देखील मी प्रिन्सिपॉल डॉ. बाळकृष्ण यांच्या ऑफीसमध्ये गेलो. नेहमीप्रमाणे ते कांहीतरी लिहीत होते लिहिणें थांबवून "काय हव?" असें मृदु स्वरात त्यांनी इंग्रजीमधून विचारलें. मी अडखळत अडखळत माझी अडचण त्यांना सांगितली आणि स्पर्धेसाठी निवडलेल्या विषयावर वाचण्यासाठीं पुस्तक मागितलें; "घरीं या मग पुस्तक देईन" असें त्यांनी सांगितल्यावरून मी घरीं गेलों. मला अजूनही आठवतें. आमचे प्रिन्सिपॉल त्यावेळीं आपल्या शाहुपुरींतील बंगल्यातील दिवाणखान्यात लिहीत होते. संध्याकाळच्या पांचाची वेळ होती. लिहिता लिहितांच भिंतीकडेला असणाऱ्या सुंदर कपाटातील लहान मोठ्या ग्रंथांची नांवें सांगून साधारणपणे तीस चाळीस पुस्तकें त्यांनी बाहेर काढावयास सांगितली अन् म्हणाले "तुम्हाला पाहिजे असलेली माहिती त्या पुस्तकांतून मिळेल. एका पुस्तकाऐवजी तीस चाळीस ग्रंथ आणि त्यांतही एन्सायक्लोपीडिया सारखे कोशग्रंथ माझ्यासमोर पाहून मी भांबावून गेलो, आणि प्रश्नार्थक मुद्रेनें त्यांच्याकडे पाहिलें ते पुन्हा म्हणाले 'तुम्हाला पाहिजे असलेली माहिती या पुस्तकांत आहे. या विषय सूचीवरून घरीं जाऊन वाचा आणि चढाओढीचा निकाल मात्र आठवणीनें कळवा" नम्रतापूर्वक 'नमस्ते' म्हणून मी निरोप घेतला आणि पुस्तकांचें वेडल टांग्यांत ठेवून घरीं परतलों यापूर्वी आमचे प्रिन्सिपॉल मला नांवानें देखील ओळखीत नव्हते आणि कोणतीही विचारपूस न करतां दोन तीनशें रुपयांची स्वतःच्या मालकीचीं पुस्तकें त्यांनी मला घरीं वाचावयास दिलीं होतीं.

अध्यापकवर्गाशीं त्यांची वागणूक किती सहृदय, गुणग्राहक आणि योजक होती याची साक्ष राजाराम कॉलेजचा आजचा अध्यापकवर्ग देईल. १९३५ सालीं पदवी परिक्षेनंतर इंग्लिशचे टयूटर म्हणून माझा कॉलेजच्या अध्यापक वर्गात प्रवेश झाला होता. प्रिन्सिपॉल विषयी वाटणाऱ्या आत्यंतिक आदरामुळें, चहासाठीं आम्ही सर्व अध्यापकवर्ग ज्या वेळीं प्रिन्सिपॉलच्या ऑफिसांत जमत असूं त्यावेळीं मला अगदीं चमत्कारिक वाटे. ही आमची बावरलेली वृत्ति त्यांच्या लक्षांत येई आणि ते आम्हांला संभाषणामध्यें कोणत्यातरी निमित्तानें ओढून परकेपणाची भावना दूर करीत. आपल्या सहकाऱ्याशीं त्यांची वृत्ति एखाद्या कुटुंब-प्रमुखाप्रमाणें अगदीं जिव्हाळ्याची असे आणि म्हणूनच अध्यापकवर्गापैकीं कोणाचाही सन्मान झाला तर त्यांना आपत हर्ष होई.

डॉ० बाळकृष्णांच्या संबंधीं विचार करूं लागतांच अनेक स्मृतींचा एकच कल्लोळ उठतो; आणि शिवाजी युनिव्हर्सिटीचें त्यांचें ध्येय सिद्धीस गेलें नाहीं म्हणून वाईटही वाटते. तरी पण मृत्युशय्येवर पडल्या पडल्या देखील अनेक तऱ्हेच्या इतर आपत्तींना न जुमानतां त्यांनीं श्री शिव छत्रपतींची, त्यांच्या वंशजांची, त्यांच्या महाराष्ट्राची अखंड सेवा करण्यांत जो अपूर्व आनंद घेतला तो रँग्लर परांजपे यांच्या शब्दांत व्यक्त करून दिवंगत डॉ० बाळकृष्ण यांच्या स्मृतिसमाधीवर ही श्रद्धांजलि विनम्र भावानें अर्पण करतो. 'In Doctor Balkrishna we have lost, not only a great Scholar, and Educationist, but a great man, a great advocate of Maharashtra who had identified his being with the glory of Maharashtra.'

---

# खरा खेळाडू

लेखक.—प्रो० ग. श्री. देशपांडे, एम् ए., बी. टी., कोल्हापूर.

१९२४ चा सप्टेंबर महिना. राजाराम कॉलेजचा क्रिकेटसंघ नॉर्थ-कोट टालीचा पहिला सामना खेळत होता. आमच्या फक्त १०९ धांवा झाल्या होत्या. प्रतिपक्षाच्या ७ बाद १०२, ८ बाद १०८, ९ बाद १०९ आणि पुढें सर्व बाद १०९, (दुसऱ्या डावात हा सामना आम्हीं जिंकला.) अशा वातावरणांत व टाळ्यांच्या कडकडाटांत आम्हीं खेळाडू पॅव्हेलियनकडे धांवलों. प्रिन्सिपॉल साहेबांची उंच धीरगंभीर आकृति, मुद्दाम पुढें येऊन दारांतच उभी राहिली होती. अमृतमय स्मितानें व पितृतुल्य प्रेमळपणानें भारलेली अशी थाप त्यांनीं आमच्यापाठीवर मारली. डॉक्टरांच्या अशा कितीतरी स्मृती भराभर डोळ्यासमोर येतात व कोणत्या स्मृतींना शब्दस्वरूप द्यावें याबद्दल मनांत गोंधळ होतो.

डॉक्टरांना खेळाडूबद्दल आस्था, प्रेम व आदर फार! कॉलेजच्या सर्वच महत्वाच्या सामन्यांना नेहमीं हजर राहाणें त्यांना कठीण असे. अलिकडे तर हें अशक्यच झालें होतें. पण कोणत्याही परिस्थितींत व कुठेंही सामना चालू असला तरी सर्व संघनायक व व्यवस्थापक मोठ्या दक्षतेनें त्यांच्याकडे वारवार खेळाची परिस्थिति कळवीत. डॉक्टरांकडून वारंवार पृच्छाच होत असे व उत्तेजनपर, सांत्वनपर अगर अभिनंदनपर संदेश मोठ्या आपुलकीनें व तत्परतेनें ते वारंवार पाठवीत. यापेक्षांही एखादी फुटबॉल अगर हॉकी मॅच ऐन रंगांत आली असतां डॉक्टरांच्या जवळ उभें राहून ती पहाण्यात खरी मौज असे. त्यांचे उत्तेजनपर शब्द, खेळासंबंधीं टीका अगर असलेले प्रश्न ऐकिले कीं प्रत्यक्ष चढाऊ व्यक्तित्व अवतरलेलें दिसे. याचा अर्थ असा नव्हे कीं डॉक्टर कोणत्याही खेळात

निष्णात होते किंबहुना प्रत्यक्ष स्थिति याच्या अगदी उलट होती. क्रिकेट-मधील टोलेबाजी, फुटबॉल-हॉकीमधील जलद चाल अगर मध्यंतरी खेळाडूंचा "ब्लीझ्कीग" हीच त्यांना आवडत व समजत. त्यांच्या संभाषणांत खेळाच्या शास्त्राचें अज्ञान पण भरपूर पृच्छा असे. त्यांच्या प्रश्नांची उत्तरें देणें ही एक अत्यंत कठीण गोष्ट असे. दोन्ही संघांनी जोरदारपणें निकराचे खेळावें पण शेवटीं आपल्याच संघानें जिंकावें ही त्यांची इच्छा. त्यांतूनही अपयश आलेंच तरी "पुढल्यावेळीं" असें म्हणत त्यांचें स्मित मात्र कायमच राही.

डॉक्टरांनी जरी देशीविदेशी सर्व खेळांबद्दल आपल्या कॉलेजमध्यें सारखीच आस्था दाखविली तरी तरुणांना टेनिस, क्रिकेटपेक्षां फुटबॉल-हॉकी-सारखे धकाधकीचे खेळच जास्त योग्य असेंच त्यांना वाटे. एकादा खेळाडू दमला ही कल्पनाच त्यांना गौण वाटे. 'चढाई' हा त्यांचा जीवनविशेष. विद्या, देशसेवा, आर्यसंस्कृति यासाठीं जसें त्यांचें निर्भीड, जयिष्णु, बलवान जीवन तसेंच तें खेळासाठींही होतें.

कॉलेज जिमखान्याच्या अफाट क्षेत्रांत नेहमीच पैशाची चणचण व उत्साही संघांना आर्थिक टंचाईमुळें रसद देण्याचे प्रसंग पुष्कळच असत. पण डॉक्टरांनी मोठ्या प्रेमळपणानें व धीरानें संघांची रसद भागवून त्यांचा उत्साह द्विगुणित करावा असे कितीतरी प्रसंग मला आठवतात. कोल्हापुरांतील सर्व क्रीडासंघांना, आंतरराष्ट्रीय सामन्यांना वगैरे डॉक्टरांच्या-कडून पुष्कळ प्रोत्साहन मिळे. कोल्हापुरांतील पहिले आंतरराष्ट्रीय सामने त्यांच्याच मार्गदर्शनाखालीं यशस्वी झाले. कित्येकदां महत्त्वाच्या सामन्यांना राजाराम कॉलेजचें मैदान व मदत नेहमी मिळे. एकंदरीत गेल्या २० वर्षांत कोल्हापुरांत खेळांच्या क्षेत्रांत झालेली प्रगति पाहिली म्हणजे यामागें मुख्यतः न खेळणारा एक खेळाडू होता हें फार मोठेपणानें वाटे.



# खरा खेळाडू

लेखक:—प्रो० ग. श्री. देशपांडे, एम. ए., बी. टी., कोल्हापूर.

१९२४ चा सप्टेंबर महिना. राजाराम कॉलेजचा क्रिकेटसंघ नॉर्थ-कोट हायीचा पहिला सामना खेळत होता. आमच्या फक्त १०९ धांवा झाल्या होत्या. प्रतिपक्षाच्या ७ बाद १०२, ८ बाद १०८, ९ बाद १०९ आणि पुढें सर्व बाद १०९, (दुसऱ्या डावांत हा सामना आम्हीं जिंकला.) अशा वातावरणांत व टाळ्यांच्या कडकडाटांत आम्हीं खेळाडू पॅव्हेलियनकडे धांवलों. प्रिन्सिपॉल साहेबांची उंच धीरगंभीर आकृति, मुद्दाम पुढें येऊन दारांतच उभी राहिली होती. अमृतमय स्मितानें व पितृतुल्य प्रेमळपणानें भारलेली अशी थाप त्यांनीं आमच्यापाठीवर मारली. डॉक्टरांच्या अशा कितीतरी स्मृती भराभर डोळ्यांसमोर येतात व कोणत्या स्मृतींना शब्दस्वरूप द्यावें यावद्दल मनांत गोंधळ होतो.

डॉक्टरांना खेळाडूबद्दल आस्था, प्रेम व आदर फार! कॉलेजच्या सर्वच महत्त्वाच्या सामन्यांना नेहमीं हजर राहाणें त्यांना कठिण असे. अलिकडे तर हें अशक्यच झालें होतें. पण कोणत्याही परिस्थितींत व कुठेंही सामना चालू असला तरी सर्व संघनायक व व्यवस्थापक मोठ्या दक्षतेनें त्यांच्याकडे वारंवार खेळाची परिस्थिति कळवीत. डॉक्टरांकडून मरचेवर पृच्छाच होत असे व उत्तेजनपर, सांत्वनपर अगर अभिनंदनपर संदेश मोठ्या आपुलकीनें व तत्परतेनें ते वारंवार पाठवीत. यापेक्षांही एखादी फुटबॉल अगर हॉकी मॅच ऐन रंगांत आली असतां डॉक्टरांच्या जवळ उभे राहून ती पहाण्यांत खरी मौज असे. त्यांचे उत्तेजनपर शब्द, खेळासंबंधीं टीका अगर असंख्य प्रश्न ऐकिलें कीं प्रत्यक्ष चढाऊ व्यक्तित्व अवतरलेलें दिसे. याचा अर्थ असा नव्हे कीं - डॉक्टर कोणत्याही खेळांत

आमच्या अभ्यासाकडे लक्ष देण्याला त्यांना फारशी सवड होत नसे. ते स्वतः आम्हांला अभ्यासाला बसवीत नसत. आमच्या अभ्यासासाठीं नेमलेल्या मास्तरांच्यावर त्यांचा पूर्ण विश्वास! मात्र आम्ही केव्हां केव्हां शंका विचारूं तेव्हां मात्र खूप खूप माहिती सांगत. इंग्लंडच्या व हिंदुस्तानच्या इतिहासांतील शंकानिरसन करतांना इतक्या गंमतीच्या गोष्टी सांगत कीं आपलं सारं काम बाजूला सारून तासन् तास आम्हांला इतिहासांतल्या गोष्टी ऐकवत, विलायतेंतील अनुभव किंवा प्रवासांतील कांहीं गंमती बहुतेक रात्रीं जेवणानंतर किंवा त्यांचे पाय रगडत असूं तेव्हां सांगत. अशा गोष्टी ऐकण्यांत तल्लीन होऊन अर्धा पाऊण तास देखील न कंटाळतां त्यांची सेवा आम्ही करीत असूं.

ती. तातांना मराठींतील गंमतीच्या गोष्टी ऐकण्याचा भारी नाद! आमच्या क्रमिक पुस्तकांतील किंवा खेळगडी वगैरे मासिकांतून वाचलेल्या गोष्टी प्रथम त्यांना सांगण्यांत आमच्यांत अहमहमिका चाले. अशावेळीं रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या आम्हीं प्रत्येकजण पाळी-पाळीनें गोष्टी सांगत. मात्र सर्वांच्याच गोष्टी—छोट्या बाळाच्या देखील—सारख्याच तल्लीनतेनें ऐकण्याच्या व त्यांतील विनोदामुळें आमच्याबरोबर खूप हंसायचं; आणि एखादी नक्कल किंवा गोष्ट आवडली की ती वारंवार सांगायला लावत.

लहानपणीं आमचा आवाज फार गोड होता. आम्ही चांगलें गाणें शिकावें म्हणून आमच्या चौथ्या वर्षापासूनच आमच्याकरितां संगीत शिक्षक नेमलेला होता व एक छोटीशी पेटीही पण आणून दिली होती. आमच्या गाण्याचें आपल्याप्रमाणेंच समाजानें कौतुक करावें म्हणून राजाराम कॉलेजांतल्या सभा संमेलन प्रसंगीं किंवा घरांतील कोणत्याही समारंभाच्यावेळीं आमच्या गाण्याचा कार्यक्रम ठरलेला असे. आम्ही

विसरणार नाहीं. तुम्ही काहीच काळजी करूं नका. तुमचे दिवस झाले की मी त्यांना चांगल्या शाळेंत घालीन, व शिक्षण देईन. आणि तुम्हाला चांगल्या रीतीनें राहाता येईल अशी मी व्यवस्था करीन. हीं मुलें मी माझींच समजतो" केवढा धीर आला व आधार वाटला होता या त्याच्या प्रेमळ शब्दांचा! पण दुर्दैव आमचं कीं एका महिन्याभरांत श्री राजाराम महाराजांच्या कृपाछत्राला देखील आम्हीं मुकलों. आज महाराज जिवंत असते तर त्यानीं आम्हांला कशाचीच ददात भासू दिली नसती. त्याच्या मृत्यूनंतर कोल्हापूर दरबारनें पोटगी सुरू करून आमच्या चरितार्थाची विवंचना थोडी दूर केली आहे. दरबारनें दाखविलेली ही गुणग्राहकता अभिनंदनीय नाहीं असं कोण म्हणेल? आमच्या पडत्या काळांत देखील आम्हांला वेळीच हात देऊन सावरून धरल्याबद्दल कोल्हापूर दरबारचे आम्ही कायमचे ऋणी राहू.

तात! आपण जिवंत असेपर्यंत आपली किंमत आम्हाला कधीच कळून आली नाहीं उलट आमच्या काळजीमुळें वारंवार दम्यानें पोखरलेल्या तुमच्या शरिरावर थोडाफार परिणाम झाला असेल. मेलेल्या माणसाच्या इच्छा अपुऱ्या राहिल्या की त्यांचा आत्मा त्या व्यक्तीभोंवतीं घोटाळत राहातो म्हणतात. तसाच आपला आत्मा आमच्याभोंवतीं घिरट्या घालीत आहे याची जाणीव ठेऊन आपलीं आमच्याविषयींची मनोराज्यं शक्य तों पूर्ण करण्याची आम्ही पराकाष्ठा करूं. जी गोष्ट आपल्या हयातींत आम्हांला उमगून आली नाहीं, ती इतक्या उशीरा कां होईना आतां समजून येत आहे निदान आपल्या आत्म्याला तरी समाधान देण्याचं भाग्य आम्हांला याउप्पर तरी पूर्णपणें लाभेल ना?



## Important published Articles and Papers of Dr. Balkrishna *

| Name | Published in | Date |
|---|---|---|
| 1. Amount and Distribution of Incomes in the Punjab, The | The Modern Review | March 1913 |
| 2. Amount and Distribution of Income in the Madras Presidency, The | The Wealth of India | May 1915 |
| 3. Ancient Aryan Civilization and Culture | The Vedic Magazine | |
| 4. Architectural Achievements of the Hindus | Year Book, The Indian Institute of Architects | 1930-31 |
| 5. Arya Samaj, The work of | (Pamphlet) | Jan. 1923 |
| 6. Beginnings of the Silk Industry in India, The | | |
| 7. Control of the Clouds by means of Yajnya | The Vedic Magazine | |
| 8. Control of Population in India | The Hindustan Review | |
| 9. Dearth of Money during Muslim Rule | The Wealth of India | June, 1912 |
| 10. Early English Settlement in Bengal | Paper read at the 15th session of Indian Hist. Rec. Com. at Calcutta | Dec. 1939 |
| 11. Economic History of India | Journal of the Bombay Historical Society I, p. 43-64 | 1925 |
| 12. Educational System in Ancient India | (Pamphlet) S.M.T.T. College, Kolhapur | |
| 13. English Monopoly in Indian Spices, The | Paper read at the 14th session of the Ind. His. Rec. Com. at Lahore | Dec. |

* The list is not exhaustive.

| No. | Title | Published in | Date |
|---|---|---|---|
| 14. | Ethical Foundations of Society and the Arya Samaj, The | Paper read at Anniversary of the Benares Arya Samaj | Jan. 1911 |
| 15 | European Records on Shivaji, The | Paper read at the 12th session of the Ind His Rec Com at Gwalior | Dec. 1929 |
| 16 | Firearms in the Mahabharata | The Rajaramian | Feb '38 |
| 17 | Foreign Trade and Prosperity | The Wealth of India | Feb 1913 |
| 18 | German Youth Movements, The | The Rajaramian | Sept 1935 |
| 19 | Guide to Kolhapur, A | (Booklet) Joint authorship | 1935 |
| 20 | Gurukul system of Education and its Critics | Paper read at the Anniversary of Lahore Arya Samaj | Nov. 1910 |
| 21 | Hindu Ideas on the Age of the World | The Rajaramian | |
| 22 | Hindu Taxation System, The | The Indian Journal of Economics | Sep 1934 |
| 23 | Hindu Theories of Cosmic Evolution | The Rajaramian | Sept. 1934 |
| 24 | Hindu Theory of Social Evolution, The | The Vedic Magazine | Sep. 1926 |
| 25 | Impressions of the Student Life of H H Shri Vikramsinha Maharaj | K E G High School Annual, Dewas | 1937 38 |
| 26 | India and Economic Crises | The wealth of India | June 1913 |
| 27 | India's World wide Contributions | A lecture, at the World Fellowship of Faiths, New York | 1934 |
| 28 | Indian Theory of the Universal State, The | Sardesai Commemoration Volume | 1938 |
| 29 | Interest and Usury | Sir Asutosh Memorial Volume | 1926 |
| 30 | Interesting Historical Question, An | The Vedic Magazine | |

| | | |
|---|---|---|
| 31. Low Wages in India | The wealth of India | April 1912 |
| 32. Magna Charta and After, The | A paper read at *the 7th session of* the Ind. His. Rec. Com. at Poona | Jan. *1925* |
| 33. Memorandum on Money | The Witness before the Royal Commission of Indian Currency and Finance | Dec. 14, 1925 |
| 34. Presidential Address | The *Bombay* Presidency History Teaching Conference, Poona | June 1935 |
| 35. Rise and Fall of the Dutch in India, The | A paper read at the 15th session of the Ind. His. Rec. *Com. at Poona* | Dec. 1938 |
| 36. Rooted Animals, The | The Rajaramian | Aug. 1927 |
| 37. Shivaji and Afzal's Murder | The Rajaramian | |
| 38. Shivaji and Swami Ramdas | The Rajaramian Golden Jubilee Volume | 1931 |
| 39. Should India join the War against Germany ? | The Rajaramian | Oct. 1939 |
| 40. Slavery in Ancient India | The Vedic Magazine | |
| 41. Social Unrest and its Remedies | The Vedic Magazine | |
| 42. Swami Shraddhanand | The Rajaramian | Oct. 1926 |
| 43. Teaching of History, The | The Progress of Education | June 1935 |
| 44. Variation of Prices in India from 1300 to 1912 | The Wealth of India | Nov. 1913 |
| 45. Was British Conquest of India Accidental ? | Paper read at 2nd Indian History Congress at Allahabad | Oct. 1938 |

## Articles in Hindi

| | |
|---|---|
| १. आर्यों की वैज्ञानिक उन्नति | (पुस्तिका) १९१४ |
| २. गुरुकुल की नवीन योजना | अर्जुन, १५ एप्रिल १९३५ |
| ३ भारत के १०० स्मृतिकार | भास्कर, भाग ४ अंक ९ |
| ४. भारत के १०० राजराजेश्वर | (पुस्तिका) १९१४ |
| ५. भारतवासियों की आयुपत्री | सद्धर्म प्रचारक, ज्येष्ठ १९१४ |
| ६. युद्धों का अपव्यय | हिन्दी चित्रमयजगत १९१५ |
| ७. वैदिक राष्ट्र का आदर्श | आर्य मार्च १९२९ |
| ८. सप्तमभारतवर्षीय आर्यकुमार सम्मेलन सभापतिकी वक्तृता | सं. १९७३ वि० |
| ९. सर्वनाशक युद्ध का व्यय | चित्रमयजगत, आगष्ट १९१६ |
| १०. हिन्दी को व्यापक बनाने के उपाय | |
| ११. हिंदुओं का ऱ्हास और उसके निवारणके उपाय | श्रीनिवास स्मारक लेखमाला १९२८ |
| १२. हिंदुमुस्लिम एकता | अर्जुन डिसेंबर १९१२ |

## Articles in Marathi

| | |
|---|---|
| १. माझी जीवनकथा | किर्लोस्कर, जून, जुलै व आगष्ट १९३५ |
| २. राष्ट्रीयता | वसंत व्याख्यान मालावृत्त, पुणें, १९२३ |
| ३. रामचंद्रपंत अमात्याचे चरित्रावर नवीन प्रकाश | राजारामियन |
| ४. शिवाजी महाराजांचें शिक्षण | पुरुषार्थाचा मार्च शिवाजी अंक १९३३ |
| ५. स्वागताध्यक्षाचें भाषण | म. सा. संमेलनांतर्गत प्रथमकाव्य संमेलन, कोल्हापूर १९३२ |
| ६. स्त्रीशिक्षण सुधारणेचें दिग्दर्शन | सह्याद्रि जून १९३५ |

---o---

# PUBLICATIONS OF THE LATE
## Dr. BALKRISHNA.

I. On Indian Religion and Culture —

1. Philosophy of Yajna.
2. Veda, the Word of God
3. Ancient Polity.
4. Hindu Philosophers on Evolution.

II. On Economics —

5. Commercial Relations between India and England ( Routledge, London ).
6. The Industrial Decline in India.
7. Economics ( Hindi ).
8. Commercial Survey of Kolhapur.

III. On Politics —

9. The Indian Constitution.
10. Demands of Democracy.
11. Swarajya.

IV. On History —

12. Shahji. Shivaji the Great | 4 vols.
13. Shivaji Album
14. History of India. ( Hindi )
15. " " " ( Marathi ) 3 vols.

V. The following books were in preparation and some of them were nearing completion —

1. Vedic Psalms.
2. Shukraniti ( with notes and explanations ).
3. Hindu Economics.
4. The State in Ancient India.
5. From the Counter to the Crown.

## Articles in Hindi

| | |
|---|---|
| १. आर्यों की वैज्ञानिक उन्नति | (पुस्तिका) १९१४ |
| २. गुरुकुल की नवीन योजना | अर्जुन, १५ एप्रिल १९३५ |
| ३. भारत के १०० स्मृतिकार | भास्कर, भाग ४ अंक ९ |
| ४. भारत के १०० राजराजेश्वर | (पुस्तिका) १९१४ |
| ५. भारतवासियों की आयुपत्री | सद्धर्म प्रचारक, ज्येष्ठ १९१४ |
| ६. युद्धों का अपव्यय | हिन्दी चित्रमयजगत १९१५ |
| ७. वैदिक राष्ट्र का आदर्श | आर्य मार्च १९२९ |
| ८. सप्तमभारतवर्षीय आर्यकुमार संमेलन सभापतिकी वक्तृता | स. १९७३ वि० |
| ९. सर्वनाशक युद्ध का व्यय | चित्रमयजगत, आगष्ट १९१६ |
| १०. हिन्दी को व्यापक बनाने के उपाय | |
| ११. हिंदुओं का ऱ्हास और उसके निवारणके उपाय | श्रीनिवास स्मारक लेखमाला १९२८ |
| १२. हिंदुमुस्लिम एकता | अर्जुन डिसेंबर १९१२ |

## Articles in Marathi

| | |
|---|---|
| १. माझी जीवनकथा | किर्लोस्कर, जून, जुलै व आगष्ट १९३५ |
| २. राष्ट्रपिता | वसंत व्याख्यान मालावृत्त, पुणें, १९३१ |
| ३. रामचंद्रपंत अमात्याचे चरित्रावर नवीन प्रकाश | राजारामियन |
| ४. शिवाजी महाराजांचें शिक्षण | पुरुषार्थाचा मार्च शिवाजी अंक १९३३ |
| ५. स्वागताध्यक्षाचें भाषण | म. सा. संमेलनांतर्गत ग्रंथप्रकाशन संमेलन, कोल्हापूर १९३३ |
| ६. स्त्रीशिक्षण सुधारणेचें दिग्दर्शन | सह्याद्रि जून १९३५ |

—o—

## Books by the late Dr. Balkrishna.

| | | |
|---|---|---|
| 1 | Shivaji, the Great,<br>Vol. I Shahaji<br>Vol. II-IV Shivaji | 18-0 0 |
| 2 | Shivaji Album | 3-0-0 |
| 3 | Hindu Philosophers on Evolution | 10-0 0 |
| 4 | Demands of Democracy | 2 0-0 |
| 5 | The Indian Constitution | 2 8-0 |
| ६ | भारतवर्षाचा संक्षिप्त इतिहास<br>भाग १, प्राचीन भारत<br>भाग २, मुसलमान व मराठा रियासत<br>भाग ३, ब्रिटिश रियासत | 2-8 0 |

To be had of—

Arya Book Depot,
Laxmipuri,
Kolhapur.